पानिपतचे युध्द आणि मल्हारराव -

मल्हारराव येण्यापुर्वीच 10 जाने 1760 या बरारी घाटावर दत्ताजी ठार झाला. जनकोजीच्या दंडावर गोळी घालुन कोटपुतळीस आला.[60] जनकोजी, लालजी बल्हाळ यास लिहितो दिलीवरी गिलच्या व रोहिले आले. त्याची व आमची लढाई जाली. तिर्थरुप काका, बाबा यास गोळया लागीन लढाईतच राहिले व आम्हांसही उजवे दंडावरी गोली लागली...... बुगने सांभाळून गाव कोटपुतळी प्रांत जेपूर येथे आलो. तां तथेच राजश्री मल्हारजी बाबा, होळकर फौजेसह वर्तमान आले. या उपरी बुनगे एखादे जागा लावुन आम्ही उभयता खडे फौजेनसी दिल्लीकडे रोहिले व गिलच्यास तंबी करावयास एक दो रोजात जातो. शत्रुस नेस्तनाभूत करितो.'[61] बखरकार लिहितो 'दोन्ही सैन्ये येका जागी राहिली तेव्हा लोकांना जाहाले की, शरीरातून प्राण जाता जाता माघारा राहतो.'[62] 4 मार्च 1760 रोजी बेसावध राहिल्याने मल्हाररावाचा पराभव झाला.[63] त्यानंतर दोघेही दक्षिणेतून मदत येण्याची वाट पहात राहिले.

दत्ताजी ठार झाला तो मल्हाररावाच्या मदतीच्या अभावी नव्हे तर मराठयांनी परंपरागत शस्त्रे वापरली म्हणून शेजवलकर लिहितात. 'त्यांचे मुख्य हत्यार बंदुक हे असुन मराठयांप्रमाणे भाला नव्हता. बंदुकीचा मार जरा लांबुन करता येता तसा भाल्याचा होत नाही.'[64] मल्हाररावाने मदत केली नाही असे म्हणणारे इतिहासाचार्य स्वतःच लिहितात. 'परंतु त्यांच्या येण्याचा फारसा उपयोग झाला नाही. जी गत शिंद्यांची झाली तीच गत मल्हाररावांची झाली.'[65] सरकार मात्र मल्हाररावाला जबाबदार मानीत नाही. 'मल्हारराव सवाई माधवपूरजवळ राजपुतांच्या वेढयात गुंतला असुन लगेच येऊ शकत नव्हता तो जे करु शकत होता ते सिंकदरा येथे 4 मार्च 1760 ला दिसले.[66] जनकोजींनी जी पत्रे लिहली त्यातुन त्याला वस्तुस्थिती कळली नाही.[67]

---

60. डॉ. राम इंगळे ले. 114
 पे.द. 27 ले. 247
61. शि.इ.सा.भा.1 ले 220 पे.द. 21 ले 182 हि.द.भा.2 ले.42
62. भा.ब. पा. 84
63. पे.द. 21 ले. 188
64. पानि. पा. 35
65. हे.प्र. पा.81
66. फॉल व्हॅ. 2 पा. 163,164
67. पे.द. 2 ले. 115, 117

दत्ताजी गर्विष्ठ होता. मल्हारराव येईपर्यत तो थांबला नाही. अब्दालीच्या शक्तीचा अचुक अंदाज त्याला घेता आला नाही. एकट्याने सामना केल्यामुळे स्वत: पेशव्यानी त्याला दोष दिला. पेशवे गोविंद बल्हाळ यास लिहितात. 'ऐशाच अब्दाली आली या करिता राजश्री दत्ताजी शिंदे व जनकोजी शिंदे रोहिल्याचा कारभार ठेऊन गेले. तेच समयी राजश्री मल्हारजी होळकर यासही सामील करुन जावयाचे होतं. ते न केले.[68] दत्ताजीच्या मृत्युलाही मल्हाररावास जबाबदरा धरता येत नाही. पानिपतवरील पराभवाला होळकर शिंदे जबाबदार नाही. आणि मल्हाररावाने प्रत्यक्ष युध्दात कुचराई केली याचा पुरावा नाही हे कबुल करतांना इतिहासाचार्य वि.श.राजवाडे स्वत: लिहितात. 'मल्हारराव होळकर, दामाजी गायकवाड यांनी लढण्यात काही कसुर केली किंवा कसे वगैरे बरेच प्रश्न सोडवायचे आहेत. परंतु अस्सल कागदपत्र एक सुध्दा जवळ नसल्यामुळे व्यर्थ किंवा किंचित संभाव्य असा निर्णय काढण्याचा कोरडया खटपटीत पडण्याची माझी इच्छा नाही. व काही फायदा नाही.[69] 'मल्हारराव होळकर यांच्या बाजुवर झुंज मातवर जाहाले रेटत नाहीसे जाहाले तेव्हा ती बाजु सोडून निघाले.[70] दुस-या ठिकाणी इतिहासाचार्यांनी असे म्हटले आहे की, 'इकडे मल्हारराव होळकर याजवरी गुदरली ते समयी आभाळास ठिगळ काठवर लावतील ? उपाय राहिला मग 25 स्वारांनशी बाजु घेऊन निघुन गेले.'[71] ज्याने संपुर्ण बखरीत मल्हाररावाला दोष दिला त्याचे हे शब्द आहेत. कैफियतशर लिहितात 'उभयता सरदारांनी घोडे घातले जनकोजी शिंदे गारद झाले.' मल्हारराव होळकर यांनी ऐंशी स्वारानिशी दक्षिणेचा रस्ता धरला.'[72] होळकरांच्या शैलीत म्हटले की, 'मग त्यांनी आम्हाला त्वरेने निरोप पाठविला की, आमच्या कुटुंबाला युध्दभुमीतुन सत्वर घेऊन जावे मग भाऊसाहेब हत्तीवरुन खाली उतरले आणि बसंत नावाच्या घोडीवर स्वार झाले. आणि त्यांनी शत्रुवर चाल केली. आपणही लढावे आणि रणांगणावर जीव द्यावा. हेच आम्हाला इमानीपणा वाटले. पण भाऊसाहेबांनी दिलेली आज्ञा आठवली. तिचे पालन करणेच श्रेयकर होय. हे आम्ही जाणले.'[73] महंमद जाफर, शामलु इराणच्या बादशहाच्या पदरी असुन तो स्वत: पानीपत प्रसंगी हजर होता. तो लिहितो 'जनकोजी आणि मल्हारराव हे मातब्बर मराठा सरदार होते. तो लिहितो 'जनकोजी आणि मल्हारराव हे मातब्बर मराठा सरदार होते. आपल्या लाख स्वारानिशी ते निर्धाराने शहापसंत खानाशी झुंजत होते.'[74] वरील टिपणावरुन

---

68. रा.खं. १ ले. १57
69. ऐ. प्र. पा. 85
70. भा. ब. पा. ११3
71. भा. ब. पा. १35
72. हो. कै. पा. 32
73. पा. सं. भा. १ पा. 40
74. पा. सं. भा. १ पा. १2१

मल्हारराव लढला नाही असे म्हणता येणार नाही.[75] ब-हाणपुरास गेल्यावर पेशव्याने होळकर, शिंदे, पवार यांचे देशचे महाल जप्त केले. व होळकरास जिव्हारी लागेल असे पत्र लिहिले. होळकरानी पानिपतावर कुचराई केली म्हणून जप्ती झाली असे म्हणता येणार नाही. कारण एकटया होळकरांचे महाल जप्त होते तर असे म्हणता आले असते.[76] जप्तीत पवार, शिंदे असुन त्यांनी कुचराई केली नव्हती. पुरंद-यांनी नानासाहेबाचे पत्र हाती पडल्यावर त्या पत्रासोबत गंगोबा तात्या चंद्रचुड यास पत्र लिहिले. 'या पत्रातील मजकुर सुभेदारास कळविण्यास चिंता बहुत होतील. याकरिता तुम्ही पत्रातील भाव लिहीत्या अन्वयेच सांगणे जे गोष्टीने खरे न होत ते करावे.'[77] गंगाधर पंताच्या मुलाने रघुनाथरावास लिहिले. 'हिंदुस्थानचो मदार सर्व सुभेदारावर आहे हे आज्ञा पूर्वपासुन सर्व कारभार राव कैलासवासी यांनीही रा. सुभेदाराचेच हाती घेतला. अलिकडे येणेप्रमाणे चालत आले. परंतु अवंदा श्रीमंत शिरोजे होऊन माघारी फिरल्यावर खावंदानी पूर्ण लोभात अंतर केले. चाकरांनी सेवा करावयास अंतर केले नाही. जे लढाईत होते ते सर्व भेटले असतील त्यांनी वर्तमान निवेदन केले असेल. मोडल्या झुंजाची शिफारस कशास लिहावी शिंदे, पवार पूर्वापासून चाकर साहेब कामावर त्यांच्या या गती अशा समयास त्यांची जप्ती नसावी. सुभेदार याजकडील महाल देशचे जप्त केले म्हणुन श्रीमंती येथे लिहिले होते. तेणेकरुन त्यांचे चितास उदासिनता आली. आजपावतो सेवा केली त्याचे फळ हे पुढे केले याहे कळताच आहे. ऐसे वारंवार बोलतात.' खरी कुचराई असती तर इतक्या छातीठोकपणे समर्थन कोणालाच करता आले नसते.[78] मल्हारराव परत आले म्हणून पेशवे त्यांच्यावर नाराज झालेले दिसत नाही. पानिपतच्या पराभवाच्या दीर्घगामी परिणाम मराठा राजकारणावर झाला. नानासाहेब भाऊसाहेबाच्या मदतीला निघाले असतांना त्यांना पानिपतच्या पराभवाची बातमी ग्वाल्हेरजवळ कळली. तेव्हा त्यांनी मराठयांची सत्ता पुन्हा स्थापण्यासाठी मल्हारराव होळकरांना उत्तरेत नेमले . आणि उतरेची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली. बापुजी महादेवास पेशवे लिहितात. ' तहाचा येरव्हिभार सर्व राजश्री मल्हारराव होळकर याजवर आहे. जे ल्याहावयाचे ते तुम्ही त्यास लिहित जाणे ते तुम्हास आज्ञा करतील त्यप्रमे-वर्तणूक करणे.[79] पुरुषोत्तम दामोदरास पेशवे लिहितात. 'मल्हारराव ग्वाल्हेरीस फौजे सुध्दा आहेत. सर्व लहान मोठा व्यवहार त्याजवर आहे. तुम्ही जे सुभेदार

---

75. वि.ध.र. पा. 48
76. पु.द.भा. । पा. 69
77. पु. द. भा. । पा. 62
78. पु. द. भा. । पा. 63
79. हि. द. भा. । ले. 202

आज्ञा करतील त्याप्रणे वर्तणुक करणे.[80] वजिरास ठाकूरास थैल्या याच मजकुराच्या पाठविल्या' मल्हाररावाचे येणे फायद्याचे कसे ते नाना फडणविसांच्या पत्रावरुन स्पष्ट होत. 'मल्हारजी होळकर जिवंत आले यासाठी ग्वाल्हेरीस राहाणे जाहाले. नाहीतर नर्मदा पावेतो ठिकाण नव्हते.[81] शेजवलकर लिहितात ' मरणाने मल्हारबा स्वामीनिष्ठ, शुर, क्षात्रधर्म पाळणारा ठरला असता यात संशय नाही. पण मराठयांचे राज्य 1761 नंतर उत्तरेत कितीसे राहिले असते. याबद्दल शंका वाटते.[82] सारांश त्याने रणांगणात कुचराई केली नाही आणि पराभवालाही तो जबाबदार नव्हता हे दिसुन येते. उलट त्याचे परत येणे मराठेशाहीला हितकारकच ठरले.

मंगरोळ भटवाडाचे युध्द - 29-30 नोव्हेंबर 1761

पानिपतच्या पराभवान राजपुत शिरजोर होऊन मराठयांचे वर्चस्व संपवण्याकरीता जयपुरचा माधोसिंह राजपुताचा संघ बनवु लागला. त्रिंबक फडणीसाने पेशव्यांना लिहिले. ' राजे माधोसिंह यांनी नेणणे मोर्चे लावुन माळव्यातील अंमल उठवावा म्हणुन फौजेसुध्दा चमेलीवर आला. त्याचे पारपत्य न करावे तर माळवा राहणार नाही.[83] माधवसिंगाचा मंगरोळ भारवड येथे मल्हारराव व गंगोबा तात्याने संपुर्ण पराभव केला. याविषयी धनसिंगाने पेशव्यांना लिहिले. 'राजश्री मल्हारराव सुभेदार दरकूच कोटयास जाऊन कोटेकराचो फौज समागमे घेऊन कछवायची फौज बुडविली. राजसिंग घोडचढया जखमी फौज व वलाली फौज यैसे खोपरास लागले आहेत.'[84] ' सुभेदारास जखम लागली तिला बहुत जेर होऊन माघारे फिरले याकरिता ते उजनीतच आहेत.... सुभेदारास आजपावतो आरोग्य नाही बहुत क्षीण तीन महीने स्नान नाही शरीर बहुत तुटलं.[85] या युध्दात शिंदेची फौज सोबत होती. सरकार लिहितात. शिंद्यांच्या फौजेने जोरदार मुकाबला केला. तें म्हणत होते पानिपतचा कलंक धुवुन काढला.[86] पानिपतच्या पराभवाने मराठे कमकुवत झाले असे समजणा-या राजपुतांना मल्हाररावांनी व राणोजींनी मराठयांची गेलेली प्रतिष्ठा सत्ता उत्तर भारतात चंबळपर्यंत पुन्हा प्राप्त करुन दिली.

---

80. हि. द. भा. 1 ले. 205, 210, 211
81. ना. पा. र. पा. 25
82. पानि पा. 197
83. के. व्ही. व्हें. 4 पा. 425
84. के. व्ही. व्हें. 4 ले. 27
85. के. व्ही. व्हें. 4 ले. 37
86. फॉल. व्हें. 2 पा. 361

आणि मराठे प्रबळ असल्याचे राजपुतांना पुन्हा प्रत्ययास आणुन दिले. याविषयी सरकार लिहितात. ' पानिपतानंतर अवघ्या बारा महिनयाच्या आत राजपुतांना परिस्थिती प्रतिकुल झाली. एकमेव वयोवृध्द मलहाररावांचे हे होळकराचेचे हे कर्तृत्व होतं.' 87 तर युध्दाविषयी ते लिहितात. ' या युध्दाने निर्णय झाला. मराठयांच्या विरोधात संघ बनवायला राजपुतांना सधी मिळाली नाही. पानिपतने गेलेली मराठयांची प्रतिष्ठा पुन्हा स्थापन झाली.' 88 पानिपतनंतर हताश, मरगळलेल्या मराठयांना हा विजय संजीवन, नवजीवन देणारा आशादायक ठरला. उत्तरेचा मार्ग सुरक्षित राहुन पुन्हा वर्चस्व उत्तरेत निर्माण करता आले.

## नानासाहेब पेशव्यांचा मृत्यु (23 जुन 1761)

पानिपतातील दुःखद घटनामुळे पेशव्यांच्या मनावर जबरदस्त आघात झाला. कित्येक दिवस ते भ्रमिष्टासारखे वागत होते ते सतत चिडचिड करीत असत. रागाचे त्यांना झटके येत.89 12 जुन रोजी नानासाहेब शनिवार वाडयातुन पर्वतीवर रहायला गेले आणि तिथेच त्यांचा 23 जुन 1761 ला पहाटे मृत्यु झाला. पानिपतच्या पराभवाचा सर्वात महत्वाचा परिणाम म्हणजे पेशव्याचा मृत्यु झाला हा होय.

## माधवरावांना पेशवाईची वस्त्रे मिळाली - 17 जुलै 1761

पानिपतच्या पराभवाच्या आघातानेच नानासाहेबांचा मृत्यु 23 जुन 1761 ला झाला. त्यांच्या मृत्युनंतर त्यांचा दुसरा मुलगा माधवराव याला 17 जुलै 1761 रोजी पेशवाईची वस्त्रे मिळाली. यावेळी माधवरावाचे वय अवघे 16 वर्षाचे असल्याने सुरवातीला 3 वर्षे कारभार गोपिकाबाईचया हाती होता. वयाच्या 18 व्या वर्षी संपुर्ण सुत्रे माधवरावांनी हातात घेतली.

## राक्षस भुवनचे युध्द - 10 ऑक्टोबर 1763

मराठयांच्या पानिपतच्या पराभवाने निजाम शेफारुन त्याने रघुनाथराव व माधवरावाच्या कलहाचा फायदा घेण्याचे ठरविले त्याला ती सुवर्णसंधी मिळाली चुलत्या पुतण्याचे तर आळेगाव येथे प्रत्यक्ष युध्द झाले.90

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

87. फॉल. व्हॅ. 2 पा. 364
88. फॉल. व्हॅ. 2 पा. 364
89. मराठयांचा इतिहास - डॉ. शरद कोलारकर
90. मा. पे. श. पा. 397

पेशव्याने सखाराम बापूच्या साहयाने निजामाशी गनिमी काव्याने लढण्याचे ठरविले. गनिमी काव्याचे भीष्माचार्य मल्हाररावाची गरज पडल्याने माधवराव स्वतः त्यांना आणायला गेले. व मल्हारराव मोहिमेत सामील झाले.[91] निजामाच्या पक्षात सामील झालेल्या सरदारांना फोडण्याची त्यांची समजुत घालुन मोगलांच्या कटातुन फोडुन इकडे आणण्याचे काम सर्व सरदारांनी मल्हारराव होळकरांच्या गळयात घातले. त्यांच्या इतका जुना, वजनदार सरदार दुसरा कोणीच राहिला नव्हता.[92] मल्हाररावांनी निजामाकडे गेलेल्या गोपाळराव पटवर्धन, मोरोबा फडणीस, पिराजी नाईक व भोसलेंना परत आणले.[93] 10 ऑक्टोबर 1763 रोजी राक्षसभुवन येथे युध्द होऊन त्या युध्दात निजामाचा पराभव झाला. माधवराव लिहितात. 'पुर्वी दोन तीन लढाया झाल्या परंतु मोगलास या त-हेची जरब कधीच बसली नव्हती.[94] पानपताने हताश न होता मराठयानी पुन्हा कंबर बांधली या कामात श्रीमंत थोरले माधवराव साहेब व सुभेदार मल्हारराव होळकर हे अग्रगण्य होते.[95] माधवरावांनी दक्षिण पत्करली आणि सुभेदार साहेबांनी उत्तर हाती धरली.[96] सन 1761 पासुन तो 1766 पर्यत म्हणजे आयुष्याच्या शेवटच्या घडीपर्यंत त्यांनी उत्तरेचे राजाला समर्थपणे धरुन मराठयांची घडी पुन्हा पूर्ववत बसवुन दिली.[97]

### कुराच्या मैदानात पराभव -

इंग्रजाविरुध्द मल्हाररावाला अयोध्येचा वजीर सुजाउद्दौला याने मदत मागितली. मल्हाररावाने त्याला मदत करुन आपल्या जुन्या तंत्राप्रमाणे गनिमी पध्दतीने मुकाबला केला पण तोफा व बंदुकापुढे कुराच्या मैदानात मल्हाररावांचा टिकाव लागला नाही.[98] आणि त्यांना माघार घ्यावी लागली. मल्हाररावाचा हा पहिला आणि शेवटचा पराभव ठरला. वास्तविक मराठयांनी बदलत्या परिस्थितीशी समन्वय साधुन भाला व तलवार ही जुनीशस्त्रे कालबाहय झालीत याची जाण ठेवन नवीन पध्दती, शस्त्रे, तोफा व बंदुका आत्मसात करायला पाहिजे होत्या. मल्हाररावासारख्या श्रेष्ठ सेनानीला हे कळले नसेल असे म्हणता येणार नाही पण वय झाल्यामुळे आता

---

91. मा. पे. श. पा. 402
    ऐ. ले. स. पा. 212
92. ऐ. ले. स. पा. 290
93. पु. द. भा. 3 प्र. पा. 35
94. पु. द. भा. 3 प्र. ले. 339
95. वा.पा.ठाकुर हो.शा.3 पा. 296 भा.2
96. वा.पा.ठाकुर हो.शा.3 पा. 296 भा.2
97. वा.पा.ठाकुर हो.शा.3 पा. 296 भा.2
98. भा.पे.श. पा. 421

त्यांच्यात पूर्वीची उमेद राहिली नव्हती. त्यांचे वय 72 वर्षाचे होते.[99] त्यांनी महादजींना मदतीस येण्याचे लिहिले. महादजी लिहितात 'कोटेकराकडील मातब्बर माणुस आले आहेत. येथील मामलत जालियावर होळकराकडे जावे लागले. तिकडील ही पत्रे आलीत की फिरंगियाची व यांची लढाई जाली. होळकर माघारी काल्पीस येऊन दाखल झालेत. त्याजकडेही त्वरेने जावे लागले तिकडीलही राजकारण भारी आहे.[100]

**मल्हाररावांचा मृत्यु - 20 मे 1766**

इ.स. 1766 मध्ये दुस-यांदा मराठयांनी उत्तर मोहीम आखली. या मोहिमचे नेतृत्व रघुनाथराव दादाकडे होते. होळकर, शिंदे ही सोबत होते पण याच वेळी मलहाररावांना कानाची व्यथा झाली. अनेक उपाय करुनही दुखणे बरे होत नव्हते. सदाशिव गंगाधर व विष्णु महादेव लिहितात. ' उदईक भेटीचा मुहूर्त आहे. आगाऊ राजश्री महादजी शिंदे दर्शनास येतील तदोत्तर राजश्री सुभेदारही भटीस येतील........ राजश्री सुभेदाराच्या कानाला तिडिक बहुत आहे. शरीर स्वस्थ नाही. फौजेत उभे राहुन भेट घ्यावी यैसे शरीर स्वस्थ नाही.[101] आणि शेवटी याच दुखण्यात झांशी जवळ आलमपुर येथे 20 मे 1766 रोजी मल्हाररावांचा मृत्यु झाला. त्यापुर्वी त्यांनी महादजी व रघुनाथरावांची भेट करुन दिली.[102] मल्हाररावांसोबत त्यांच्या पत्नी द्वारकाबाई व बजाबाई सती गेल्या. यावेळी रघुनाथरावांनी मल्हाररावांचा अंत्यसंस्कार व इतर विधि वर 2 लाख खर्च केलेत आणि आलमपुरचे नाव मल्हार नगर ठेवले.[103] इतकेच नव्हे तर पेशव्यांनी त्यांच्या समाधी करिता 15 गावाचे उत्पन्न लावले.[104] आजही मल्हाररावांचे स्मारक शिल्पकलेने युक्त असून त्या देवळात मल्हारराव व त्यांच्या दोन पत्नींच्या प्रतिमा आहेत.

**कारभार मालेरावाला - वर्ष 1766**

मल्हाररावांच्या मृत्युनंतर त्यांच्या मुलाचा खंडेरावांचा मुलगा मालेरावाच्या हातात इंदोरचा राज्यकारभार आला. पण या मालेरावाला बेडाचे झटके येत. प्रवृत्तीने तो दृष्ट होता. भालेराव वक्रबुध्दीचा,

---

99. हो.इ.सा. भा. 1 ले. 1
100. रा.ख. 13 ले 15,22
101. रा.ख. ले 131
102. हो.कै. पा. 41
103. हो.इ. भा. 2
104. हो. इ. भा. 2

व्यसनी दुराचारी आणि वेडसर होता.[105] अहिंल्याबाईनी ब्राम्हणास दिलेल्या जोडयात व शाली मध्ये तो विंचु घालुन ठेवीत असे. ते विंचु इंगळया ब्राम्हणास चावुन ते कळवळु लागले म्हणजे तो फिदीफिदी हसुन टाळया वाजवायचा.[106] एका दासीचा यांत्रिकाशी संबंध असल्याच्या नुसत्या शंकेने त्याने त्या यांत्रिकाला असंख्य इंगळया डसवुन व चाबकाने मारुण प्राण घेतला. तो यांत्रिक मरतांना कळवळुन ओरडला. 'मी निष्पाप आहे. मला निरपराध्याला मारु नको पुन्हा पुन्हा विनवितो. पण दृष्य ! तु ऐकत नाहीस. मी जातीचा मांत्रिक तुझा सुड होईन. भूत होऊन उरावर बसेन.'

त्याच दिवे लागणीला मालेरावाच्या अंगात ज्वर भरला. शरीराची नसनस तुटू लागली. मस्तक तडकु लागले. घातात तो अस्ताव्यस्त धावू लागला. वाचवा, वाचवा म्हणून लोळण घेई. तर मध्येच डोक फोडून घेई. त्याची अवस्था पाहुन बाईचा जीव कळवले पण मालोजीची पापेच इतकी की पुण्यश्लोक मातेच्या पुण्यराशी थिटया पडल्या. आणि पापाचा घडा पुर्ण भरता क्षणीच मालेरावाने 27 मार्च 1767 ला जीव सोडला.[107]

**राघोबा दादाची आगळिक -**

मालेरावाचा मृत्यु झाल्याने होळकरांचे घराण्यास वारस नाही या सबबीवर तेथील सरदारकी आपणच बळकावून दौलत हडपावी अशी इच्छा रघुनाथराव दादांना झाली. गंगाधर यशवंत चंद्रचुड हा होळकरांचा कारभारीही त्यांना सामील झाला. पण अहिल्याबाई ही खंबीर होती. तिने माधवराव पेशव्यांना कळविले.[108] तेव्हा माधवरावांनी लिहिले. 'तुमचे दौलती विषयी पाप बुध्दी ठेवील त्यांचे पारिपत्य बेलाशक करावे.'[109] दादा फौजेसह चालून येतो म्हणुन तिने तुकोजीस फौजेसह मुख्य नेमले. गंगोबाची हकालपट्टी करुन नारो गणेशास कारभारी नेमले. तुकोजी होळकरास ताबडतोब येण्याची आज्ञा केली. भोसले, दाभाडे, गायकवाडास मदतीला येण्याची पत्रे लिहिली.

---

105. धर्म भास्कर मे-जुन 1975 अंक 1-2 पा. 94
106. धर्म भास्कर मे-जुन 1975 अंक 1-2 पा. 94
107. धर्म भास्कर मे-जुन 1975 अंक 1-2 पा. 27, 97,
108. हो. इ. सा. भा. 1 पा. 163 ते 13
109. त. रि. वि. 4 पा. 205
ही. कै. खं. 6 पा. 32

महादजीला दादाने इंदूरवर चालुन जाण्यास सांगितले. तेव्हा ते म्हणाले. 'मी जातीने पेशव्यांची पाहिजे ती चाकरी करावयास तयार आहे. पण या कामास मी आपली तलवार लावणार नाही.[110] भोसले, गायकवाड उघड-उघड अहिल्याबाईस सामील झाले. त्यामुळे दादांचा बेत फसला. आज तिच्यावर प्रसंग आहे. उद्या आपल्यावरही बेतेल हे लक्षात घेऊन सर्व सरदारांनी अहिल्याबाईंना मदत केली. आणि एका वेळी मल्हाररावांनी महादजींना दादाच्या रागापासून वाचविले त्या उपकाराची फेड ही अशा बिकट प्रसंगी त्यांनी केला.[111]

### तुकोजीस सुभेदारीची वस्त्रे -

ता. 3-6-1767 रोजी दादा तुकोजींना लिहितात. 'मालेराव होळकर मृत्यु पावले. त्यास सरदारीचा बंदोबस्त पूर्ववत प्रमाणे तुमचा तुम्हाकडे सांगुन, पेराजी कै. मल्हारराव होळकरांकडे सरंजाम, नवाजुना, वतनी, इनामी दरोब्यस्त चालत आल्याप्रमाणे तुम्हाकडे करार असे सेवा एकनिष्ठेने करीत जाणे.[112] याबद्दल दादाने 16 लक्ष 62 हजार रुपये तुकोजीकडून नजराणा घेतला.[113] दादाचा हा हुकूम मान्य होईल की नाही याची शंका वाटुन तोच करार मागाहुन ता. 21-8-1776 रोजी तुकोजींनी थोरल्या माधवराव पेशव्याकडून ताजा करुन घेतला.[114] तुकोजी होळकरांचे पूर्ववृत्त पुढच्या प्रकरणात देण्यात येईल.

---

110. हो.कै.ख.6 पा. 206 म.रि.वि. 4 पा. 206 सरदेसाई
111. डॉ. राम इंगळे, मल्हारराव महादजी पा.58
112. म. रि. 3 वि. 2 पा. 7 सरदेसाई
113. यो. माधवराव रोजनिशी - 1 ले 175, 176
म.रि. 3 वि. 2 पा. 7, 8
114. पे. द. पा. 210
म. रि. 3 वि. 2 पा. 8

******

## प्रकरण 2 रे

1) मल्हाररावाचा मृत्यु 20 मे 1766
2) मालेराव होळकर दौलतीचे वारस
3) दादासाहेबांचा डाव फसला
4) तुकोजींचो हयातवारी
5) दुहेरी राज्यव्यवस्था
6) तुकोजीचे दत्तविधान
7) होळकरांस पेशव्याकडून सनद 18/5/1767
8) तुकोजीस सुभेदारांची वस्त्रे
9) अहिल्याबाई आणि तुकोजी होळकर
10) अहिल्याबाईच्या मनात विकल्प
11) महालाच्या बंदोबस्तात मतभेद
12) श्रीमंताची मध्यस्थि
13) तुकोजी-अहिल्याबाई यांच्या बेनबावाचे कारण
14) नथ्याला फणसे दत्तक घेण्याचा ठराव 8/8/1779
15) नारो शिवदेव, सदासिव दिनकर व बापूराव वैद्यांची मध्यस्थि
16) तुकोजीचे अहिल्याबाईस न भेटता प्रयाण
17) सुलतानचो लांबहातेचो मध्यस्थि
18) अहिल्याबाईची तक्रार
19) श्रीमंताची मध्यस्थि
20) अहिल्याबाई-तुकोजी वादात महादजी शिंदे व नाना फडणीसांची शिष्टाई
21) तडजोडीचे विफल प्रयत्न
22) देवराव हिंगणेची शिष्टाई
23) राज्यकारभारात तुकोजी-अहिल्याबाई संबंध
24) अहिल्याबाईचा मृत्यु - 13 ऑगस्ट 1795.

*****

# प्रकरण - 2 रे

## 1) मल्हाररावांचा मृत्यु - 20 मे 1766.

इ.स. 1765 मध्ये मल्हारराव, रघुनाथराव दादासाहेब उत्तरेत मोहिमेकरिता गेले होते. वाटेतच झाशीजवळ आलमपूर या ठिकाणी मराठयांचा तळ असतांना कानाच्या विकाराने 20 मे 1766 रोजी मल्हाररावांचा मृत्यु झाला.[1] त्यांच्या पत्नी द्वारकाबाई आणि बजाबाई सती गेल्या. आलमपूरचे नांव मल्हारनगर ठेवले. रघुनाथरावांचे अंत्यसंस्कार केले. त्यावर 2 लाख रुपये खर्च केले. त्याठिकाणी शिल्पकलेनी युक्त असे स्मृती मंदिर उभारले. त्या मंदिरात मध्यभागी मल्हाररावाची आणि दोन्हीकडे बजाबाई आणि द्वारकाबाईची प्रतिमा आहे. पेशव्यांनी या छत्रीच्या खर्चाकरिता 15 गांव लावून दिले. (1) आलमपूर, (2) खरीपा, (3) खुजया, (4) रंतरापूर, (5) गेयरी, (6) मूरधर, (7) जनापूर, (8) बेलवा, (9) भेंडरी बीडा, (10) रतनपूरा खुर्दा, (11) देहे, (12) गंगापूरा, (13) साईपूरा, (14) अरचर, (15) भाडेर.[2]

## 2) मालेराव होळकर दौलतीचे वारस -

मल्हाररावांच्या मृत्युच्या वेळी दादासाहेब महादजी शिंदे व मालेराव बाबा जवळच होते. मृत्युसमयी सुभेदारांनी मालेराव बाबाचा हात दादासाहेब व महादजी शिंदे यांचे हातात दिला.[3] त्यावेळी तुकोजी होळकरांनी उभे राहुन विनंती केली की, ' मी चाकर मनुष्य माझे हात बाबासाहेबांच्या हातात देऊन सर्वोपरी निर्वाहाची सोय करावी, ते न होता हे काय ? तेव्हा सुभेदार म्हणाले की, ' माझे नांद व श्रीमतांची चाकरी तुच करशील ' असे बोलून समाप्ती झाली.[4]

---

1) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, 4.28 खंड-6, पा. 28.
2) चंद्रचुड दप्तर 104/97, 98, 105, 98/99, 167.
3) म. रि. 3 वि. भा. 2 पा. 8
4) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पा. 28, खंड-6.

सुभेदाराची उत्तरक्रिया त्याच ठिकाणी झाली. दहाव्या दिवशी पिंडास कावळा शिवेना तेव्हा दादासाहेबांनी मालेराव बाबा कडून पाणी सोडविले की, जाटाचे पारिपत्य करीन. पिंडास कावला स्पर्श करीना मग दादासाहेबांनी जातीने उदक सोडले तरी काऊ स्पर्श झाला नाही. मग महादजी शिंदेकडून पाणी सोडविले तरी कावळा पिंडास शिवेना [5] शेवटी तुकोजीकडून पाणी सोडविले. उदक सोडताच स्पर्श जाहला.[6] सर्वास आश्चर्य वाटले. सर्व क्रिया कर्म आटोपल्यावर त्या ठिकाणी मल्हाररावाची छत्री बांधली. पण त्यानंतर गादीवर आलेला मालेराव अल्पायू ठरला. दि. 27 मार्च 1767 ला मालेरावांचा मृत्यु झाला.[7] त्यांच्या सोबत त्यांच्या दोन बायका सती गेल्या.[8]

### 3) दादासाहेबांचा डाव फसला -

मालेरावाच्या मृत्युनंतर होळकरांच्या घराण्यास वारस नाही. या सबबीवर होळकरांची दौलत घशात घालण्याचा रघुनाथरावांचा डाव होता. त्यांना होळकरांचा कारभारी गंगाधर यशवंत चंद्रचुड यांचे सहाय्य होते. मालेरावासोबत दोघी बायका सती गेल्या.

अहिल्याबाई मुलाच्या मृत्युने दुःखात बुडाल्या असता होळकरांचा कारभारी गंगाधर चंद्रचुडाने कारस्थान रचून श्रीमंत रघुनाथराव दादाला होळकरांच्या सरदारीला कुणीही वारस नसल्यामुळे ही सरदारकी आपण घ्यावी असे कळवून रघुनाथराव दादाला पूर्ण सहाय्य करण्याचे वचन दिले.

गंगाधर यशवंताचे हे कारस्थान शिवाजी गोपाळ व राजाराम रणसाडे, निसबत रावजी, महादेव फडणीस ., यांना समजले. त्यांनी हरकूबाई व उदाबाई वाघमारे (सुभेदाराची

---

5) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पा. 28
6) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पा. 28
7) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पा. 28
8) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, पा. 28

कंन्या) मार्फत हे कारस्थान अहिल्याबाई साहेबांच्या कानी घातले. या गोष्टीचा घरबंद आजपासून केला असता सोईस पडेल नाही तरी तुम्हास घोडयाचे दाणे भरडावे लागतील आणि तुम्हांस भीक मागावे लागेल.[9] त्यांस त्यांनी उत्तर केले की, शोकाचे गाठोडे एकीकडे ठेवून हिम्मत धरावी. सरंजामी व इतलखी यासी जासूद पाठवून जमा करावे. भोसले दाभाडे, गायकवाड यांना सांडणी स्वरासोबतच पत्राच्या खानग्या व्हाव्या की, कै. सुभेदारांनी श्रीमंताचे दौलतीचा पाया खोदून वीट आपले हात टाकून इमारत उभी केली. त्यास त्या प्रसंगी आम्हावरी ईश्वरी गजब ते पक्षी दौलत जमवून आम्हास हमराई करुन सेवा चाकरी घ्यावी ते एकीकडे राहोन. दौलतीविषयी पापबुध्दी धरली आहे त्यांस आमचे जसे असेल तसे आम्ही भोगू. परंतु आज आम्हावरी उदया तुम्हावरी हीच गोष्ट आहे. यांचा विचार करुन फौज मदतीस पाठवावी.[10] अशी पत्रे सर्व लहान मोठया सरदारांना पाठविली.

हया वेळी होळकरांच्या गादीवर कोणास बसवावे हा मोठा प्रश्न सर्वासमोर होता. अहिल्याबाईच्या घरातील त्यांचा नातु नथ्थाबा फणसे हाच एकमेव वारस होता. नथ्थाबा वयाने लाहन होता. अहिल्याबाईची मुलगी मुक्ताबाई हीचा नथ्थाबा मुलगा होता. पण हयावेळी गरज कारभार सांभाळणारा कर्तृत्वात योग्य अशा वारसाची असल्याने सर्वानुमते तुकोजीनाच सुभेदाराची वस्त्रे द्यावीत असे ठरले. शिवाय मल्हाररावांनी मृत्युसमयी मालेरावांचा हात तुकोजी होळकराच्याच हातात दिला होता. तुकोजी होळकरांनी जाटाचे पारिपत्य करेन असे म्हणून पाणी सोडताच कै. मल्हाररावांच्या पिंडास कावळयाने स्पर्श केला आणि म्हणूनच तुकोजी होळकरानांच गादीवर बसविणे योग्य होईल.

तुकोजी होळकरांना निरोप कळताच ते लगबगीने येऊन पोहोचले. तुकोजी सहावे रोजी तृतीय प्रहरी दाखल जाहले. त्याच क्षणी अभ्यंत्र स्नान घालून मुहूर्त अथवा कोणांस विचारणे काही एक न करिता वस्त्रे देवून गाडराखेंडी येथे डेरे उभी करुन तुकोजी यास

---

9) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने - खंड 6.
भागवत अ.ना.पृ.30

10) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने - खंड 6
भागवत अ.ना.पृ.30

दाखल केले. त्याच दिवशी हजार स्वार हुजरात व पंधराशे सरंजामापैकी व पाचशे बाणाची कैची व सातशे जंबु-याचे उंट इतकी जामियत प्रहर रात्रीचे आत दाखल केले.[11] भोसल्याच्या फौजेने हुशंगाबाद जवळ रेवा नदीच्या दक्षिण तिरी छावणी केली. गायकवाडांचीही वीस हजार फौज आली. महादजीला दादाने इंदूरवर चालून जाण्यास सांगितले. तेव्हा ते म्हणाले ' मी जातीने पेशव्यांची पाहिजे ती चाकरी करावयास तयार आहे. पण या कामास मी आपली तलवार लावणार नाही.[12] बाकी सरदारांचीही पत्रे आलीत की, मल्हारजी होळकरांचा उपकार नाही असा कोण आहे. प्रसंगास आपले जवळच समजावे. सर्व सरदार अहिल्याबाईच्या मदतीला आल्यामुळे राघोबांचा बेत फसला. माधवराव साहेब श्रीमंत यांना ही सविस्तर पत्रे गेली होती. त्यांची उत्तरे आली की, तुमचे दौलती विषयी जो पापबुध्दी ठेवील त्याचे पारपत्य बेलाशक करावे. व तुम्हाकडील मुखत्यार दोघे हुजुर पाठवावे.[13] तेव्हा दाभाडे व गायकवाडांच्या खर्चाची तरतूद करुन नाक्यावर सोय केली. याचवेळी दादासाहेब गंगाधर पंतासह 50,000 फौजेनिशी उज्जैनीत येऊन अंकपातावर मुक्काम केल्याचे समजले. हे वर्तमान तुकोजींना कळताच मोतोश्रींना नमस्कार करुन रात्रीतूनच दत्ताचे आखाडयावर जाऊन पडले.

दुस-या दिवशी दादासाहेब फौजेनिशी क्षिप्रा नदीच्या तीरावर आले. हे पाहताच तुकोजींनी त्यांना निरोप पाठविला. क्षिप्रा उतरला असता तुमची आमची तलवार चालेल. याचा विचार करुन पाऊल टाकणे.' [14] तेव्हा सर्व परिस्थिती विपरीत झालेली पाहुन दादासाहेबांनी नमते होऊन तुकोजीकडे निरोप पाठविला. ' मालेराव बाबा वारले यास्तव मातंग पेशिस येत असता तुमचे बुध्दीस विपर्यास घेऊन वाकडी गोष्ट सांगावयाचे कारण काय ?[15] ' आपण पालखीतुन बसुन इकडे यावे. ही फौज घरदार दौलत आपले वेगळे काय आहे ? असा

---

11) होळकर शाहीच्या इतिहासाची साधने खंड-6, भागवत अ.ना. पा. 30
12) म.वि. पृ.206 डॉ. राम इंगळे, मल्हारराव, महादजी
13) हो.शा.इ.सा.6 पा. 32
14) हो. शा. इ. सा. 6 पा. 32
15) हो. शा. इ. सा. 6 पा. 32

उलट निरोप पाठविला. तेव्हा होळकरांच्या मनातील संशय दुर करण्याकरीता त्याचवेळी 5.10 सरदार शार्गीदासह पालखीत बसुन अहिल्याबाई साहेबांच्या भेटीस आले. बाईसाहेबांच्या तेजापुढे दादा निस्तेज पडले. शेवटी एक महिना मुक्काम करुन तुकोजी होळकरास वस्त्रे दिलीत.[16] उज्जैनीला परत जाऊन सत्वासच्या घाटमार्गे देशी गेले.

**4) तुकोजींची हयातवारी -**

तुकोजीचा जन्म इ.स. 1725 चा आहे. अहिल्याबाई होळकरांचाही जन्म त्याच वेळचा म्हणजे इ.स. 1725 चा असावा. म्हणजेच तुकोजी आणि अहिल्याबाई समवयस्क असले पाहिजे.[17] तुकोजी मल्हारराव बरोबर मोहिमेत असायचे. सन 1769 पासून पाच वर्ष ते महादजी शिंद्या बरोबर दिल्लीकडे असून सन 1774 मधे दक्षिणेत आले. ते सन 1778 पर्यंत इकडेच पेशव्याच्या मोहिमांवर होते फक्त 1780 मधे गुजराथ मोहिमेनंतर पावसाळयात काही महीने इंदुरास होते. सन 1787 मधे उत्तरेस गेल्यानंतर एकदम खर्ड्याच्या स्वारीच्या प्रसंगी दक्षिणेत बोलावल्यावरुन सन 1794 मधे तुकोजी पुण्यात आले. आणि तेथेच दि. 15/8/1797 रोजी मृत्यु पावले. ही तुकोजीची अगदी थोडक्यात हयातवारी[18] असून आता त्यांच्या हयातीचा संपूर्ण विस्तीर्ण कालपट अभ्यासुन त्यांच्या कार्याचा आढावा घ्यावयाचा आहे.

प्रश्न असा की, मल्हाररावाचा नातू मालेराव वारल्यावर होळकराच्या गादीला वारस कोण ? हया दौलतीची मालकी स्वत: अहिल्याबाईनी स्वीकारली की, ती स्त्री असल्यामुळे तुकोजीला दत्तक घेवुन त्याच्या नावे कारभार चालविला. याचा निकाल उपलब्ध पुराव्यावरुन करावयाचा आहे.

---

16) हो. शा. इ. सा. भा. 6 पा. 32
17) मराठी रियासत 3 वि. 2 गो.स.सरदेसाई पा.।
18) मराठो रियासत 3 वि. 2

सरकारी कागदात तुकोजीरावांचा पहिला उल्लेख सन 1750 त येतो. म्हणजे नानासाहेब पेशव्यांच्या कारकिर्दीचे प्रारंभासच ते पुढे येतात. मल्हारराव हे सुभेदार झाले होते. त्यांच्या हाताखाली तुकोजीराव वाढत होते. आणि सन 1750 च्या सुमारास त्यांच्या हातुन काही भरीव चाकरी घडली असणार. सन 1760 मधे अहमदनगर जिल्हयात कोळयांनी मोठी बंडाळी केली होती. चिता बिमोड तुकोजीरावांनी मोठया शिताफीने केल्याचा उल्लेख त्या जिल्हयाचा ग्याझिटीवर मधे केलेला आहे. (सन 1770) [19]

तुकोजी होळकरांचा उल्लेख मल्हारराव होळकरांसोबत राजपुताण्याच्या स्वारीत आढळतो. तत्पुर्वी भवानी शंकर बक्षीच्या रोजनिशीत ही तुकोजीबद्दलचा गोषवारा दिला आहे. ' मल्हारराव बडि साहेबांकडे अधिकारी झाल्यावर त्यांनी आसमंतातून आणखी लोकांची जमवाजमव केली. नंतर तो मौजे वाफगावी तुकोजीराव होळकर रहात होता त्याजवळ गेला. तुकोजीराव होळकर हा ही दहा स्वार आपले बरोबर घेऊन त्याजजवळ चाकरीस राहिला. तो मौजे पूर (पोर) गावी गेला तेव्हा संताजी होळकर व रोडाजी होळकर त्याचे (तुकोजीचे) बंधू हे ही मग त्यांच्याजवळ चाकरी करिता येऊन राहिले. [20]

जयपूर वाल्याचे पाऊल मागे पडताच मल्हारजी बुंदी कोटेवाले यास भेटून खातरतसलीम करुन इंदुरला परत आले. आणि पाच हजार फौज सोबत देऊन तुकोजीस माळव्याच्या बंदोबस्ताकरिता पाठविले. [21] तुकोजी होळकर फौजसुध्दा मेवाडात गेले. अलीकडे मंदसोरात वस्ती फार करुन मेवाल्याची मेवाल्यांशी व कोतवालाशी कलह होऊन मेवाली यांनी चढाई करुन कोतवाल यांचे डोके गादीवर कापले. हे वर्तमान थालनेर मुक्कामी समजताच सुभेदार हजार स्वारानिशी धाऊन तिसरे दिवशी मंदोसरास आले. तेव्हा मेवाली सुभेदारास शरण येऊन पन्नास हजार रुपये नजर दिले. [22]

---

19. हो. शा. ई. 1 वा.वा.ठाकुर पृ.6
20. होळकर शाहीच्या इतिहासाची साधने, खंड-5 भागवत अ.ना. पृ.4-5
21. हो.शा.इ.सा.6 भागवत अ.ना. पृ.24
शि.इ.सा.भा-2 ले.74 पृ.59
22. हो.शा.इ.सा. भागवत अ.ना.6 पृ.24
हो. कैफियत 6 पृ.24

इ.स. 1757 मधे रघुनाथराव व मल्हारराव होळकर उत्तरेस मोहिमेवर गेले असता दुआबात मराठयांचा अंमल बसवुन रघुनाथराव दादा व मल्हारराव 8 मार्च 1758 ला सरहिंदला पोहचले. तेथे त्यांनी अब्दालीचे सरदार अब्दुरुसमदखान व जंगबाज खानाला कैद केले. त्यानंतर लाहोरला जाऊन तैयुर व जहानखानाला पराभव करुन पिटाळून लावले. मराठयांच्या फौजा तुकोजी होळकर व साबाजी शिंदे सोबत अटकेपर्यंत जाऊन मे 1758 ला तेथे झेंडा लावला. लाहोरचा कारभार आदिनाबेगवर सोपवुन रघुनाथरावदादा व मल्हारराव दक्षिणेत परतले.[23] यावरुन तुकोजी होळकर 1760 नंतर मल्हारजी सोबत स्वा-यांवर जात होते. आणि अनुभव मिळवित होते. तुकोजी मल्हाररावांजवळ काम करीत होते. आपल्या कर्तबगारीने व स्वभावाने स्वामीभक्तीने तुकोजीने मल्हाररावांचा विश्वास व प्रेम संपादन केले आणि म्हणुनच कदाचित आलमपूर मुक्कामी मल्हाररावांचा मृत्यु झाला. त्यापुर्वी त्यांनी भालेराव बाबांचा हात विश्वासापोटीच तुकोजींच्या हातात देऊन समाधानाने प्राण सोडला असावा

तुकोजी होळकर घराण्यातीलच होते. पण ते मल्हारजीच्या किती जवळचे वा दुरचे होते याचा यांग लागत नाही. भागाहून तयार झालेल्या वंशावळीत तुकोजींचा सबंध मल्हाररावांसोबत किती जवळचा ते लक्षात येतं.[24]

5) **दुहेरी राज्यव्यवस्था -**

मल्हाररावांच्या मृत्युनंतर सर्व राज्यकारभार स्वतः अहिल्याबाई जातीने करित होत्या. लष्करी कामगिरीवर मात्र तुकोजींना पाठवित होत्या. म्हणजेच होळकरांच्या घरात भालेरावाच्या मृत्युनंतर दुहेरी राज्यव्यवस्था स्थापन झाली. अहिल्याबाईच्या मृत्युनंतर मात्र तुकोजी होळकरांच्या दौलतीचे पूर्ण मालक झाले, आणि होळकरांच्या दौलतीचा संपूर्ण कारभार त्यांच्यात वंशात शेवटपर्यंत चालला. तुकोजी स्वतः अहिल्याबाईच्या मर्जीने वागून तिच्या आज्ञेत होते. सहसा तिच्या मर्जीविरुध्द तुकोजी जात नसे.

---

23. पुरुषोत्तम कृत अ.च.
म.री.3 वि. - गो.स.सरदेसाई पा.4

24. पुरुषोत्तम कृत अं.च.
म.रि.3`वि.2 गो.स.सरदेसाई पा.4

अहिल्याबाईनी मुलींचा मुलगा नथ्याचा फणसे यास दत्तक घेण्याचा ठराव पेशव्याशी केला.[25] तेव्हा सर्व सैन्याने कळविले की, तुकोजीराव होळकर हे कैलासवासी मल्हारराव महाराजांचे याजपाशी सर्व कामावर अधिकारी असून कामकाज करित होते. त्याचा सर्वांशी स्नेह व उत्तम वर्तणूक होती. त्यामुळे त्यांच्याशी राजी आहेत व त्यांचे आभारी आहेत. तेव्हा त्यासच संस्थानचे अधिकार देण्यात यावे.[26]

6) **तुकोजींचे दत्तविधान** -

यामुळे तुकोजीचे दत्तविधान पुर्वी झाले की नाही हा प्रश्न उभा राहतो. तसेच नथ्याचा फणसेलाही दत्तक घेतल्याचा एकही पुरावा उपलब्ध नाही, तर तुकोजीसही करतांना स्वतःला मल्हाररावांचा पुत्र म्हणवितात. पेशव्याकडून जाणा-या कागदपत्रास तुकोजीचा उल्लेख ' तुकोजी बिन मल्हाररावजी होळकर ' असाच होत होता.

तुकोजीचा शिक्का अहिल्याबाईच्या (संमतीने) विद्यमानाने ' श्री. म्हाळसाकांत चरणी तत्पर सुत तुकोजी होळकर '[27] असा तयार झालेला होता. ' जेजुरीच्या मंदिरातील एका खांबावरही असाच उल्लेख तुकोजीच्या नावाच कोरलेला होता.'[28] यावरुन स्पष्ट होते की, अगदी शेवटपर्यंत तुकोजी मल्हाररावांचा पुत्रच म्हटला जात होते. अहिल्याबाईनीही यावर कधीही हरकत घेतली नव्हती. आणि त्यांनी तुकोजींना दत्तकही घेतले नव्हते. ते अहिल्याबाईपेक्षा वयाने थोठे मोठे होते. मल्हाररावांच्या मृत्युपुर्वी तुकोजींचे दत्तविधान होण्याचे कारण नव्हते. कारण त्यावेळी त्यांचा वारस त्यांचा नातू (खंडेरावाचा पुत्र) मालेराव

---

25. म.रि.3 वि.2 गो.स.सरदेसाई पृ.4
    हो.इ.सा.5 पृ.5
    भवानी शंकर बक्षी यांची रोजनिशी.

26. हो.इ.सा.5 पृ.5 भागवत भवरारसकर,
    भवानी शंकर बक्षी यांची रोजनिशी.

27. म.रि.3 वि.2 सरदेसाई पृ.6

28. म.रि.3 वि.2 सरदेसाई पृ.6

हयात होते. मल्हाररावांची पत्नी गौतमाबाई जिवंत असती तर दत्तविधान होऊ शकले असते. पण ती त्यांच्यापूर्वीच 66 व्या वर्षी 29 सप्टें 1761 रोजी वारली.[29] त्यामुळे तुकोजींचा दत्तविधानाचा संस्कार शास्त्रोक्त होणे शक्य नव्हते. म्हणून तो केवळ ' मानलेला ' किंवा ' पालक ' पुत्र मानल्या गेला असावा. होळकर कैफीयतीचा आशयही असाच असून दत्तविधान झाल्याचे कैफीयतकारही सांगत नाही.[30] किंवा त्याबद्दलचा एकही पुरावा उपलब्ध नाही. यासबंधात डफचे विधान असे आहे.

" Mallerao's death gave rise to a dispute between Gangadhae Yashwant and Ahalyabai, now lawfull inheritor ".[31]

किंकेडचेही विधान हयाच अर्थाचे आहे. मालेरावांच्या मागे दत्तकाचा अधिकार मालेरावांच्या बायकोला होता. पण दत्तक कोणी व्यक्ती हयातच नसल्यामुळे दत्तविधान झालेच नाही हे सिध्द होते.

तुकोजींचे दत्तविधान झालेले नसल्यामुळे अहिल्याबाई त्यांना मल्हाररावांचा पुत्र मानायला तयार नव्हत्या कारण ता.10/2/1789 रोजी तुकोजींचा पुत्र मल्हाररावांचे लग्न अहिल्याबाईच्या भावाच्या मुलीसोबत (महादजी शिंदे यांच्या लेकीची लेक) झाले. त्यावेळी पिढीचा उच्चार 1 मल्हारराव, 2 खंडेराव, 3 मालेराव होळकर यांचे पुत्र मल्हारराव हयाप्रमाणे ब्राम्हणाकडून बाईनी करविला.[32] हया पिढीच्या उच्चारातुन तुकोजीचे नाव साफ वगळले आहे हे स्पष्ट दिसुन येते.

अहिल्याबाई स्वतःस होळकरांच्या दौलतीची मालकीण समजत होत्या. त्यांनी प्रथम तुकोजीस सरदारीचा मालक करुन त्याजकडून मल्हाररावांचा दत्तकपुत्र म्हणुन कारभार चालविला. खुशालीरामाच्या प्रशस्तीत खालील मजकुर आहे तो यथातथ्य होय.

---

30. म.रि.3 वि.2 सरदेसाई पा.6
31. म.रि.3 वि.2 सरदेसाई पा.6
32. म.द.बा. 2, पा.175
    म.रि.3 वि.2 पा.7

' सा राजनितीपरायणा सुज्ञा स्वकीय राज्यधूर्वहोचिंत स्वकीय गोत्राम्दवं स्वशुरस्य श्रीमंत् मल्लारिरावस्थ तथा स्वस्थापि कृपापात्रं तथैव मंत्रिसामंतं गणसंमतंच विविच्य तुकूजी नामानं वीरोत्तमं स्वराज्यपदे नियोजितवान् (वती)[33]

क्षेत्रोपाध्यायांच्या चोपडयातही तुकोजींचा तसाच उल्लेख आहे. ' काशीबाई बुवाजीची स्त्री सासरे हिंगोजी, आजेसासरे गालोजी पण जे सासरे बाबाजी, दीर नानोजी पुत्र महादजी व तुकोजी होळकर हे सुभेदारास दत्तक '[34]

पुढे वंश नाही असे जाणुन अहिल्याबाईनी जाणोजी बाबांचा मुलगा तुकोजी याजला ओटीत घेऊन गादीवर बसविले ' असे वाक्य सरस्वती मंदिरातील होळकर वंशावळीत आहे.

नारायणरावांच्या मृत्युनंतर इ.स.1773 मध्ये पुण्याच्या कारभा-यांनी होळकर-शिंदिच्या अनेक मागण्या मंजूर केल्या. त्यातील एक मागणी तुकोजींची मल्हाररावांच्या छत्रीस इनाम देण्याबद्दलची ता. 23/3/1777 ची कारभा-यांनी मंजूर केली.[35] यात तुकोजींनी मल्हाररावास ' तीर्थरुप ' असे स्पष्ट म्हटले आहे.

नाना महादजी वगैरे सर्व मंडळी तुकोजींना अनुकुल असल्यसामुळे तुकोजीच मालक अशीच मराठयांची समजुत होती. शास्त्रोक्त विधीयुक्त तुकोजींचे दत्तविधान जरी झाले नसले तरी लौकिक दृष्टया तेच मल्हाररावांचे पुत्र मानल्या गेले. आणि त्यांचा उल्लेखही सर्वत्र तसाच होत गेला. मराठयांची भावनाही तीच होती. हे सर्व ओळखुनच अहिल्याबाईनीही उत्तरोत्तर तुकोजींना दुर साराण्याचा अट्टाहास केला नाही.

---

33. म.रि.3 वि.2.
34. म.रि.वि.2
35. स.मा.रो. । पृ.256 ले.432
    सवाई माधवराव रोजनिशी.

भालेरावांच्या पश्चात तुकोजीच दौलतीचे वारस ठरले. अशीच सर्वत्र भावना होती. कारभार व्यवहारही तसाच चालला. एवढे मात्र खरे की, यथविधी दत्तविधानही झाले नव्हते. छत्रपती शाहु महाराजांच्या पश्चात साता-यास रामराजाचा प्रकार झाला तसाच हा होता.[36]

7) **होळकरास पेशव्याकडून सनद - 18-5-1767.**

' तुकोजी होळकर यास 64 जिल्हेजी वस्त्रे दिल्ही नवी जागीर पौ सामाहाल सरकारात घेऊन दहा लाख लक्ष रुपये करार केले त्या उपरी हाली मनसबा ठरला की गंगाधर, यशवंत व विष्णु महादेव या उभयताचे विद्यमाने नजर पंधरा लक्ष रुपये द्यावे आणि दरोबस्त नवाजुना सरंजामपैकी सिरोज व खरगोण । देवपूर वर्के तीन महाल सरकारात द्यावे व बाकी पुर्ववत प्रमाणे करार करावे.[37]

5 जुन 1767 ' तुकोजी होळकर यांचे नावे जाब की तुम्हास मालेराव होळकर मृत्यु पावले त्यांचे सरदारीचा बंदोबस्त सांगोन ऐवज करार 16,62,000 रुपये येवूण (सोळा लक्ष बासष्ट हजार रुपये) करार केल्यापैकी दहा लक्ष रुपये नजरे पौ सरकार जमा जाहाला असेल म्हणौन '[38]

28/8/1767, तुकोजी होळकर यांचे नांवे सनदकी मल्हारजी होळकर व मालोजी होलकर मृत्यु पावले, त्याजकडे फौजेत सरंजाम प्रांत मालवापैकी हिंदुस्तान पैकी व प्रांत अंतरवेद पैकी व स्वदेश पैकी खुमावजा सरंजाम व वतने व इनामगाव परगणे व महाल मक्ते व कुरणे सुदामत चालत आहे तेच दर मुलकी स्वारी मुले तह पेशवी करार आहे तो व

---

36. म.रि.3 वि.2 प्रा.8

37. पे.द.सरदेसाई यांनी निवडलेले पत्रापैकी अप्रकाशित द.कं.29
प.क्रं. 180 (दि.18/5/1767)

38. अप्रकाशित पे.60 हिंदुस्थान स.न. 204 ता.10 जुन 1767.

सरदारी यांच्या डौलातील कारकुन वगैरे निसबतीच्या लोकाकडे गाव व परगणे चालत आहेत त्यापैकी सरकारात घेतलेले बाकी जुनानवा सरंजाम फौजेचे बेगमिस वतने व इनाम गाव । महाल मक्ते व कुर्णे सुदामत चालत आहे तेच परमुलकी स्वारीमुळे तह पेशजी करार आहे तो व सरदारीच्या डौलातील कारकुन वगैरे मिसबतीच्या लोकांकडे गाव व परगणे चालत आहेत त्या प्रा. तुम्हाला बहाल केले असे इमाने इतबारे वर्तोन बंदोबस्त करीत जाणे म्हणोन सनद.[39]

मालेरावाच्या मृत्युनंतर 28-8-1767 रोजी तुकोजी होळकरांनी मुलुखगिरी करावी आणि सैन्य ठेवावे आणि त्याकरिता माळवा आणि दोआवातील काही प्रदेश लावुन देण्यात आले.

21/8/1766 च्या पत्राप्रमाणे तुकोजी होळकरांच्या नावे सनद की, मल्हारजी होळकर व मालजी होळकर याजकडे फौजेच्या बेगमीसाठी सरंजाम प्रांत माळवापैकी, प्रांत हिंदुस्थान पैकी व प्रांत अंतरखेद पैकी तुकोजी होळकरांचे नावे सनद, परगणे मालवा पैकी मखते कुरणे सुदामत चालत आहे ते व दरमुलकी स्वारी मुले तह पेशवी करार आहे तो व सरदारीच्या डौलातील कारकुन वगैरे निसबत्तीच्या लोकांकडे गांव व परगणे चालत आहे..........एकनिष्ठेने सेवा चाकरी करीत जाणे म्हणोन सनद.

8) **तुकोजीस सुभेदारीची वस्त्रे -**

ता. 3-6-1767 रोजी राघोबा दादा पेशवे तुकोजींना लिहितात, ' मालेराव होळकर मृत्यु पावले त्यास सरदारीचा बंदोबस्त पुर्ववत प्रमाणे तुमचा तुम्हाकडे सांगून, पेशजी

---

39. अप्रकाशित - पे.द. हिंदुस्थान स.नं.204, ता.21.8.1767.

कै. मल्हारराव होळकराकडे, सरंजाम, नवाजुना, वतनी, इनामी बंदोबस्त चालत आल्याप्रमाणे तुम्हाकडे करार असे. सेवा एकनिष्ठेने करीत जाणे.[40] फारसा घोळ न करता सुभेदाराची वस्त्रे तुकोजीरावास मिळाली. याबद्दल दादाने 16 लक्ष 62 हजार रुपये तुकोजीकडून नजराणा घेतला.[41] दादांचा हा हुकूम मान्य होईल की नाही याची शंका वाटून तोच करार मागाहून ता.21.8.1767 रोजी तुकोजींनी थोरल्या माधवराव पेशव्याकडून ताजा करवून घेतला.[42]

मालेरावाच्या मृत्युनंतर होळकरांच्या घराण्याला वारस नाही या सबबीवर होळकरांची सर्व दौलत घशात घालण्याचा रघुनाथ रावांचा डाव होता. पण हे कारस्थान अहिल्याबाईना समजताच त्यांनी शिंदे, भोसले, दाभाडे, गायकवाड यांना पत्रे पाठविली की, ' आज आमच्यावर वेळ आलेली आहे. उद्या तुमच्यावर हीच वेळ येईल याचा विचार करुन फौज मदतीस पाठवावी.[43]

गादीवर कोणास बसवावे? ही वेळ बांसडा, खांद्यावरी टाकील असा पाहिजे असल्याने तुकोजी होळकरास आणुन गादीवर बसविण्याचे ठरले. त्याप्रमाणे तुकोजी होळकरास उदेपुरास पत्रे गेलीत की, ' फौज जेथील तेथे मुस्तकीम ठेवून तुम्ही जेवीत असल्यास पाणी प्यायला आम्हापाशी यावे.[44]

याप्रमाणे सहावे दिवशी तृतीय प्रहरी तुकोजी होळकर येताच तेच क्षणी अभ्यंग स्नान घालुन मुहुर्त वगैरे कोणास काही एक न विचारता वस्त्रे गाडराखेंडीस डेरे उभे करुन तुकोजी यास दाखल केले.[45]

---

40. हो.इ.बा.वा.ठाकुर - 1 पृ.296
41. थो.माधवराव रोजनिशी-1 ले 175-176 पे.द.19 ले.47 पा.49 म.रि.3 वि.2.
42. पे.द.पा.210
    म.रि.3 वि.2 पा.8
43. हो.इ.सा.6 पा.31 भागवत अ.ना.
44. हो.इ.सा.6 पा.31, भागवत अ.ना.
45. हो.इ.सा.6, पा.31, भागवत अ.ना.

यामुळे आपोआपच राघोबा दादांचे कारस्थान अपयशी झाले. एक महिना मुक्काम करुन तुकोजीस वस्त्रे दिली.[46] आणि उज्जैनीला परत जाऊन सत्वासच्या घाटमार्गे देशी गेले.

पुढे पुण्याहुन ही तुकोजी होळकरास सरदारीची वस्त्रे मिळाली. ' तुकोजी होळकरासं छत्र जिल्हेजी वस्त्रे दिली. नवी जागीर पौ सात महाल सरकारात घेऊन नजर 10 लक्ष रु. करार केले. नजर 15 लक्ष रुपये द्यावे आणि बंदोबस्त नव्या जुन्या सरंजामपैकी सिरॉज व खरगीन देवपुर तर्फ तीन महाल सरकारात द्यावे. बाकी पूर्ववत प्रमाणे करार करावे '[47]

मालेराव होळकर मृत्यु पावले. त्यांचे दौलतीचा बंदोबस्त तुकोजी होळकरास सोपवुन त्यासच सरदारीची वस्त्रे दिली. तुम्हाकडून यांचे महालास कोठे जप्ती गेली यास ती उठविणे यांचे महालास व गावखेडी यास कोणताही उपसर्ग न करणे.[48]

वरील जप्तीस दादासाहेबांनी रा. आनंदराव गोपाळ पाठविले खरगोण बस्तिशील खानदेशात पाठविले होते. त्यामुळे अहिल्याबाई क्रुध्द जाहल्या.[49]

9) **अहिल्याबाई आणि तुकोजी होळकर -**

मल्हारराव‌ाच्या मृत्युनंतर सर्व राज्यकारभार अहिल्याबाईच करीत होत्या. लष्करी कामगिरीवर मात्र तुकोजींना पाठवित होत्या. तुकोजींचे दत्तविधान यथाविधी झालेले

---

46. हो.इ.सा.हो.कै.पा.33, भागवत अ.ना.

47. हो.इ.1 पा.296 वा.वा. ठाकूर,
    म.रि.3 वि.2 पा.7 सरदेसाई.

48. पे.द.19 ले.183 पा.187 सरदेसाई.

49. पे.द.ले.176 पा.179 सरदेसाई.

नसल्याने अहिल्याबाई त्यांना मल्हाररावांचा पुत्र मानायला तयार नव्हत्या. त्या त्यांना आपल्या हाताखाली कामावरच लावलेला समजत.

' मालेराव अल्पायु ठरला. आणि अहिल्याबाईस दुसरा पुत्र नसल्याने त्यांचा कारभार माधवराव पेशव्याने राज्यकारभार अहिल्याबाईला व बाहेर मोहिमा करण्यास सरदारकी तुकोजी होळकरास अशी सनद दिली. हा द्विमुखी कारभार बिलकुल यशस्वी झाला नाही. तुकोजी व अहिल्याबाईचे (30) तीस वर्षात पटले नाही. त्या भांडणात नाना व महादजीला पडाव लागल्याने चौरंगी झगडा सुरु झाला तो तीस वर्ष राज्यास भोवला आणि हा होळकरांच्या घरातील द्विमुखी कारभारच त्यांचा नाश होण्यास कारणीभूत ठरला.[49] सुरुवातीला तुकोजी व अहिल्याबाईचे सबंध चांगले होते. पण पुढे कारभारावरुन व पैशावरुन यांच्यात बेबनाव होऊ लागला. मल्हाररावाच्या लग्नाच्या वेळी केलेल्या पिढीच्या उच्चारातून त्यांनी तुकोजी होळकरांचे नाव गाळले.[49ब]

नाना महादजी वगैरे सर्वमंडळी तुकोजींना अनुकुल असल्यामुळे तुकोजीच मालक अशी मराठयांची समजुत होती. लौकिक तेच मल्हाररावाचे पुत्र मानल्या गेले आणि त्यांचा उल्लेखही तसाच होत गेला.[50]

तुकोजींचा शिक्काही अहिल्याबाईच्या विद्यमानाने ' श्री. म्हाळसाकांत चरणी तत्पर मल्हारजी सुत तुकोजी होळकर '[51] असा तयार झालेला होता अगदी शेवटपर्यंत तुकोजींना मल्हाररावांचा पुत्र म्हटल्यात जात होते. अहिल्याबाईनी यावर कधीही हरकत

---

49.अ. म.रि.2 पा.9

49.ब. मा.द.बा.2 पा.175
म.रि.3 वि.2 पा.7

50. स.मा.रो.1 पा.256 ले.432 (सवाई माधवराव रोजनिशी)

51. म.रि.3 वि.2 पा.6, सरदेसाई

ही घेतली नव्हती.[52] तरीही पण त्या तुकोजींना मल्हाररावांचा पुत्र मानायला तयार नव्हता. त्या स्वतःलाच होळकरांच्या दौलतीची मालकीण समजत होत्या. त्यांनी प्रथम तुकोजीस सरदारीचा मालक करुन त्यांच्याकडून मल्हाररावांचा दत्तक पुत्र म्हणुन कारभार चालविला.[53] पण पुढे मात्र त्यांच्यात वाद निर्माण झाल्याने त्यांनी तुकोजीस मल्हाररावांचा पुत्र मानण्यास नकार दिला.

**10) अहिल्याबाईच्या मनात विकल्प -**

अहिल्याबाईच्या मनात शंका आली की, आपण सर्व दौलत स्वतःच तुकोजींच्या स्वाधीन केली. हयात काही चुक तर झाली नाही ना ? ते आपली आज्ञा पाळतील की नाही ? आपल्या सोबत विचार विनीमय करतील की नाही अशा नाना त-हेच्या शंका मनात आल्या. तुकोजी होळकर इंदुर मुक्कामी असतांना बाईसाहेबांच्या मनात विकल्प आला. कारण दौलत ईश्वरेच्छेने आपले हाते दुस-यांच्या घरात घातली.[54] दौलतीचा आमचा संबंध राहिला नाही. महेश्वर नर्मदातटाक पुण्यक्षेत्र आहे तेथे स्नान संध्या करुन सार्थकाचा विचार करावा हा आमुचा मनोधर्म ' दौलत तुमचे स्वाधीन केलीच आहे. वडीलांचा लौकीक संरक्षण करु. यजमान श्रीमंत यांचा लोभाचा ओघ शुष्क न पडे यास जपावे आमचा परामर्श कराल न कराल याचे चेष्टित दिसतच आहे.[55] हे ऐकताच तुकोजींनी कंपीत होऊन स्वतःच्या गालात मारुन घेऊन बाईसाहेबांचे पाय धरले आणि म्हटले की, ' महाराज कै. सुभेदार असता भाऊबंदकी एकीकडे ठेवुन गुलामखानादान या वृत्तीने हुकुम बजावीत आलो. प्राप्त प्रसंगी सुभेदारांचे आशीर्वादाचा अनुषंग पाहुन मजला माणुस केले. तेव्हा माझे सुभेदार व मातुश्री प्रत्यक्ष आपणच आहात. आपले चरणाशी प्रतारणेचा विचार साक्षात मार्तंड येऊन बोलला असता पायाशी अंतर

---

52. म.रि. 3 वि. 2 पा.8
53. म.रि. 3 वि. 2 पा.8
54. हो.इ.सा.-6 पा.39
हो.कै. 2 पा. 39
55. हो.इ.-6 भागवत पा.40
हो. कै. 2 भागवत अ.ना. पा.40

होणार नाही. प्राण जावे की राहो. ही गोष्ट महाराजांनी खचीत मनात वागवून कूर्मदृष्टी ठेवावी यात दौलतीचे व माझे कल्याण [56] या भावी बहुत खात्री केली. मातुश्रींनी उत्तर केले ' बोलण्यात अर्थ नाही दिसण्यात येईल ते खरे बोलल्या प्रमाणे चालावे म्हणजे जाहले असता इश्वर त्याची उपेक्षा करीत नाही.' [57] अशी बोलणी परस्परात झाली. मातुश्रींचे वास्तव्य महेश्वरास होते आणि देशीचे व माळव्यातील महाल दरोबस्त याची देखरेख मातुश्री साहेबांकडे होती. कारभारास नारो गणेशाचे भाचे मुकुंदराव हरी व कृष्णाजी मु-हार पारनेरकर बुळे यांचे सरदारीचे दिवाण याजकडे सोपविला.[58] हयानंतर मातुश्री साहेबांनी आज्ञा घेऊन तुकोजीराव होळकर हिंदुस्थानात रवाना झाले.

' तुकोजी होळकर गुजराथची स्वारी करुन खानदेशात होते. त्याजला महेश्वरास जाणे याकडे कारण सहा महिने दिवाणगिरी दादाजी गंगाधर यांनी केली. ते राजकारण बाईसाहेबांचे इतल्याने झाले. पुन्हा नारो गणेशाची मुक्तता व कारभार सुरु झाला. याचा इतल्ला मातुश्री साहेबास नाही.[59] यामुळे बांईसाहेबांचे अंतःकरणी संशयाचे पर्वत तेव्हा महेश्वरी जाऊन समाई होणे इतके पुण्य कोणासही नाही. तेंव्हा महादजी शिंदे यास बोलावुन तुकोजींनी म्हटले की, ' तुम्ही आमचे बंधु तेंव्हा मातोश्री साहेबांकडे जाऊन आमची समाई करावी.'[60]

तेव्हा पाटील बाबा बाईस बोलले की, ' आपण इतकी अंगवळणाची बोलणी बोलता परंतु आम्ही पुरुष आहोत. आपले ढंगावर आले असता आपण काय कराल?[61] बाईनी यांचे उत्तर दिले की, तुम्ही जसे आपल्या बांया सुपारीच्या खांडासारख्या तोंडात टाकुन गिळुन गेला तोच बोध तुकोजी होळकरास करुन उभयता फौजबंदीने येण्याचे करावे. इंदुरीहुन तुमचे कुच,

---

56. हो.इ. - 6 भागवत अ.ना. पा. 40
हो.कै. - 2 भागवत अ.ना. पा. 40
57. हो.इ. - 6 भागवत अ.ना. पा. 40
हो.कै. - 2 भागवत पा. 40
58. हो.इ.सा. 6 भागवत अ.ना. पा. 40
हो.कै. 2 भागवत अ.ना. पा. 40
59. हो.इ.सा. - 3 पा. 48
हो. कै. - 2
60. हो.इ.सा. - 6 पा. 48
हो.कै. - 2
61. हो. कै. पैकी राहिलेला अप्रकाशित भाग पा. 10

त्याचदिवशी हत्तीचे पायात अंडी घालुन तुमची खात्री करीन तरच मल्हारजी होळकरांनी सुन तुमचे मनात गुबार होता तो तुम्ही बाहेर काढला. या गोष्टीस चुकाल तर तुम्हास मार्तंडाची शपथ.[62]

मग सुभेदाराचे (तु.हो.) मन महादजी शिंदेनी जोखले. तेथे त्यांचे एकच उत्तर पडले की, बाईसाहेबांचे पायापाशी हरामखोरी मजकडून व्हायची नाही. कदाचित ढंग दोषेकरुन तिचे मनात मजाविषयी पाप आल्यास मी हात बांधोन रुबरु जाईन. मग ती प्राण घेवो वा कैदेत ठेवो ते मजला कबुल आहे. परंतु हरामखोरी माझे प्राणात प्राण आहे तोपर्यत होणार नाही. याकरिता दौलत उद्या जात असेल तर आज जातो मी जोडा सांभाळुन उभा राहिन. परंतु माझे वस्तु ही गोष्ट सुतराम होणार नाही.[63] तुकोजींची अशी निष्ठा पाहुन महादजी शिंदि नारो गणेशासी बोलुन उज्जनीस परत निघुन गेले. सुभेदारही कुच करुन आल्या वाटयाने पुण्यास गेले.[64] इंदुरला तुकोजी होळकरांनी बाईसाहेबांची भेट घेऊन कारभाराच्या नेमणूकिविषयी विचारणा केली. पुण्याच्या आज्ञेवरुन दोघे गृहस्थ खाजगी कडील कारकुन नारो गणेश व दौलती पैकी शिवाजी गोपाळ, निजबत रावजी. महादेव फडणीस यांची खानगी पुण्यास केली.[65] उभयतांनी पुण्यास श्रीमंताची भेट घेतली. आणि विनंती केली की, बाईसाहेबांचे सुभेदारांचे सांगणे की, आम्हास कारभारी कोणी नेमुन द्यावा. यावर श्रीमतांनी तुकोजींची व बाईसाहेबांची तारीफ करुन त्यांना आज्ञा केली की, तुमच्या दौलतीपैकी विश्वासु माणसाची नियुक्ती करा. त्यास आम्ही आमचे म्हणुन वस्त्रे देऊ. त्याप्रमाणे मातोश्रींनी नारो गणेशाची नियुक्ती केली. श्रीमंतानी दुसऱ्यास दिवशी त्याला वस्त्रे पाठविली.[66]

---

62. होळकरांची कैफियत अप्रसिध्द भागापैकी पा. 10
63. हो. कै. अप्रसिध्द भागापैकी पा. 10
64. हो. कै. अप्रसिध्द भागापैकी पा. 10
65. हो.इ. 6 पा. 36
    हो. कै. - 2
66. हो.इ. - 6
    हो. कै. = 2 पा. 36

११) महालाच्या बंदोबस्तात मतभेद -

महालाच्या बंदाबस्तास कुणाची नियुक्ती करावी याबद्दल तुकोजी आणि अहिल्याबाई मधे बरेच मतभेद झालेत. तुकोजींनी नेमलेल्या कमाविसदाराला दुर करुन अहिल्याबाई आपला कामाविसदार पाठविल तर तुकोजी त्याला दुर करुन आपला पाठवित. त्यामुळे वाद निर्माण होऊन कोणताही निर्णय लागत नाही. उलट वाद वाढतोच आहे. महालाच्या कमाविसदाराच्या नेमणुकीवरुनही तुकोजीराव व अहिल्याबाईमधे वाद झाला. अहिल्याबाई कोणी परगण्याच्या कमाविसदारा जवळुन रसद घेऊन कमाविसदार पाठवितात. तेथे तुकोजीबाबाही त्याच परगण्याची रसद तेथे घेऊन तुकोजीबाबा कामविसदार परगण्यावर पाठवितात हे ही आपले जागा श्रमी आहेत कोणताही निकाल नाही.[67]

' तुकोजी बाबांनी ये प्रांती जितके महालाचे कमाविसदार बाईचे उठवुन आपले कमाविसदार बसविले होते. तितक्या महालावर बाईंनी आपले कमाविसदार पाठवायचे सिध्द केले. एकदोघास चंपाषष्ठीचे मुहुर्ते वस्त्रे दिली. तमाम महालोमहाली बाई आपले कमाविसदार पाठवणार की काही फौजही ठेवणार.' [68]

राजश्री तुकोजीबाबा व नारो गणेश या उभयतांनी राजश्री बळवंतराव वाकडे याजकडे महाल सांगितले. बंदोबस्त करुन उभयता खानदेशात गेले.[69]

१2) श्रीमतांची मध्यस्थि -

एकाने महालचे ठेवलेले कमाविसदार दुस-याने उठवुन आपले ठेवावे. असा घोळ सुरु होता. तेव्हा श्रीमतांनी अहिल्याबाईस वारंवार पत्र पाठविले. त्यात आज्ञा की, ' राजश्री

---

67. म.द.बा. प. । ले. 27 पा. 62
68. म.द.बा. प.। ले. 33 पा. 79
69. म.द.बा. प.। ले. 34 पा. 84

तुकोजीबाबा इकडे चाकरीस येतात यांनी तिकडे महालो महाली बंदोबस्त केला आहे. यांचे ठेवलेले कमाविसदार बाई उठवुन आपले कमाविसदार पाठवितात हे न करावे ते चाकरीस येतात. त्यांचा बंदोबस्त राखुन त्यास बाईंनी पत्र टाकुन दिले की, आम्ही कृष्णाजी पंतास मामलत सांगितली आहे हे तुम्हास ठावूक असता तुम्ही मामलत कां केली ? विसाजी रंगनाथ बोलला ' आम्ही धन्याचे चाकर आम्हा जवळुन असे होणार नाही. बाई बोलली चाकर खरे परंतु फितुरी चाकर । असो मामलत तुम्हास देणे नाही असे साफ उत्तर केले.' [73]

13) तुकोजी - अहिल्याबाई यांच्या बेनबावाचे कारण -

तुकोजी होळकर आणि अहिल्याबाईच्या भांडणाचे बीज महादजी शिंदे, नाना फडणीसास लिहितात, ' कै. सुभेदार हयात असता त्याची बायको गौतमा बाई कारभार करीत होती. ती वारल्यावर पुढे अहिल्याबाई कारभार करु लागली. ही चाल त्यांचे घरची पहिल्यापासोन आहे. नवी नाही असे असता तुकोजी बावांचे म्हटल्याप्रमाणे बाईंनी तुकडा खाऊन पडले असावे हे भाव कसे सिध्द होतील.[74] बाईंनी सारी वहिवाट करुन चाकरी तुकोजीबावांनी करावी.[75] यात बाईचे महत्व, सरदारीचे स्वरुप व सरकार चाकरी तीन ही गोष्टी सिध्दीस जातात. बाईचा अपमान झाल्यास सरकारचा लौकिक राहणार नाही. इतके असून हिच गोष्ट करावी असा आपला आग्रह असल्यास आमच्याने सांगवणार नाही की, तुम्ही पोटास घेऊन स्वस्थ बसावे. बाई आमचे ऐकावया जोगी नाही. त्यात होळकरांचा आमचा भाऊपणा आम्हास गैररितिची गोष्ट सांगणे उचित नाही. पूर्वी बाईंनी महालांची वहिवाट करुन फौजेस खर्चास द्यावे असे आपण ठरविले. ते बाईंनी मान्य केले. आता महालाची वहिवाट तुकोजींनी करावी असे आपण लिहुन पाठविता तर यात शाश्वत कोणते समजून आम्ही बाईस सांगावे ? [76]

---

73. म.द.बा. प.। ले. 67 पा. 152
74. म.रि. 2 पा. 9
75. मा.रो. म.रि. 2 पा. 9 पे.द.
76. म.रि. - 2

तुकोजी व अहिल्याबाईत बेनबाबाचे प्रमुख कारण महालाची वहिवाट कोणी करावी. दोघेही आपला अधिकार ठेवू इच्छित होते. तर अहिल्याबाई तुकोजीस आपल्या हातचे कामास लावले.[77] असे समजत असल्याने तिला तुकोजीचे सर्वाधिकारी होणे मान्य नव्हते. तिचे म्हणणे की, तुकोजींनी तीच्या म्हणण्याप्रमाणेच वागावे. त्याला स्वतंत्र किंवा स्वतःच्या मर्जीप्रमाणे कारभार करण्याचा काही एक अधिकार नाही. ती सांगेल तेवढेच पाणी पिवुन असावे.

तसेच वादा आणखी महत्वाचा मुद्या पैशावरुन होतो तुकोजींना पैशाची नेहमीच अडचण राहात होती. कारण कारभार सर्व बाईच बघत होत्या. तुकोजींना हिशोबाची सांगड घालणे कधी जमलेच नाही. शिवाय त्यांची नियुक्ती बाहेरच्या म्हणजे मोहीमेसंबंधी कार्यावर होती आणि पैसा सर्व अहिल्याबाईच्या ताब्यात होता. जमा खर्चाची सांगड घालण्यात तूकोजींच्या नाकी नऊ येऊन सदैव त्यांना पैशाची अडचण राहात होती. त्यामुळे ते सैन्याचे पगारही वेळेवर करु शकत नव्हते. याबाबत नाना फडणीस लिहितात. ' की घोडे एकाच्या हाती व लगाम दुस-याच्या अशाने सरदार चाकरी व सरदारीचे स्वरुप कसे होईल । दो हाती कारभारामुळे पैका मधल्यामधे जातो. सरकार चाकरी होत नाही. मसलत नाही. सरकारचा ऐवज येणे त्यास ठिकाण नाही. यादृष्टीने सरकार काम नासते व दौलत पेचात येते. सबब चांगले सांगत असता बाई न ऐकेल तर याचा बंदोबस्त सरकारातून करावा लागले.[78]

यावर महादजी नानास कळवितो. ' नाना समजत असतील चिंता काय ? पांच हजार फौज महेश्वरी पाठवुन बाईचा बंदोबस्त करु त्यास तुम्ही सारे शहाणेच आहात पण बाई अधिक शहाणी आहे. तिनेही तयारी केलीच असेल ती कोणासच बघावयाची नाही पैका व बुध्दी दोनही तिजमध्ये मजबुत आहेत. बाई दुस-यांचे हाताने घास घेत नाही.[79]

---

77. म.द.बा. प. । ले.23 पा. 53
    पे.द. 19 पा. 192 ले. 186
78. म.रि. 2 पा.10
79. म.द.बा. 2 पा. 10

अहिल्याबाई हुशार होती पण राज्यकारभाराचा कठोरपणा तिच्यात नव्हता. बाईचा कारभार पुढे तिखट व मागे पोचट [80] असा होता.

यावरुन दिसुन येईल की, होळकर शाहीचा सर्व कारभार बाईच करीत होती. आणि तुकोजी बाहेर मोहिमेवर राहुन चाकरी करी. वसुल हिशोब वगैरे सर्व बाईच पाहत होत्या. आणि तुकोजी कडून हिशेब घेऊन ती त्यास खर्चास जरुरी प्रमाणे देई.[81] तुकोजी बाबा कडुन खर्चाचे हिशेब अहिल्याबाईकडे खर्चाचे हिशेब वेळेवर येत नसत व आलेले पुष्कळ वेळा खोटे ठरत.[82-1] बाईनी काही हिशोब यादी बुदी बाळरायास दाखवुन तेच हिशोबाचे कागद त्याज बरोबर पाटील बावांकडे पाठविले.[82-2] बाईनी फडणीसास सांगितले. चौपाचा वर्षाचा हिशोब बाळरावास दाखवा, तो दाखवुन समजावुन दिला. ' बाई बोलली हा वेळपर्यंत हिशोब आम्ही तुम्हास दाखवले. सुभेदारांचे वेळेस तुमचे हिशेब आम्हाकडे आले. कितीदा आम्ही पाहिले आहेत. सांप्रत तुकोजीबाबा विजयध्वज दौलत कर्ते पैदा झाले. त्या योगेकरुन तरी हिशेबाचे महजब घरोघर देणे आम्हास प्राप्त झाले. बरे इच्छेस उपाय नाही. परंतु बाळाराव तूम्हास कळले असु द्या. अद्याप तुकोजींनी कोठे पराक्रम करुन अधिकोतर मिळविले नाही. सुभेदारांचेच मेहरबानीने खातात. अधिकोत्तर मिळविले नाही. तसे तुकोजींनी कोठे काय पराक्रम केले आहेत. तुकोजी बावाचे इतके दिवस वाकडे पाऊल पडले नाही जशी मसलत जाली असेल तसे बाहेर पाऊल पडेल.[82-3] यामुळे तक्रारी उपस्थित होऊन तुकोजी नेहमी पैशाच्या अडचणीत येत असे. पगार वेळेवर न मिळाल्यामुळे फौजही नेहमी बिथरलेलीच असे.

---

80. म. द. बा. 2 पा. 66
    म.रि. - 2 पा 10
81. म.रि. - 2 पा. 11
82-1. म.द.बा.त. 1 ले.22 पृ.50-52, ले.23 पा 52,53 ले. 52,53
    म. रि. 2 पा. 11
82-2 ले. 22 पा. 50,51
82-3 ले.22 ले. 23 पा. 52,53

तुकोजी होळकरांनी सांगितलेली कामगिरी चोख न बजावल्यामुळे पुण्यातील कारभारी नाराज होत. ' बाई आम्हास पैसा पुरवित नाही आम्ही काय करणार ? अपरंपार धनसंचय करुन ठेवते. निष्कारण दानधर्मात पैसा उधळते.' [83] अशी सबब तुकोजी कारभा-यापुढे करी.

तुकोजींची पत्रे नेहमीच अहिल्याबाईस येत. ' जे खर्चाची निकड फौजेत फार आहे. काही खर्चास पाठवुन द्यावे.'[84] जे सारा मुलकी ऐवज त्यांनी ओढून नेला जागा जागा त्यांनी आपले बंदोबस्त करुन गेले आहेत आता माझे हाती काय आहे ? कोठुन खर्चास पाठवावे असे बाई बोलत.[85]

असा तुकोजी व अहिल्याबाईमधे पत्रोपत्री वाद शेवटपर्यंत चालला. कारभार सर्व बाईच्या हाती होता. तुकोजींना खर्चाची नेहमीच अडचण राहत होता. त्यामुळे वादही शेवटपर्यतच चालू राहिला. याचा निर्णय कधीही होवू शकला नाही.

बाई खर्चास देत नाही. अपरंपार धनसंचय करुन ठेवते. निष्कारण दानधर्मात पैसा उधळते. जवळचे कारकुन वाटेल तशी तिची समजुत करुन तिला फसवितात.[86] अशा वारंवार तुकोजींच्या तक्रारी ऐकुन नाना फडणीस अगदी वैतागुन गेले. एकमुखी कारभार असल्याशिवाय सुरळीत व्यवस्था राहणार नाही असे ठरवुन त्यांनी महादजी शिंदेना लिहिले. 'तुम्ही बाईची भेट घेवून तिची समजुत घालुन सर्व कारभार तुकोजीच्या हवाली करावा.[87] बाकीची तुकोजीबावा करतील. असे आमच्याने सांगवत नाही. जे समयी मल्हारजी होळकरास देवाज्ञा झाली तेव्हा आमच्या हाती मालेजी होळकर व बाईस दिले आणि आम्हास त्यांच्या

---

83. म.द.बा. प.। ले.34 ले. 83-84
84. म.द.बा.प.। ले.6 पृ. 14,15
85. म.द.बा. । ले.6 पृ.15
86. म.द.बा . पृ. 83-84 ले. 34
    म.रि. - 2 पृ. 10
87. ... म.रि. - 2 पृ. 10

हाती देवून परस्परे भाऊपणाची निखालसता करुन, स्वामीसेवा एकनिष्ठेने करावी अशी शपथ क्रिया आम्हापासून घेऊन देह विर्सजन केला. तूर्त बाईचे महत्व चालत आल्याप्रमाणे सरकार काम चालवावे. तुकोजींनी फक्त चाकरी करावी. कोणे गोष्टीचा इतल्ला नसावा. [88] असे असता आमच्याने अहिल्याबाईंनी सर्व कारभार तुकोजींना सोपवावा असे सांगवणार नाही. होळकरांचा बंदोबस्त सरकारमर्जीने करावा. आमच्याने काही होत नाही असे महादजी शिंदेंनी नाना फडणवीस उत्तर दिले.[89]

**14) नथ्याबा फणसेस दत्तक घेण्याचा ठराव - 8/8/1779.**

तुकोजींना सर्व कारभार आपणच करावा अशी इच्छा होती. एक हाती कारभार असल्याशिवाय कोणत्याही गोष्टी सिध्दीस जात नाही असे तुकोजीचे म्हणणे होते.

' तुकोजी निकर्षावरच प्रवर्तले तर आपल्याही दुसरे मांडीवर घेणे प्राप्त केवळ त्यांनी दिली भाकर खावून राहिल. हया गोष्टी होणार नाही.' [90] असे म्हणून सन 1779 मध्ये अहिल्याबाईचे तुकोजींशी वितृष्ट इतके वाढले की सन 1779 मध्ये अहिल्याबाईनी आपला नातू नथ्याबा फणसे हयास दत्तक घेण्याचा ठराव पेशव्याकडून करवून घेतला. ' ' तुकोजींची वर्तणूक सुधी नाही. सबब त्यांची सरदारकी बरतर्फ करुन त्यांस कैद करावे आणि फणशांचा मूल दत्तक घेऊन त्यांचे नावे सरदारकी करावी. यांस नजर सरकारची पंचवीस लक्ष एक रुपये यशवंत गंगाधराचे विद्यमानाने करार केली असे. ता. 8/8/1779.[91] मात्र ही गोष्ट कधीच सिध्दीस गेली नाही.

**15) नारो शिवदेव, सदासिव दिनकर व बापूराव वैद्यांची मध्यस्थि -**

होळकरांच्या गृह कलहात नाना कडील नारो शिवदेव, सदासिव होळकर व बापूराव वैद्य हे पुण्याहून इंदूरास व महादजी शिंद्याकडे जावून वारंवार मध्यस्थि करीत होते.

---

88. म.रि. - 2 पा.10
89. म.रि. - 2 पा. 12
90. म.द.बा. 1 ले. 31, पा: 74, म
 म.रि.2 प.13
91. म.द.बा.प.1 ले. 31, पा.74, म.रि.2 पा.12.

नारो शिवदेव लिहितो ' होळकरासंबंधी बोलणे महादजी शिंदेसोबत काढले की, चार चार घटका प्रविवाद चालतो. सावंदाकडून जाबसाल यथायुक्त पूर्वीच्या चाली पाहून होत असावे ते न होता बाईस संपुष्टात घालावे अशीच सा-यांची मर्जी दिसते. अहिल्याबाई होळकरांची सून, तिचा अपमान लौकिकात बरा दिसेल काय? ति अपमान सहन करुन घ्यावया जोगी नाही.[92]

अहिल्याबाईचे म्हणणे असे की, सन 1772 पासून आजपावेतो तुकोजींनी फौज किती बाळगली ? चाकरी कोणती केली ? आजपावेतो सरंजामाचा वसुल किती आला ? त्यांचे आमचे महाल बरोबरीचे असता त्यांचा वसुल आमच्यापेक्षा कमी कां आकारला जातो ? याचा तपास धन्यांनी करावां. एकाचाच पक्ष धरुन लिहिणे योग्य नाही.[93]

यावर नानांचे म्हणणे ' बाईस संपुष्टात आणावयाचे प्रयोजन काय ? पैशा खेरीज फौज जमा होत नाही. डौलाचे खर्चापुरता ऐवज बाईनी ठेवून तेवढयापूरती महालांची वहिवाट तुकोजींनी करुन पैसा घ्यावा असे महादजी शिंदेनी बाईस सांगितल्याशिवाय तोड नाही. झाल्या गोष्टीबद्यल वाद करीत बसलो तर पुढील मसलत बिघडेल. दुहीमुळे पेच पडतात. पेच पडल्यावर सरदारीचा मालक कोण याचा विचार करावा लागेल.[94]

तुकोजीकडून कर्जदार धरणे देवून बसले तेव्हा बाईस चार गोष्टी सांगून अर्थसाहय करण्याची मसलत तुकोजीने चालविली. फौजेच्या खर्चास महाल लावून दिले होते त्यातून खर्च भागवावा अशी अहिल्याबाईची इच्छा. ' मजजवळ पैसा नाही. सारी दौलत तुकोजींनी आक्रमिली आहे यांचे दौलतीच्या जमेतील एक कवडी मजकडे नाही असे असता यांनी विपर्यास कर्म आरंभिले तर दारुगोळा मजजवळही सिध्द आहे. केवळ हात जोडून माझे घ्या आणि

---

92. म.रि. पा. 13

93. । ला 3 पा. 41, का.स.प.या. पृ. 212
म.रि. पा. 13

94. म.रि. पृ. 13 । वा 3 पृ. 41, का.स.प.या. पा. 212.

मजला रक्षा असे म्हणणार नाही. पाटील बावासही सांगा. रेवातीरी स्नानसंध्या देवतार्चन करुन क्षेत्रे आम्ही आपले दिवस घालवितो.[95] तुकोजीसाठी पुरतेपणे भासले जे बाई धनी आहेत श्रीमंतासही त्यांची भीड पडेल. तितकी आपली नाही असे समजून त्यानेही आपले तापत्रय बहूतच सांगितले.[96]

हया वादाबद्यल बाळारावास अहिल्याबाई म्हणाल्यात ' तुम्हास वाटत असेल की सा-यांनी चहूकडुन बाईचा बंदोबस्त केला की ती काय करणार ? तुम्ही लक्षात ठेवा मी सुभेदाराची सुन आहे. केवळ तुकोजी बाबाच दौलतीचे धनी आणि मी कोणी नाही असे समजु नका. तुकोजी बाबा माझे हातचे कामास लावले आहे. निमकहरामीचे फंद केल्यास आणि दौलत करु म्हटल्यास त्या गोष्टी दुरापास्त आहेत. त्यास पाटील बावाचाही दम असेल तर उभयतांनी फौज सुध्दा मजवर चालुन द्यावे. श्रीमार्तंड समर्थ आहे.[97]

यावर बाळाराव नम्रपणे उत्तरले की ' सुभेदारांचे जागा व राणोजीबावांचे जागा आपण उभयतास वडील आहात. ते दोघेही आपल्या सांगण्याबाहेर नाहीत. एखादं वेळ चुकत असतील पण आपण वडीलकीच्या नात्याने त्यांना सांभाळुन घ्यावे. ते आपल्या आज्ञेबाहेर कदापीही जाणार नाहीत. पण तरीही बाईना त्यांचा विश्वास धरवेना. बाई बोलल्या वरवर तोंडाने बोलत जावे. पायाने पाय तुडवीत जावे.[98]

अहिल्याबाईचे म्हणणे की, तुकोजींनी नक्की आपल्या विरुध्द पुण्यात श्रीमंताजवळ आगळीक केली असेल म्हणूनच श्रीमतांनाही होळकरांचे वारसदार तुकोजीच वाटतात आम्ही नाही. पण जर असे असेल तर पुण्यावरुन श्रीमतांचे आमच्या नावे पत्र आणा की, तुकोजीच

---

95. म.रि. पा.13,
    म.द.बा. प.ले.6 पा. 14,15, ले.23 पा.53
96. म.द.बा.प. ले.24 पा.35
    म.रि.2 पा.13
97. पे.द.19 पा.192 ले. 186
    म.द.बा.प.ले.23 पा. 52,53
    म.री.2 पा.14
98. पे.द.19 पा. 192 ले. 186
    म.द.बा.प.ले.23 पा.52,53
    म.री. 2 पा.14

एकटे होळकरांच्या दौलतीचे स्वामी आहेत आणि आमचा होळकरांच्या दौलतीवर काही एक हक्क नाही. सुभेदारांचे तुम्ही काही नव्हा. त्यांचे दौलतीची वारीसदारी तुम्हास पोचत नाही. सर्वविशी मुगुटमणी तुकोजीबाबा आहेत तुम्ही उडून काशीयात्रेस जाणे.[99] त्यांची आज्ञा आम्हास शिरसावंद्य आहे त्यांच्या आज्ञेप्रमाणे मग आम्ही सर्व कारभार तुकोजी होळकरास सोपवू आणि आमच उर्वरित आयुष्य काशी इथे इश्वर चिंतनात घालवू.

मी महेश्वरास महादजी शिंदेच्या आज्ञेनेच आली आहे. केवळ आपले व तुकोजी होळकरांचे आणि नारो गणेशाचे आपसातील मतभेद मिटवावेत म्हणून त्या दोघांनी आपल्या आज्ञेत राहूनच सरदारीचा बंदोबस्त करावा आणि आपल्या घराण्यांचा नाव लौकिक वाढेल अशी सरकारची चाकरी आपल्या आज्ञेने व सल्ल्याने करावी. यापुरता आपली अनुज्ञा होईल असा कोणताही हेतू महादजींच्या मनात नाही. यावर अहिल्याबाईचे समाधान केले की, तुकोजी बाबा व नारो गणेश आपल्यांशी वैषम्य भावे वर्तणूक करतात. त्या (काही) जाले तरी आपण धनी, घरात फुट नसावी. सरदारीचा बंदोबस्त व्हावा. पाटीलबावांचे मानस की तुकोजी बावांनी व नारो गणेश या उभयतांनी आपले आज्ञेत पूर्ववत प्रमाणे चालून सेवा करावी. येविशी उभयपक्षी सरव्यता करुन देण्यास मजला सेवेशी पाठविले आहे.[100]

### 16) तुकोजींचे अहिल्याबाईस न भेटता प्रयाण -

तुकोजींनी अहिल्याबाईंना सांगून पाठविले की, आपले पत्र असेल तर भेटीस येवू आणि मग पुण्यांस चाकरीस जावू. अहिल्याबाई त्यांना म्हणाल्यात तुम्ही आधी स्वामी कार्यास जा. सरकारी चाकरी करुन या मग आमची भेट घ्या. आम्ही तुमचीच आहे. तेव्हा घर ही आपलेच आहे. त्यांचे मानस आहे की, हजार पाचशे लोकानीशी येथे भेटीस म्हणून यावे

---

99. म.रि.2 पा. 14
100. म.रि.2 पा. 14
म.द.बा.प.ले.24 पा.54

मी साफ सांगून पाठविले आहे जे, पंचवीस पन्नास परियांत आले तर वाड्यात येऊ देऊ. अधिकोत्तर आल्यास येऊ देणार नाही असे सांगून पाठविले.[101] एकंदर हयावेळी अहिल्याबाईच्या मनात तुकोजी विषयो किंतु निर्माण झाल्यानेच त्यांनी तुकोजींना भेटीचो आज्ञा दिली नाही आणि म्हणून तुकोजी होळकर अहिल्याबाईना न भेटताच इंदुराहून पुण्यास निघुन गेले. तुकोजी होळकर व नारो गणेशांनी इंदुरीहुन कुच केले. त्यांच्यासोबत पाच सातशे स्वार आहेत ते येथे येतात. अहिल्याबाई म्हणाल्या जे इकडे येतात परिछिन्न त्याच्या चित्तात बेमानी आहे. नाना प्रकारचे घोळ घालून आम्हास उपद्रव करावा यास्वत येतात. यास्वत श्रीमतांस लिहून पाठवा. आम्हास सर्वविशी आश्रय श्रीमंतीचा आहे. श्रीमंताची पत्रे तुकोजीस व नारो गणेशास दाबाची यावीत की तुम्ही हुजुर येणे. बाईशी अमर्याद न करीत. अशी पत्रे सुतर स्वाराबरोबर लवकर येणे आहे.[102]

तुकोजी होळकर आणि अहिल्याबाई मधील मतभेद मिटून देण्याकरीता मध्यस्थि करायला गेलेल्या बाळारावाला आपल्या कार्यात शेवटी अपयश आले, कारण अविश्वासापोटी अहिल्याबाईनी तुकोजींना भेटायची समती न दिल्याने ते न भेटताच गेले. याचे बाईना वैषम्यही वाटले. पण बाईचा स्वभाव अतिशय संशई झाल्याने त्यांना कुणाच्याही बद्दल विश्वास राहीला नाही. या अविश्वासापोटीच वाटाघाटीत बाळारावाला यश मिळाले नाही.

बाळाराव म्हणतात बाईचे मर्जीचा थाग लागत नाही. जाबसालात धरसोड फार आणि विश्वास हा कोणाचा नाही. बाईचे म्हणणे असे की, तुकोजी बावांनी व नारो गणेशांनी पूर्ववतप्रमाणे आज्ञेत असून साहेब्र चाकरी यथा स्थीत करावी. धन्याचा बट्टा लावून घेवू नये.[103]

---

101. म.द.बा.प.। ले. 24 पा.55, ले.26 पा. 59, ले.31 पा. 75 (31 ले)
102. म.द.बा. ले. 24, पा. 57
103. म.द.बा.प. ले. 25, पा. 58, ले. 26 पा. 59, 60.

तुकोजींनी आपला कारकून अहिल्याबाईकडे भेटीची संमतीपत्रे आणण्यास पाठविला असता अहिल्याबाईंनी कारकुनास उत्तर केले की, ' आपल्या घरास येण्यास त्यास कागदपत्र कशास पाहीजे ? मुख्य गोष्ट धन्याचा संतोष राखुन मग आम्हास भेटावे घरही आपले काय सांभाळणे ते सांभाळावे. [104]

**17) सुलतानजी लांबहातेची मध्यस्थि -**

अहिल्याबाई म्हणाल्यात ' तुकोजीइकडे येतात. बेईमानीच्या रोखावर येतात काय चिंता आहे ? परंतु आम्हास भरवसा श्रीमंताचा कदाचित श्रीमतांनी त्यांच्याकडे डौल दिला तर आमचा ईश्वर आहे. [105]

तुकोजीचे वर्तमान की त्यांचा येथे येथाचा अनमानच आहे. बाईचा धाक पाहून परभाराचा सेंधुघडचा घाट उतरुन पुण्याकडे जातात की काय ? लांबहाते येथुन गेल्यावर काय विचारणे ते करतील.' [106]

अहिल्याबाईचें म्हणणे की, ' तुकोजींनी इकडे भेटीस येणे तर, महादजी शिंदेच्या मध्यस्थिने यावे एकटे येऊ नये. तुकोजीबाचा केवळ निष्कर्षावर प्रवर्तले तर आपल्यासही दुसरे मांडीवर घेणे प्राप्त केवळ त्यांची दिली भाकर खाऊन हया गोष्टी होणार नाही. [107] एकूण अहिल्याबाईची मर्जी अशी दिसून येते की, श्रीमंताची ममता कोणीकडे होते ते पाहून मग काय करणे ते करावे. सुलतानजी लांबहाते जवळ अहिल्याबाई म्हणाल्या, ' तुकोजींनी स्वामीकार्य आधी करुन मग आगच्या भेटीस यावे तथापी तुमचा आग्रह आहे की, तुकोजींनी येथे येऊन

---

104. म.द.बा.प. ले. 26 पा. 59, 60.
105. म.द.बा. प. ले.31 पा. 73, 74
106. म.द.बा प. ले.31 पा. 73, 74
म.शि. का.प. ले. 125 पा.137
107. म.द.बा.5 ले. 31 पा. 74
म.रि. 2 पा.12

पायावर डोई ठेवून जावे. जसे तुम्ही सडे आलात तसे त्यांनीही सडे यावे. अधिकोत्तर आल्यास परिछिन्न येऊ देणार नाही. दारुगोळा सिध्द आहे.[108] लांबहाते बोलले ' त्यास मी घेऊन येतो. आपले त्यांचे बनले तर फार उत्तम न बनले तर मी त्यास नेऊन त्याच्या लष्करात घालीन, अहिल्याबाईचे भेटीस यावे असे तुकोजींच्या चित्तात तर आहेच.[109]

सुलतानजी लांबहातेला तुकोजींनी सांगून पाठविले की, बाईचे वचन पूर्तपणे द्यावे की आपण कोणावर इतराजी करु नये.[110] असे वचन घेऊन आणल्यावर आम्ही बाईच्या भेटीस येऊ, यावर सुलतानजीस अहिल्याबाई म्हणाल्यात की, ' आम्हांजवळ वचन कशाचे मागता ? आपल्या घरास येण्याचे वचन कशास पाहीजे ? आम्ही कोणासच वचन दिले नाही. आताही देत नाही. येणे तर यावे. चित्तात विकल्प असल्यास येऊ नये.[111] एकंदरीत वरील संदर्भावरुन असे स्पष्टपणे दिसून येते की, तुकोजीला दोघांच्या भेटीत पाटीलबावांचा संदर्भ नको होता उलटे अहिल्याबाईच्या मते दोघांच्याही 'जाबसालात ' पाटीलबावा अवश्यमेव असले पाहीजे. शेवटी रात्री दोन प्रहरापर्यत अहिल्याबाईनी लांबहाते सोबत बोलणी केली आणि शेवटी सकाळी तुकोजींना निरोप पाठविला की, पूर्वीपासून आम्ही जो आपला कारभार करीत आलो तो करु. तुम्ही जे चाकरीचे काम करीत आला ते तुम्ही आपली साहेब चाकरी करीत जावी. आम्ही कोणांवर कृपा व कोणाचे पारपत्य करणे ते करु त्यात तुम्ही रदबदली करु नये हे कबूल असल्यास भेटीस येणे नाहीतर तुम्ही स्वामी चाकरीस जाता हे फार उत्तत[112] शेवटी तुकोजी व अहिल्याबाई मधले मतभेद मिटलेच नाहीत आणि या वादावादीमुळे तुकोजी होळकर अहिल्याबाईना न भेटताच निघुन गेले. अहिल्याबाईचा तुकोजीवर क्रोध अनावर झाला. या दौलतीतील एकही कवडी तुकोजींना देणार नाही. श्रीमंतांना त्यांची फारच कवण असेल तर

---

108. म.द.बा. 5 ले. 31 पा. 75
109. म.द.बा. 5 पा. 75
110. म.द.बा. 5 ले. 32 पा. 76
111. म.द.बा. 5 ले. 32 पा.76
112. म.द.बा. 5 ले.32 पा.76

श्रीमतांनी तुकोजींना नवा सरंजा देवून चाकरीस ठेवावे. तुकोजी रेवातीरीहून कूच करुन पुढे चार कोस बलकवाडयास गेले. रोख सैदव्याच ' [113] याचे कूच जाले हे ऐकूण अहिल्याबाई बोलल्या ' काय चिंता आहे हे दौलत पेशव्यांची आहे त्यांनी कृपा करुन चाकरी घेतली तर चाकरी करुन दाखवीन नाहीतर हे इतकीही दौलत त्यांच्या घरात घालीन मग यांस नवे महाल देवून श्रीमंतानी यांची उभारणी करुन चाकर ठेवले तर ठेवोत परंतु या सरंजामातून एक कवडीही देणार नाही. [114]

18) **अहिल्याबाईची तक्रार** -

आमच्या भेटीची आवश्यकता काय ? प्रथम चाकरीवर रुजु व्हावे असे जरी बाई म्हणाल्या तरी तुकोजींनी अहिल्याबाईची अमर्यादा करुन त्यांना भेटल्याशिवाय तुकोजी न भेटताच परभारे निघुन गेल्याबद्दल अहिलयाबाईना वैषम्य वाटून त्यांनी पुण्यास तक्रार केली.

अहिल्याबाईनी पुण्यास श्रीमंताना कळविले की, तुकोजीबाबा व नारो गणेश उभयता आपली भेट न होता गेले त्यांनी इतकी अमर्यादा करुन जायचे नव्हते. ते फौज ठेवतील पण तुकोजीच्या त्याफौजेला देण्याचे संकट श्रीमंतास पडेल त्यांनी काय समजुन त्यास बोलाविले आहे. श्रीमंताच्या बुध्दीस विपर्यास घालुनही मसलत केली आहे हे वाईट दिसते. [115]

हरकुबाई मावशीबाई बोलल्या की, ' श्रीमंतानी घरात अशी फुट पाडू नये. ज्यापक्षी अहिल्याबाई आम्ही त्यांच्या पायापाशी निष्ठेने एकविद्या भक्तिने बसलो आहोत. तेव्हा श्रीमंताकडून हे अपेक्षित नाही. तुकोजी व नारोपंत कोण आहेत ? तुकोजीबावासही

---

113. म.रा.बा. 5 ले. 32 पा. 74
म.री. 3 पा. 14
114. म.द.बा. 5.2 ले. 32 पा. 80
म.द.बा. 12.1 ले. 32 पा.79
115. म.द.बा. 5.2 ले. 33 पा. 80

बाईनीच केले आहे आणि त्यांची अमर्याद वर्तणूक पाहून त्यांचे विषयी प्रसन्नता नाही. ज्यास हाती धरतील तो सवाई तुकोजीकडून करुन दाखवतील. त्यांनीही अशी अमर्याद करायची नव्हती आणि श्रीमंतानाही भलत्याचेच मसलतीवर अशी घरात फुट पाडू नये. नारा गणेश आपल्या बचावासाठी दोहीकडील खराबी करीत आहेत.[116]

हरकूबाई मावशी म्हणाल्यात होळकर आणि शिंदेची फुट आपसात पडू देवू नये म्हणून श्रीमतांनी तुकोजीस टाकोटाक पत्र पाठवावे कि तुम्ही मातोश्रीची भेट घेवून त्यांची कृपा संपादून इकडे चाकरीस यावे. त्यांची भेट न घेता इकडे येणे असे पत्र लिहून अहिल्याबाईच्या भेटीस तुकोजीस पाठवावे. बाई व तुकोजीस ममता पुरस्कार भेटून एक विचारे बंदोबस्त आपले घरचा करुन बाईचे सरबराई करुन त्यास चाकरीस पाठवितील यात अति उत्तम आहे. बाईचे आज्ञेत राहण्याची व वडिलांची वडिलपणे राखण्याविषयी श्रीमंतानी तुकोजीस आज्ञा करावी. बाईची भेट न घेता तुकोजी आल्यास श्रीमंतानी त्यांना भेटीस येऊ देवू नये.[117]

तुकोजीबाबा व नारो गणेशांनी बळवंतराव वाकडे यांच्याकडे महाल सांगितले त्यांचा बंदोबस्त करुन उभयता देशात गेले. आम्हाजवळही तोच दिल्लीचा लवाजया हत्तीपागा व शार्गीदपेक्षा 30 येथे आहेत. त्यांच्या खर्चास तुकोजी काय ठेवून गेले हे बळवंतरावासच श्रीमंतानी विचारावे. सरकारपर्यंत बोभारा आमच्या नावाच्या करतात की सर्व मामलतीचा पैसा बाईच खर्च करतात. श्रीमंतानी लिहीले, तुकोजीबावास चाकरीस बोलविले आहे. त्यास खर्चास पोहचवित जा कोठून खर्चास पाठवावे. हे धन्यांनी त्यास विचारावे सारे पाहणे विचारणे धन्याकडे आहे. ' ज्यांची गृहकृत्य त्यासच पुसले पाहिजे, दुस-यास काय कळे ? तुकोजी बावास आधी चाकरीस जाऊ द्या पूर्ववतप्रमाणे येथुन जे घडेल महाल जाणे आम्ही जाणू.[118]

---

116. म.द.बा. 5 ले.33 पा.81
हो.इ.,ठाकूर वा.वा. पा.231

117. म.द.बा.1, ले.33 पा.82
हो.इ.1पा. 231

118. म.द.बा. 1 ले.34 पा.85, 86.

भेटीस तुकोजीस पाठवावे. बाई व तुकोजीस ममता पुरस्कार भेटून एक विचारे बंदोबस्त आपले घरचा करुन बाईचे सरबराई करुन त्यास चाकरीस पाठवितील यात अति उत्तम आहे. बाईचे आज्ञेत राहण्याची व वडिलांची वडिलपणे राखण्याविषयी श्रीमंतानी तुकोजीस आज्ञा करावी. बाईची भेट न घेता तुकोजी आल्यास श्रीमंतानी त्यांना भेटीस येऊ देवू नये.[17]

तुकोजीबाबा व नारो गणेशांनी बळवंतराव वाकडे यांच्याकडे महाल सांगितले त्यांचा बंदोबस्त करुन उभयता देशात गेले. आम्हाजवळही तोच दिल्लीचा लवाजया हत्तीपागा व शागीर्दपेक्षा इ. येथे आहेत. त्यांच्या खर्चास तुकोजी काय ठेवून गेले हे बळवंतरावासच श्रीमंतानी विचारावे. सरकारपर्यत बोभाट्य आमच्या नावाच्या करतात की सर्व मामलतीचा पैसा बाईच खर्च करतात. श्रीमंतानी लिहीले, तुकोजीबावास चाकरीस बोलविले आहे. त्यास खर्चास पोहचवित जा कोठून खर्चास पाठवावे. हे धन्यांनी त्यास विचारावे सारे पाहणे विचारणे धन्याकडे आहे. ' ज्यांची गृहकृत्य त्यासच पुसले पाहिजे, दुस-यास काय कळे ? तुकोजी बावास आधी चाकरीस जाऊ द्या पूर्ववतप्रमाणे येथुन जे घडेल महाल जाणे आम्ही जाणू.[18]

एवं तुकोजी होळकर अहिल्याबाईना न भेटता निघुन गेल्याने अहिल्याबाई अतिशय संतप्त झाल्यास त्यांनी श्रीमंतानाच तुकोजींना समज देण्याविषयी सांगितले. अशा अनेक गोष्टीवरुन तुकोजी आणि अहिल्याबाई मधील मतभेदाची खाई भरण्याऐवजी रुंदावत जावून मतभेद अधिकाअधिक वाढतच गेले, तीव्र होत गेले. हयामुळे शेवटी हया प्रकरणात स्वतः श्रीमंत पेशव्यांनी हस्तक्षेप केला.

### 19) श्रीमंताची मध्यस्थि -

तुकोजी अहिल्याबाई मतभेद वाढून अहिल्याबाईनी तुकोजी विरुध्द केलेल्या तक्रारीबद्दल पेशवे इंदूरच्या वकिलास लिहितात ' तुकोजींस बाईची अमर्यादा कतर्व्य नाही.

---

।17. म.द.बा.।, ले 33 पा.82, हो.इ. पा.23।.

।18.म.दा.बा.। ले.34 पा.85,86.

त्यांनी दुसरा अर्थ मनात आणू नये ते तेथे आल्यावर बाईंची मर्यादा रक्षीत असेच होईल तरी अमर्यादा केली म्हणून आपण तिकडे मामलतीची घालमेल किंवा जप्त्या करु नये. तसे केल्यास त्यांच्याकडून चाकरी कशी होईल.'[119] तुकोजीबाबा येतांना भेटुन आले नाहीत म्हणुन चित्तात राग का आणावा. आपणच म्हणाला होता, स्वामी चाकरीपेक्षा भेटीचे कार्य अधिकोत्तर नाही यास्तव आम्हीस येऊ दिले नाही.[120] यावरुन असे स्पष्टपणे दिसुन येते की सरकारी काय महत्वाचे असुन त्यावर सर्वांची दृष्टी असावी याची जाणीव अहिल्याबाईना होती असे बोलुन अहिल्याबाईची समजुत काढण्याचा प्रयत्न श्रीमंतांनी केला.

20) **अहिल्याबाई - तुकोजी वादात महादजी शिंदे व नाना फडणीसांची शिष्टाई -**

अहिल्याबाई तुकोजीबद्दल तक्रार करतांना म्हणतात ' चिरंजीवास गादीच्या **देवून** दौलतीस धनी केले. त्या दिवसापासुन माझ्यासोबत वर्तणुक शुध्द केली नाही. सात वर्षे हिंदुस्थानची मुलुखगिरी केली तर एक पैसाही कमावुन आणला नाही. असे असुन कागदपत्री सवीस्तर वर्तमान खुलासेवर लिहित नाही. खावंदाजवळ असोन चार वर्षे देशी सरदार आहेत. त्या दिवसा पासोन चाकरीस फौज किती होती महालाचा ऐवज किती याचा शोध खावंदाजवळ असुन मनात आणित नाहीत. वारंवार मजला लिहितात की काय अंतर केले ? घरचा विषय श्रीमंतास लोपला नाही तेथे चवकशी करावी ती करीत नाही.'[121] यावर असले घरगुती प्रकार खावंद चाकरी आड न यावे व सरदारी यथायोग्य व्हावी. असे म्हणतांना नानांचा वकील अहिल्याबाईस म्हणतो ' आपली निष्ठा श्रीमंतांचे चरणी पूर्वीपासून चालत आहे. त्याप्रमाणे घडत असावे. दोन नेत्र श्रीमंतांचे एक नेत्र उजवा होळकर व एक नेत्र शिंदे यात उजवा नेत्र केवळ तेजहिन झाला त्यास उपाय हाच की, या मसलतीस उपयोगी पडेल. तेजवृध्दी व्हावी. हे प्रकार आपले ध्यानात, परंतु आपला भर दौलतीवर नाही. दानधर्म, ब्राम्हणभोज, शिवालय हेच करिता परंतु दौलतीत कमी पडते याचा विचार ध्यानात येत नाही.[122] म्हणजेच आपण दानधर्म करु नये असे नाही पण दानधर्मासोबतच

---

119. म.द.बा.1 ले. 38 पा. 97
म.द.बा.1 ले. 39 पा. 99, 100 ले.40 पा. 102
120. म.द.बा. 5-1 ले.38 पा.98 ले.39 पा. 99,100 ले.50 पा. 102
121. म.रि. 2 पा. 15
म.द.बा. 2 ले. 66 पा. 151
122. म.रि.2 पा. 15
म.रि. का. 5 ले. 215 पा. 268

सरकारी चाकरी जास्त महत्वाची असल्याने सरकारी खर्चावरही आपण लक्ष द्यावे. तुकोजींना पैसा वेळेवर पोहचत नाही. त्यांना सदैव अडचण असते म्हणून आपला पैसा केवळ दानधर्मावरच खर्च न करता आधी तो दौलतीच्या कामी पडेल याचा विचार करावा. यावर अहिल्याबाई म्हणाल्या ' आम्ही जो खर्च करीतो तो गैरवाजवी आणि ते (तुकोजीबावा) खर्च करितात ते वाजवी.

नानांचा कारकून लिहितो, ' बाईचे मर्जीचा थांग लागणे कठिण आहे. आज जे भाषण झाले तेच बोलणे खचित असा रंग नाही. जाबसालात धरसोड फार विश्वास कोणाचा नाही. पदरी मातब्बर मनुष्य गोष्ट मोडून सांगण्यायोग्य कोणी नाही. जे करणे ते आपण स्वतःच करावे. बाईनी महेश्वराचा बंदोबस्त केला. बुरुजावर तोफा चढवून ठेवल्या.[123] अहिल्याबाई तुकोजीबद्दल बोलल्या ' त्यांनी आजपावेतो ज्या मसलती केल्या त्या सर्व अंगी लावून घेतल्या. प्रथम दादासाहेबाकडे डौल दिला. हिंदूस्थानात झबेताखानाचा पक्ष केला. देशी मोरोबा फडणिसांचा पक्ष केला. नंतर रघुपतराव नारायणाचा पक्ष घेतला ते किल्ले नसीन झाले. गोविंदराव गायकवाडाचा पक्ष केला. ते भिक मागत आहे. आणखी असे 4-2 दाखले दिले.[124] अहिल्याबाई पुढे म्हणतात ' सरकारपर्यंत आमच्या नावाचा बोभाटा करतात की, मामलतीचा पैसाबाई खर्च करितात पाटीलबावासही तुकोजीने हेच गा-हाणे सांगितले. म्हणून ते आमच्या विषयी श्रमी झाले. श्रीमंतावर गाठ मसलत पडली आहे. या वेळी उभयतांनी चाकरिस जावे ते राहून घरचीच हांडीभांडी पाहताच आपले फज्जे लोकांचे येथे गेले मग महत्व काय राहिले ? उभयताच्याही चित्तास देशी जावे ऐसे नाही.[124]

शेवटी अहिल्याबाईनी महादजी शिंदिना महेश्वरास भेटीस बोलाविले. महादजी शिंदेचा मुक्काम महेश्वरास 28 डिसेंबर 1780 पासून 2 जानेवारी 1781 पर्यंत होता. त्यांच्या बोलण्यात मुख्य तुकोजींचाच विषय होता.

गॉडर्डने वसई हस्तगत केल्याचे वर्तमान महादजी शिंदेनी अहिल्याबाईस सांगताच त्या फार श्रमी झाल्या. एकटयावर मसलत पडली. तिथे कोणी नाही. ' पाटीलबाबा बोलले आम्ही तरी काय करणार. फौजेच्या देण्याच्या अडचणी, बाई बोलल्या तुम्ही शंभर ओठी सांगा, एक

---

123. म.रि.2 पा.15,म.द.बा.5 ले.32 पा.77,78 ले.25,पा.58.
124. म.रि.2 पा.15 म.द.बा.5 ले.32 पा.77,78.
125. म.रि.2 पा.15, म.द.बा.5 ले.32, पा.77,78 ले.25 पा.58.

वसई कायम असती तर चिंता नव्हती. आता तुमची बोलणी व्यर्थ.[126] अहिल्याबाई तुकोजीबावांचे गुणदोष फार बोलल्या इतःपर होळकरांचे सरदारीचा जाबसाल फौज, सरंजाम,चाकरी वगैरे सारे बाई आपल्या हाती घेणार.[127] असा रंग त्यांच्या बोलण्यातून दिसून आला. अहिल्याबाई तुकोजी बदद्यल सांगतात तर तुकोजी अहिल्याबाईबद्यल. हयांच्या मतभेदाने कारण समजल्याशिवाय काहीही समजत नाही. पण यांच्या आपसातल्या मतभेदाने वादविवादामुळे मात्र सरकारी चाकरी निट घडत नाही आणि ही सरकारची फार मोठी हानी आहे.[128] अहिल्याबाईचे म्हणणे की, तुकोजींना पूर्वीप्रमाणेच आपल्या आज्ञेत असावे.

महादजी शिंदे नाना फडणीसांना म्हणतात, ' चार महालांची वहिवाट तुम्ही करावी. बाकीची तुकोजीबाबा करतील असे आमच्याने अहिल्याबाईस सांगवणार नाही. ज्यासमयी मल्हारजी होळकरास देवाज्ञा झाली, तेव्हा आमच्या हाती मालोजी होळकर व बाईस दिले आणि आम्हास त्यांच्या हाती देवून परस्परे भाऊपणाची निखालसा करुन स्वामीसेवा एकनिष्ठेने करावी अशी शपथक्रिया आम्हापासून घेवून प्राण सोडला तेव्हा बाईनी नेमणूकीप्रमाणे कालक्षेप करावा आणि तुकोजींनी सर्व दौलतीचा कारभार करावा हे योग्य होईल काय ? तुर्त बाईचे महत्व चालत आल्याप्रमाणे ठेवून सरकार काम चालवावे. तुकोजीकडे कोणताही कारभार नसावा . त्यांनी फार चाकरी करावी असे महादजी शिंदेचे म्हणणे हया होळकरांच्या घरच्या वादात मध्यस्थि करतांना पडले तर नानासाहेबांचा वकील महेश्वराहून लिहितो, ' आपल्या आज्ञेप्रमाणे बाईसाहेबास बहूत युक्ति प्रयुक्तीने सांगितले बाईचे म्हणणे एकच. दोन त-हा सरकारातुन सांगून आल्या त्यातील एक सामर्थ्य नसता मी कबूल केली. त्याचाच निर्वाह करता संकट पडले तेव्हा दुसरी त-हा कसी होती '। याखेरीज दुसरे काही घडायचे नाही ।130 असे बोलणे झाले. या दुहीमुळे राज्य कारभारावर मोठाच परिणाम झाला असे दिसून येते.

---

126. म.रि.2 पा.18, मा.द.बा.5.1 ले.50, पा.126, ले.51,पा.126 ले.52 पा.131 का.स.प.भा. पा.212.

127. म.द.बा.1, ले.34, पा.83,84, म.रि.2 पा.15, म.द.बा.1 ले 34 पा.83.84.

128. ले.130 पा.143 (म.शि.का.प) म.रि.2 पा.18.

129. म.रि.भा.2 पा.12, म.शि.का.प. ले221 पा.279.

130. म.रि.2 पा.18, म.दि.बा.प. ले.52, पा.131, म.शि.का.प. ले.172, पा.212.

21) तडजोडीचे विफल प्रयत्न -

होळकर शाहीतील गृहकलहाच्या शेकडो उपलब्ध कागदपत्रावरुन त्या वेळच्या स्थितीची यथास्थित कल्पना येते. होळकरांचा गृहकलहाचा निकाल लागण्याऐवजी या पत्रव्यवहाराने गैरसमज मात्र वाढत गेले. नानासाहेब स्वतः बाईसाहेबाकडे जाऊन हा तंत्र मिटवू शकले असते पण हा मार्ग त्यांनी कधीच स्वीकारला नाही. तुकोजींना मात्र शक्य तितके त्यांनी दक्षिणेच्या मोहिमात गुंतवून ठेवले.

अहिल्याबाई व तुकोजीच्या हया भांडणात महादजी शिंदे व नाना फडणवीस पडल्यामुळे हया भांडणाला चौरंगी लढयाचे स्वरुप प्राप्त झाले. महादजी शिंदे अहिल्याबाईसाहेबांच्या कलाचे असून त्यांचे म्हणणे ' नारो गणेश' कारभारात नसावा. दुसरा दिवाण नेमून बाईकडे वडिलपणा देवून त्यांचे आज्ञेत तुकोजी वागतील तर बाई सर्व मसलत डोईवर घेऊन पार पाडतील. होळकर घराण्यांची तीच रित चालत आली. ती व आम्ही एक होवून सर्व मसलत सिध्दीस नेवू.[131]

उलट पदरी तुकोजींचे म्हणणे की, ' बाईकडून आम्हास खर्चास देत नाही.' ऐकूण काय की हा तंटा कधीच मिटला नाही. तुकोजीबाबा देशी आले. त्यावेळी बाईची व महादजी शिंदेची पत्रे आली. ' तुकोजीस बहकू देवू नये. समेटुन सरकार चाकरावर पडल ते करावे. एक वेळ बंदोबस्त हरवून दिल्यावर त्याजकडून अंतर पडण्यास मग कळेल तसे करता येईल.' [132]

यावर अहिल्याबाईचे म्हणणे असे की, सरकार चाकरी होत नाही. गृहकलहाचा दुलौकिक सर्वत्र झाला. आमची ती हिंमत आहेत. मी मल्हाररावची सून आहे. हात बांधून घेणार नाही. खावंदाचे निष्ठेत अंतर करावयाचे नाही. खावंद लहान कारभारी नाना एक वचनी आहेत. त्यांचे भरवश्यावर आज पावेतो कालहरण जाले तरी बंदोबस्त होत नाही यांचे काय कारण ? न जाणो तुकोजींचा पक्ष घेवून आमची उपेक्षा करीत असतील तर त्यात आम्ही काय

---

131. म.रि.3 वि.2 पा.19. म.द.बा.1 ले.209, 210.

132. म.शि.का.प. ले.178 पा.210, म.रि.2 पा.19, म.द.बा.1, ले. 216.

समजावे ? आमचा विश्वास नानाखेरीज कोणाजवळ नाही. आम्ही उगेच बसून तुकोजींचे हातून अब्रु गमावणे हे घडणार नाही. आमचे अंत:करण नानाजवळ आहे. त्यांचा जिव्हाळा पक्का आढळयावर त्यांचे वचनावर विश्वास ठेवून आज्ञेप्रमाणे वर्तणूक करावी हे आमचे मानस.[133] म्हणजेच अहिल्याबाईनी आपला विश्वास नाना फडणवीसांवर टाकला. या भांडणात नाना फडणवीस जो निर्णय देतील तो निर्णय अहिल्याबाईला मान्य राहील असाच याचा अर्थ होता.

अहिल्याबाईच्या या वक्तव्यावर नानासाहेब फडणीसांचा कारकुन अहिल्याबाईला म्हणाला ' तुर्कोजीची परीक्षा होईपर्यत बाईनी विवेकावर घेवून स्वस्थ असावे. खारगोण, इंदूर, देवाळपूर व मल्हारगड हे चार परगणे बाईकडे आहेत. त्यांचा पैसा सरदारीकडे देत जावा. तुर्त तुकोजीबाबाकडे सारा अखत्यार ठेवावा.[134] यावर अहिल्याबाई कळवितात माळव्यात तुकोजींचे कमाविसदार आहेत त्यांनी त्याजकडून पैसा घ्यावा कोणाचा बोभाटा बाईकडे न आला म्हणजे झाले. परंतु फिर्याद आली म्हणजे न्याय बाईनी करावा तो मान्य व्हावा.[135] अशी तडजोड नानाच्या वकीलाने सुचविली.

मराठा इंग्रज पहिले युध्द संपवून सालबाईचा तह ठरत असतांना होळकरांचा गृहकलहही हात घाईवर आला होता. हयावेळी बोलणी करण्यास नाना फडणीसांचा वकील सदासिव दिनकर व महादजी शिंदेचा वकील रामजी पाटील बाईंशी बोलण्यास आले. यावेळी झालेल्या बोलण्यांचा सविस्तर वृत्तांत सदासिव दिनकर नाना फडणिसाला लिहितो आज खावंदाचे दौलतचा प्रकार ध्यानात असता आपणांस काळजी दिसत नाही. तुकोजी बावांचा प्रकार केवळ अडचणीचा जाला. जेथे घोडयास चंदी नाही तेथे चाकरी कशी घडेल ? तुकोजींची सरबराई आपणाकडून होत

---

133. म.शि.का.प. ले.178 पा.212,213, म.रि.2 पा.20, म.द.बा.प.1, ले.223.

134. म.शि.का.प. ले.217, पा.272, ले.178, पा.212,213. । वा... 4 पा.6,58. म.द.बा.प.1 ले.223.

135. म.द.बा.प.1 ले.223, म.रि.2, पा.22.

नाही. आपले खर्चाचा मार्ग चालतो. तो चालतच आहे त्यात कमी होत नाही. सरकारी चाकरीत मात्र कमी पडते. याचे विचार आपले कारभारात नसावा. दुसरा दिवाण नेमून बाईकडे वडीलपणा देवून त्यांचे आज्ञेत तुकोनी वागतील तर बाई सर्व मसलत डोईवर घेऊन पार पाडतील. होळकर घराण्याची तीच रित चालत आली. ती व आम्ही एक होऊन सर्व मसलत सिध्दीस नेवू.[131]

उलट पक्षी तुकोजींचे म्हणणे की ' बाईकडुन आम्हास खर्चास देत नाही. ऐकूण काय की हा तंटा कधीच मिटला नाही. तुकोजी बाबा देशी आले त्यावेळी बाईची व महादजी शिंदेची पत्रे आली.' तुकोजीस बहकु देवू नये समेटुन सरकार चाकरावर पडल ते करावे. एक वेळ बंदोबस्त ठरवून दिल्यावर त्याजकडून अंतर पडल्यास मग कळेल तसे करता येईल.'[132]

यावर अहिल्याबाईचे म्हणणे असे की, सरकार चाकरी होत नाही. गृहकलहाचा दूलौकिक सर्वत्र झाला आमची ती हिंमत आहेच मी मल्हाररावची सुन आहे. हात बांधुन घेणार नाही. खावंदाचे निष्ठेत अंतर करावयाचे नाही. खावंद लहान कारभारी नाना एक वचनी आहेत. त्यांचे भरवशावर आज पावेतो कालहरण जाले. तरी बंदोबस्त होत नाही याचे काय कारण ? न जाणो तुकोजीचा पक्ष घेवून आमची उपेक्षा करीत असतील तर त्यात आम्ही काय समजावे ? आमचा विश्वास नानाखेरीज कोणाजवळ नाही. आम्ही उगेच बसुन तुकोजीचे हातुन अब्रु गमावणे हे घडणार नाही आमचे अंत:करण नानाजवळ आहे. त्यांचा जिव्हाळा पक्का आढळल्यावर त्यांचे वचनावर विश्वास ठेवून आज्ञेप्रमाणे वर्तणूक करावी हे आमचे मानस.[133] म्हणजेच अहिल्याबाईंनी आपला

---

131. म.रि. 3 वि.2 पा. 19
म.द.बा.1 ले. 209, 210

132. म.शि.का.प. ले. 178 पा. 210
म.रि. 2 पा. 19
म.द.बा. 1 ले. 216

133. म.शि.का.व. ले. 178 पा. 212, 213
म.रि. 2 पा. 20
म.द.बा.प. 1 ले. 223

संपूर्ण विश्वास नाना फडणीसांवर टाकला. या भांडणात नाना फडणीस जो निर्णय देतील तो निर्णय अहिल्याबाईंना मान्य राहील. असाच याचा अर्थ होता.

अहिल्याबाईच्या या वक्तव्यावर नानासाहेब फडणीसांचा कारकुन अहिल्याबाईंना म्हणाला ' तुकोजीची परीक्षा होईपर्यत बाईंनी विवेकावर घेवून स्वस्थ असावे. खारगोण, इंदुर, देवाळपुर व मल्हारगड हे चार परगणे बाईकडे आहेत. त्याचा पैसा सरदारीकडे देत जावाश तूर्त तुकोजीबावाकडे सारा अखत्यार ठेवावा.[134] यावर अहिल्याबाई कळवितात माळव्यात तुकोजीचे कमाविसदार आहेत त्यांनी त्याजकडून पैसा घ्यावा. कोणाचा बोभाटा बाईकडे न आला म्हणजे झाले. परंतु फिर्याद आली म्हणजे न्याय बाईंनी करावा तो मान्य व्हावा.[135] अशी तडजोड नानाच्या वकीलाने सुचविली.

मराठा इंग्रज पहिले युध्द संपुन सालबाईचा तह ठरत असतांना होळकरांचा गृहकलहही हात घाईवर आला होता. हयावेळी बोलणी करण्यास नाना फडणीसाचा वकील सदाशिव दिनकर व महादजी शिंदिचा वकील रामजी पाटील बाईशी बोलण्यास आले. यावेळी झालेल्या बोलण्याचा सविस्तर वृतांत सदाशिव दिनकर नाना फडणीसाला लिहितो. आज खावंदाचे दौलतचा प्रकार ध्यानात असता आपणास काळजी दिसत नाही. तुकोजी बावांचा प्रकार केवळ अडचणीचा जाला. जेथे घोडयास चंदी नाही तेथे चाकरी कशी घडेल ? तुकोजीची सरबराई आपणाकडून होत नाही. आपले खर्चाचा मार्ग चालतो तो चालतच आहे त्यात कमी होत नाही. सरकारी चाकरीत मात्र कमी पडते. याचे विचार आपले खर्चात अडचण सोसुन तुकोजीस मदत करुन चाकरी निभावणे हेच उचीत. यावर अहिल्याबाई म्हणतात, माझा खर्च दानधर्म आदी होतो. तो किती होतो हे तुम्हास माहीत नाही. माझे मीच जाणे तुम्हास भ्रम असेल की सरंजामापैकी खर्च होतो तर सरंजामाचा हिशोब पाहा. स्वदेश तुकोजीनीच आटोपला आहे. माळवा राहिला त्याचा

---

134. म.शि.का.प. ले. 217 पा. 272
ले. 178 पा. 212, 213
ऐवा.....4 पा 56, 58
म.द.बा.प.1 ले. 223

135. म.शि.का.प. ले. 217 पा. 272
ले. 178 पा. 212, 213
म.रि. 2 पा. 22

रुपया झाडुन तेच घेतात. आज पावेतो त्याजकडे रुपया किती पावला. तो काय झाला, फौज किती ठेवतात, चाकरी कशी करतात हे सर्व मजला ठावूक आहे. दोन तीन वेळा हिशोब पाठविला. ते पाहुन कारभारी त्यास म्हणत नाही की तुम्हास चंद्रीची अडचण का पडली. भवती न भवति फार झाली.[136] ' तुकोजीबाबा भिन्न वाटेकरी नव्हता. सरदारी माझीच मीच रुपास आणली. एक विचारे असते तर मजला त्याज वाचुन आप्त कोण ? दौलत निष्कपट चालवावी हेच तात्पर्य अखत्यारीची मात्र इच्छा बाळगितात. करावी कशी ही वाटच ठावूक नाही. मजशी स्पर्धा करावी. माझा बंदोबस्त केला म्हणजे कृतकृत्य झाले. राजे रजवाडयांकडे पत्रे पाठविली की बाईकडे पैसा न पाठविणे. रांगडे लोक आम्हास म्हणतात तुकोजीबावाकडे रुपया दिला. त्यास म्हणतात बाईकडे ऐवज दिला. असा लपंडाव खेळतात. महालास पत्रे पाठविली की महेश्वरी रुपया न देणे यावरुन चालते गाडयास खीळ घालावी तसा विचार होतो. दैव माझे असेच ओढवले की, बयादा लिहित जावे. नेमणूक करुन हया म्हणतात. एवढी गोष्ट अनुकुल पडणार नाही बाकी सर्व त्यांचेच आहे. पाटिल बावांचे विचारे करणे ते करावे. [137]

नाना फडणीस वारंवार लिहुन पाठवितात. पाटील बाबांनी अहिल्याबाईस सांगावे की, ' ' चार महाल तुम्हाकडे आहेत त्यापैकी डौलाचे खर्चापुरता ऐवज ठेवुन बाकी ऐवज सरदारीकडे पाठवुन द्यावा. वरकड महालाची वहिवाट तुकोजीबाबा करतील. सरदारीमुळे अधिक आगळे केल्यास बाईचा अडथळा नसावा. नारो गणेशास होळकरांचे कारभारातुन काढावे. बाईनी व पाटील बावांनी एक होऊन मसलत करावी.[138] याविषयी पाटील बाब लिहितात. ' नारा गणेशास यापूर्वीच काढता आले असते. आता ते कसे घडेल.'

तुकोजींना बाजुला सारुन अहिल्याबाईकडे सगळा कारभार सरदारी सुध्दा सोपवावी हा महादजीने सुचविलेला उपाय नाना फडणीसांनी कधीच स्वीकारला नाही. उलट बाईस स्वस्थ बसवुन

---

136. म.रि. 2 पा. 23, 24
म.शि.का. ले. 215 पा. 268, 269

137. म.रि. 2 पा. 23, 24
म.शि.का. ले. 215 पा. 268, 269

138. म.रि. 3 पा. 24
म.शि.का.प. ले. 217 पा. 272
ले. 221 पा. 279

तुकोजीस (एक हाती सर्व कारभार) कारभार देण्याचा मार्ग नानाने सुचविला ती महादजींना पटला नाही. शेवटी प्रकरण विकोपास गेले. सर्वांनी एकत्र बसुन सर्वानुमते या प्रकरणाचा निकाल करण्याचा योग कधीच आला नाही. त्यात तुकोजींचा कारभारी नारो गणेश कळ लावण्यात कधीच कसुर करीत नव्हता अशा कलागतीनेच त्याचा स्वार्थ साधुन संपत्ती जमविता आली. शेवटी पापाचा घडा पूर्ण भरल्यावर तुकोजींनी त्याला भरपूर शिक्षा केली.[139]

22) **देवराव हिंमणेची शिष्टाई** -

ता. 20/9/1792 च्या शिंदे होळकरांच्या लाखेरीतील युध्दात होळकरांचा पराभव होऊन तुकोजी होळकर इंदुरास परतले. येतांना उज्जैनी हे शिंद्यांचे शहर लुटले. तुकोजीची समजुत घालुन त्यास दक्षिणेत आणण्याकरिता नाना फडणीसांनी देवराव महादेव हिंगणे व बळवंत काशी कात्रे यास इंदुरास पाठविले. सन 1794 च्या अखेर तुकोजी दक्षिणेत आला.

तुकोजींचा ज्येष्ठ पुत्र काशीरावास कारभाराची वस्त्रे देण्याचा ठराव आला. असता कनिष्ठ पुत्र मल्हाररावाने विरोध करुन वाटणी मागितली. वाटणी न दिल्यास बखेडा करण्याची धमकी दिली.[140] तेव्हा तुकोजींनी अहिल्याबाईना म्हटले की, वाटणी करुन उभयतांना समजावुन करावे ते करणे. यावर अहिल्याबाई म्हणाल्या ' तुम्ही धन्यापाशी जावुन तुम्ही व तुमचे कारभारी करणे ते करा त्यानंतर तेथील आज्ञेप्रमाणे मी वस्त्रे देईन.[141]

लढाईत कमी बापु होळकरांनी केली नाही. अपकीर्ती फार झाली. तुम्ही शहाणे असता अशी गोष्ट कशी झाली ? यावर पाराजीपंत म्हणाले आम्ही व बापुंनी अंतर केले नाही. वचनासही गुंतलो नाही सलुख केला त्यात उणी कोणती गोष्ट सरदाराचे मर्जीस न येऊन चिरंजीवाचे मसलतीवर हे काम केले. तसे फळ प्राप्त झाले. आम्हाकडे दोष ठेवणे ठीक नाही.[142] ' या

---

139. म.रि. 2 पा. 25
140. म.रि.2 पा. 28
म.द.बा. ले 240 पा. 209 जे 241 पा 212 ले 244 पाश 216
141. म.रि.
142. म.द.बा. 2 ले. 239 पा. 207

युध्दात तुम्ही मर्दूमकीचे काही काम केले नाही. आपल्या वडिलांनी आपल्या तलवारीने जे नाव शौर्यात आणि बहादुरीत कमावले होते ते तुम्ही गमाविले. दैवयोगाने घायाळ होऊन रणांगणातुन तोंड फिरविले असते तर काही हरकत नव्हती.' असे पत्र बाईनी तुकोजींना पाठविले.[143]

अहिल्याबाई म्हणतात रा. पाटील बाबाजवळ जावून सफाईचे बोलणे करुन घेणे. श्रीमंताकडून सलुख करावा त्यापेक्षा तो आपला भाऊ आहे. आपले त्यांचे एकचित असावे. परभारा करुन घ्यावे. शिंदे होळकरांचा भाऊपणा असल्यामुळे इतरांना मध्यस्थि करायची गरज नाही. परस्पर बोलुनच कलह संपवावा. तुकोजींनी अहिल्याबाईना पत्र पाठविले की, माझे शरीर फार अशक्त झाले. एक वेळ आपले पाय पाहावे अशी इच्छा आहे. माझ्या शरीराचा भरवसा नाही. महिण्या दोन महिण्याचा प्रांत दिसतो. आपल्या पायाच्या दर्शनाची इच्छा आहे. पण भेटण्याची परवानगी मिळाली नाही.[144]

अहिल्याबाईचा पूर्ण विश्वास की, मल्हारराव होळकरांच्या निशाणाचा डाव लाखेरीच्या लढाईत गेला. तो सरकार चाकरीने मसलतीने आणावा. आपण आहो तो आब आहे तो रक्षावा. सरकार चाकरीस बेउजुर असून कारभारी यांचे विचार सांगतील तसे चालावे.[145] लाखेरीच्या युध्दाने होळकरांची गेलेली पथ, झालेली नामुष्की नवीन मोहिम स्वीकारुन आणि पराक्रम गाजवुन धुवुन काढावी. पराभवाचा कलंक पुसण्याचा प्रयत्न करावा असे तुकोजी होळकरांना अहिल्याबाईंनी म्हटले.

मानाजी गायकवाड ता. 1/8/1793 रोजी वारला. ता. 3/12/1793 रोजी गोविंदरावास वस्त्रे देवविली. गोविंदरावास स्थानापन्न करण्यास प्रमुख सरदाराने गुजराथेत जाणे जरुर पडल्याने ती कामगिरी तुकोजी होळकरांस सांगण्यात आली. आणि फौजेसह तुकोजीस परभारे गुजराथेत घेऊन जावे अशी नाना फडणीसांची पत्रे हिंगण्यास आलीत. परंतु तुकोजींनी ही कामगिरी स्वीकारली नाही. गुजराथ कामगिरीवर गेल्यास त्यात तुकोजींनी वाटणी मागितली असता नाना

---

143. हो. इ. 1 खं. 5 भाग 7 पा. 15
144. म.द.बा. 2 ले. 240 पा. 209
145. म.रि. 2 पा. 30

फडणीस म्हणालेत, ' गुजराथेत वाटणी पूर्वीपासून होळकर शिंदेना नाही वाटणी मागु नये. सरकार काम करावे आणि लौकिक मिळवावा. सरदारीची अुस्तवारी व्हावी.[146]

28/3/1794 च्या पत्रात हिंगणे लिहितो ' महालाचा पैसा पुढील दोन सालात घेऊन चुकले. पुढे बाईनी पैका कोढून घावा. मनस्वी खर्च । लाखेरीच्या लढाईत मोठी शिकस्त खाऊन इंदुरास येऊन थुईस भार व अन्नास काळ ' कयकसर एक वर्ष बसल्या मुक्कामी आले. सावकार कोणी उभा राहात नाही. सरदारी झोके खाते धन्यांनी खाविंदी करुन बंदोबस्त करावाश[147] तुकोजीबावा म्हणतात ' बाईपुढे आमचा उपाय चालत नाही. बाईची सत्ता आम्हावर नसावी. एक हाती असावे. बाईचे लक्ष सर्वात्मना आपले उभयतांचे मर्जीवर त्यांचे तोंडी उत्तरे निघतात की, ' मजला यांचे सरदारीशी दरकार नाही. राहिले आयुष्य माझे महत्व आहे त्यास ढका. श्रीमंताचे पाई माझे आचरण शुध्द व मल्हारजी बाबांचे पुण्य आहे तर लागणार नाही. व जीवीतव्य आहे तो लागु देणार नाही. हृदयस्य आहे तोच बुध्दीस प्रेरक होवुन यातही सहस्त्र तोंडी काढील.[148]

ही पत्रे पावल्यावर, सविस्तर वर्तमान कळल्यावर नानाने पुढील व्यवस्थेची कलमे लिहून पाठविली ती अशी [149]

1) तुकोजींनी दहा हजार फौज बाळगुन सांगू तेथे मोहिमेवर जावे. पैकी अहिल्याबाईचे विचारे सरंजामातून घ्यावा.

2) बाईचे महत्यास अंतर करु नये.

3) तुकोजींनी अखत्यारीने कारभार करावा.

4) सर्वांनी कारभाऱ्यांचे आज्ञेत चालावे.

5) कै. मल्हाररावाचे वेळचे जुने माणुस काढु नये.

6) सरदारीचा गलाठा सबब सरकारातुन देवू त्याचे दाखल्याने कलमाची वहिवाट करावी.

7) सरकार देण्याचा निकाल सोई सोई करावा. पण ही कागदी कलमे कागदावरच राहिली.

---

146. म.रि. 2 पा.34
147. म.रि. 2 पा.35
हो.इ. 1 प्रकरण 7 क्रमांक 15,20 पा.240
148. म.रि. 2 पा.36
149. म.रि. 2 पा.36

' तुकोजी म्हणतात, मजकडे गुंता काय आहे ? सर्वस्वी वडील मातुश्री आहेत. ते बरे करीत वाईट करीत चितास येईल त्यास सरदारी सांगोत कारभार कोणास तरी सांगावा. सोबत्याचे पारपत्य करणे न करणे हे सर्व वडीलाचे मर्जीस येईल तसे करावे.[150]

तुकोजी आणि अहिल्याबाईतील तेढ फारच वाढत गेल्याने तुकोजींनी सरदारकी सोडण्याचीही तयारी दर्शविली. त्यांचे म्हणणे, की त्या लाखेरीच्या पराभवाचा बदला घेवी की न घेवो, मला काही वेळी घेणे नाही.

देवराव व बाईच्या बोलण्यातील सार की, सरकारचे लक्ष सोडुन कराल तर कठिण पडेल, बहुता दिवसांची दौलत आहे ते बुडते, ते तुमचे नाकर्तेपणे बुडत आहे. तरी विचार करुन दौलतीस अपाय न हाये प्रसंग पाहुन वर्तणूक करावी.[151]

अहिल्याबाई तुकोजीस बोलल्या ' श्रीमंताची आज्ञा की हुजुर यावे त्यापक्षी चांगले जाते. विलंब करु नये. लौकर सिध्दता करुन जावे. दिवस गतीवर न टाकावे. शिंदे तेथे आहे तो जावुन पोचावे म्हणजे नीट पडेल.[152] तर तुकोजीची फारशी इच्छा पुण्यास जाण्याची नव्हती ते म्हणाले. माझे शरीर अशक्त जावे नाही. पुन्हा रेवादर्शन होऊन वडिलांचे पाय दृष्टीस पडतील असे नाही. मनुष्य जवळ कोणी मातब्बर नाही. जाऊन काय करावे. पुण्याची वस्ती महागाईची येथे एका दिवसाची येऊन पडली आहे. तेव्हा पुढे परिणाम कोणता ? चमेलीहुन निघुन आलो ते आपले भरवशावर आपले मुळे बचाव झाला. जाणे हा सल्ला चांगला दिसत नाही. यावर अहिल्याबाई म्हणाल्यात की तुम्ही आपला पूर्ता विचार ध्यानात आणुन कर्तव्य ते करावे.[153]

---

151. म.द.बा. 2 ले. 242 पा. 213
151. म.द.बा. 2 ले 244 पा. 216
152. म.द.बा. 2 ले. 250 पा. 221
153. म.द.बा. 2 ले. 250 पा. 221

' सावकाराचा उपद्रव लागु न द्यावा. सरकारात काही मागु नये. खर्चाखाली आणुन ढोवुन् पाडु नये. सोबत्याकडील बंदोबस्त वाटणीचा करुन द्यावा. तेथे गेल्यावर सरकार नेटाने जे करणे ते करावे. येथे बाईपुढे काही चालत नाही. बाई पैसा देत नाही म्हणतात. नहाली हिशोब आपला पाहावा. पैसा आला काय आणि पावला किती हे ध्यानास आणावे मी तुमचे कर्मास लिप्त नाही.[154]

पुण्यावरुन तुकोजींना बोलावणे आले. पण तुकोजीची इच्छा पुण्याला जाण्याची अजिबात नव्हती. त्यांची प्रकृती अस्वास्थ्याचे कारणही पुढे आली. पण अहिल्याबाईचे म्हणणे पडले की सरकारची अनुज्ञा करणे योग्य नाही. याचा परिणाम ही चांगला होणार नाही. शिवाय महादजी शिंदे ही पुण्यातच असल्यामुळे आपल्या वाटणी बद्दलही सविस्तर बोलु. आपला हिस्सा मिळवुन घ्यावा. इत:पर पुण्यास जाण्याची तुमचर मर्जी जा नका जावु. पण मी मात्र तुमच्या कर्माची सोबती नाही किंवा बांधलेली नाही. आपला पूर्ण विचार करुन निर्णय घेणे जाणे हे फार योग्य असा सल्ला दिला. बाईनी त्यास निरोपाचे विडे देऊन म्हटले, मजजवळ काही गाठोडे ठेवले आहे जे काढुन देऊ तुम्ही देशी जाण्याचे करावे. थोडे बहुत खर्चास देऊ.[155] राजश्री काशीरावास वस्त्रे देण्याचा बेत पण मल्हारराव बिघडुन आहेत. तूर्त वस्त्रे देणे राहिले.[156]

' तुकोजींना पुण्यास जाण्याची जलदी होती. सरंजामी यावर पट्टी करुन एकसाला ऐवज त्याजकडुन घेऊन सावकारास घावा असा विचार करुन त्यांनी मातोश्रींना (अहिल्याबाईंना) सल्ला विचारला. यावर बाईंनी अत्यंत संतप्त होवुन म्हटले की, तुमचे चित्तास पडेल तसे करावे. मजला काय पुसता ? तुम्ही जाणे तुमची दौलत जाणे. बुडवा अथवा तारा बुडाली तर आहेच. सरंजामी पैसा कोठुन देतील ? ते तुम्हाबरोबर चाकरीस नव्हते काय ? आपले घरी बसले असते आणि तुम्ही तलवार गाजवुन आला असता तर त्यापासुन पैसा घ्यावयास ठिक पडते. तथापी तुम्हास एखादी गोष्ट करणे तर फणसे निरोळे करुन करा.[157]

---

154. म.द.बा. 2 ले. 250 पा. 222
155. म.द.बा. 2 ले. 251 पा. 223 - 24
156. म.द.बा. 2 ले. 250 पा. 222
157. म.द.बा. 2 ले. 260 पा. 238

अहिल्याबाईच्या सांगण्यावरुन देवराव सुभेदारास (तुकोजीस) समजाविण्यास गेले. ते म्हणाले ' असे बसणे योग्य नाही. दौलत बुडाली, लौकिक मिळविला तितका गेला. तुम्ही सरदार असून संरजामी यांचे पदावर आलास त्यास सरंजाम तरी राखावा. आपणास विलंब असल्यास आम्हास निरोप द्यावा. सरकार आज्ञेप्रमाणे केले पाहिजे. तुकोजी म्हणाले तुम्ही बोललात याप्रमाणे करुन आम्ही लवकर निघतो. तुम्ही जावू नये. आपण सोबतच मिळुन जावु.[158]

तुकोजी म्हणाले ' श्रीमंतापुढे मरुन जाईन. ब्राम्हणांनी बुडविले आता इकडे तिकडे काय मरावे ? श्रीमंताचे समक्षच जे होणे ते होईल.'[159]

अहिल्याबाईंनी आषाढ वद्य 2 सोमवारी तुकोजीस बोलाविले. भेट होऊन दोन घटका बोलणे झाले. मुहुर्त पाहुन कारभारीची वस्त्रे रा. गणपतराव नारायण व रा. बाळाजी लक्ष्मणास देऊन, सर्वासमक्ष सांगितले की, ' तुम्ही तुकबास विचारल्याखेरीज कोणताही कारभार न करावा. रापता प्रमाण करुन हातात हात दिला. पारनेरकर शिवाजी गोपाल व खंडो महादेव यास सांगितले. तुम्ही आपले दप्तरचे काम करावे. कारभारात बोलु नये. दिवाणांनी दप्तरी दाखला झाडुन द्यावा. मागील गोष्टीचे वैरभाव स्मरु नये. 'वाहीली गंगा, राहिले तीर्थ ' असे बोलुन कचेरी बरखास्त केली.'[160]

अहिल्याबाईंनी तुकोजी पुण्याला जायला निघालेत त्यावेळी कारभार सुरळीत चालण्याची व्यवस्था करुन दिली. मागचे झाले गेले पार पडले. पण यापुढे मात्र सर्वांनी एक दिलाने राहुन तुकोजीच्याच आज्ञेत राहण्याविषयी सक्त ताकीद दिली.

रा. सुभेदारांची (तुकोजींची) पत्रे मातोश्रीस आली. ' वडीली कारभारी करुन दिल्हे. याजकडुन ऐवजाची सरबरा होऊन कामाचा बंदोबस्त होऊन येत नाही. खर्चाची अडचण बहुत आहे. प्रसंग पाहुन उचीत ते करावे. ज्यात परिणाम उत्तम दिसेल ते करावे आमचा आग्रह नाही.'[161]

---

158. म.द.बा. 2 ले. 260 पा. 238 - 39
159. म.द.बा. 2 ले. 262 पा. 245
160. म.द.बा. 2 ले. 263 पा. 246
161. म.द.बा.2 ले. 271 पा.. 261

या पत्रावरुन तुकोजींची हवाल दिली दिसुन येते आणि त्यांनी आपले आग्रही प्रतिपादन करणे सोडुन दिले. एकुण लाखेरीच्या पराभवाने तुकोजी शरीरासोबतच मनाने फार जास्त खचले होते. कारभाराबाबतही वृत्ती उदास झाल्याचे दिसुन येते. हयानंतर मातुश्रींचा निरोप घेतल्यावर लवकरच तुकोजीबावा पुण्यात येऊन पोहचले. पुण्यात लगेचच पेशव्यांना भेटुन खडर्याच्या स्वारीवर रुजु झाले. [162]

तुकोजीवर पुत्रमोहाचा आरोप करुन त्या मोहापाईच घराण्याचा नाश केल्याचा आरोप करतात. पण तो योग्य नाही. पेशव्यापासुन खालपर्यंत सर्वांनांच पुत्र मोह होता. त्यात एकटया तुकोजींवर आरोप करण्यात अर्थ नाही. फार तर असे म्हणता येईल की पुत्रमोहातुन तुकोजीही सुटले नाही. तुकोजी होळकरास जसा पुत्र मोह तसा इतरासही होता. सर्वांची धडपड वडिलार्जीत अधिकार, संपत्ती, मानपान भोगण्याची दिसते. पण ती लायकी मात्र पुज्य हे पाहुन म्हणावे वाटते की, पाश्चात्य शस्त्रास्त्रांनी किंवा कवायतींनी आमचे राज्य गेले नाही तर आमच्याच मुर्खपणाने आम्ही आपले राज्य इंग्रजांच्या घरात घातले. [163]

23) **राज्य कारभारात तुकोजी अहिल्याबाई संबंध -**

अहिल्याबाई व तुकोजीत पैशावरुन खूप वादावादी आणि फार मोठी प्रश्नोप्रश्नी झाली असली तरी संबंध मात्र तुटेपर्यत ताणले नाही. वास्तविक तुकोजी त्यांना नेहमी मातोश्रींच्या नात्यानेच वडीलकीचा मान देऊन वागत. पत्रोत्तरातही उल्लेख ' मातोश्री ' किंवा ' वडीली जे करणे ते योग्य ' असाच आढळतो.

होळकरशाहीच्या तत्कालीन उपलब्ध शेकडो पत्रावरुन दिसुन येते की, मोहिमेवर बाहेर असतांनासुध्दा तुकोजीराव स्वतःजातीने अहिल्याबाई मातोश्रीस मोहिमेची कार्याची इत्यभूत माहिती कळवित. प्रत्येक गोष्टीत त्याचा सल्ला मागत आणि त्यांच्या सल्ल्याबाहेर किंवा शब्दाबाहेर सहसा जातही नसत. कोणतीही गोष्ट तुकोजीराव मातोश्रीच्या सल्ल्याशिवाय करीत नसत.

---

162. म.रि. 2 पा. 40
163. म.रि. 2 पा. 42

' तुकोजीरावांचे सर्व आयुष्य रणांगणावर गेले. त्यांचे धैर्य, स्वामीसेवा व सरळ स्वभाव स्पष्ट दिसतो. मल्हाररावांची करडी जमाखर्ची नजर तुकोजी रावात मुळीच उतरली नव्हती. त्यामुळे खर्चाचा पेच त्यास जन्मभर भोवला.' [164]

अहिल्याबाई संबंधी तुकोजीरावांचा आदरअनुकरणीय तर खरा पण त्यात विवेक, कर्तबगारी आणि धोरण हयांचे मिश्रण नसल्यामुळे ती भावभक्ति निष्प्रभ झाली.[165]

अहिल्याबाईची लेक मुक्ताबाई सती गेल्यावर बाईची स्थिती व तुकोजींची समाधान करण्याची पध्दत खालीलप्रमाणे आहे.

वडिली कोणतिही गोष्ट मनात आणू नये. माझी शपथ आहे. मी येतो तोपर्यंत दुसरी, तिसरी कोणतीही गोष्ट मनात आणू नये. आणाल तर शपथ. मी लौकरच पायाशी येऊन पोहोचतो. वडिली कोठे जाण्याचा विचार करतील तर कै. ति. सुभेदारांच्या पायांची व माझे गळयाची शपथ आहे.[166]

' उपलब्ध तुकोजीरावांच्या पत्रावरुन त्यांचा सरळपणा, आज्ञाधारकपणा स्पष्ट दिसतो. अडचणीचा गलाठा त्यास जडभारी वाटुन ते हातपाय गाळतात. पण अशाच प्रसंगी कार्य साधतात. राज्यकारभाराच्या एकंदर कार्यात पैसा वसूलकी हा महत्वाचा भाग आहे. [167]

24) **अहिल्याबाईचा मृत्यु - 13 ऑगष्ट 1795**

' तुकोजीराव पुण्यास जाण्यापुर्वी मातोश्रींना हे पाय पुन्हा कधी दिसतील असे म्हणाले होते.' [168] दिवसेंदिवस तुकोजींचीही प्रकृती परतंत्र होत चालली होती.

---

164. हो. इ. 2 पा. 7 (प्रकरण 1 ले)
165. हो.इ. 2 पा.8 (प्रकरण 1 ले)
166. हो. इ. 1 पत्रांक 5 पा. 215 (प्रकरण 6)
167. हो. इ. 1 पत्रांक 25 पा. 245 (प्रकरण 7)
168. हो. इ. 2 प्रकरण 1 पा. 1

' तुकोजींना श्रीमंत पेशवे साहेबांनी त्याच वेळेस पुण्याला बोलाविले. त्या दिवसात ते निजामअलीखां यांच्याशी लढाई देण्याचे तयारीत होते. श्रीमंत पेशवे हे होळकर, शिंदि, गायकवाड, भोसले वगैरे सरदारांना घेऊन निजामावर चढाई करुन गेले. हे युध्द पेशव्यांनी जिंकले याच वेळी अहिल्याबाई साहेबांची प्रकृती बिघडली. काशीरावास पाठविण्याबद्दल तुकोजींना पत्रे आली. तेव्हा काशीराव तुकोजीपासुन रजा घेऊन अहिल्याबाईसाहेबाकडे जाण्यास निघाले. तीन मुक्काम पुढे बाईसाहेबांजवळ पोहचण्याचे राहिले होते. इतक्यात अहिल्याबाई साहेब कैलासवासी झाल्या.' [169]

ही खडर्याची लढाई आटोपली आणि काही दिवसातच हया ' संस्थानावर अखिल भारतावर मोठाच प्रसंग आला ' श्रावण वद्य चर्तुदशिस [170] (13 ऑगस्ट 1795) अहिल्याबाईचा मृत्यु महेश्वर येथे झाला. मातोश्री साहेबांच्या निधनानंतर तुकोजीरावांची चिंता दुणावली. राज्याची व्यवस्था कशी करावी ? गादीचा मालक कोणास करावे ? इत्यादी अनेक प्रश्न त्यांच्यापुढे उभे राहिले. ते खडर्याच्या लढाईस निघण्यापूर्वी गादीची नाही. तथापी कामकाजाची व्यवस्था थोडीबहुत मातोश्रींनी लावून दिली होती. [171]

तुकोजींनी पळशीकरास लिहिले. तुम्ही तेथे जो कारभार कराल त्याच विशी अगोदर सरकारातून लिहुन आज्ञा घेत जाणे, येथील आज्ञेखेरीज कोढील मामल्याची घालमेल, अथवा लहानमोठे कामाची फेरबदली अगर वरात न करणे, पेशजीपासुन कागदपत्र पुरता करणे तेथील कारभार करुन होईल ते वर्तमान दर पै लिहीत जाणे. [172]

---

169. हो.इ.सा. खंड 5 भाग 7 पा.15
170. हो.इ. 1 प्रकरण 12 पा. 358
171. हो.इ. 2 प्रकरण 1 पा.1
172. हो.इ. 2 प्रकरण 1 पा.1

xxxxxx

## प्रकरण - 3 रे

### तुकोजी होळकर - पुणे दरबार - बारभाई कारस्थान आणि टिपू -

1) तुकोजीकडे राज्यकारभार
2) माधवराव पेशव्यांना पाठिंबा
3) तुकोजीवरील जप्ती उठविली
4) तुकोजीची उत्तरेकडील कामगिरी - 1769-72
5) मराठयांच्या मदतीने बादशहा दिल्ली तख्तावर - 6 जाने 1772
6) तुकोजी आणि रोहिले फत्तरगड मोहीम
7) बारभाई मंडळाची स्थापना - इ.स. 1773
8) रघूनाथरावांचा पाठलाग व गुजराथ मोहीम -
9) पहिले इंग्रज-मराठा युध्द - इ.स. 1775
10) तुकोजीरावास - पंचमहालाची सनद
11) सदाशिवरावभाऊंचा तोतया- इ.स. 1776 तुकोजीची कामगिरी -
12) तुकोजीरावाकडून नरसो गोविंदाचे पारिपत्य - जुलै 1777
13) तुकोजी होळकरयांना आलमपूरजवळ भांडेर दमुवाची सनद -
14) तुकोजी होळकर आणि मोरोबाचे कारस्थान - 1778
15) वडगावचा तह - दि. 17 जानेवारी 1779
तुकोजीची कामगिरी -
16) तुकोजीचे पुण्यात स्वागत -
17) तुकोजी होळकरास रावेर व कोच प्राप्ती
18) रघुनाथरावांचे पुन्हा इंग्रजाकडे पलायन आणि युध्दाचा भडका - 1780
19) तुकोजी होळकरांचा पराक्रम -
20) तुकोजींची टिपू विरुध्द मोहीम -

# प्रकरण 3 रे

## 1) तुकोजीकडे राज्यकारभार

मालेराव होळकरांच्या मृत्युनंतर अहिल्याबाईना दुसरा पुत्र नसल्याने कारभार कोणाला सोपवावा हा प्रश्न होता. पण मल्हाररावांनी मृत्युपुर्वीच मालेरावांचा हात तुकोजीच्या हातात दिला होता. शिवाय हयावेळी होळकरांच्या घरात तुकोजी शिवाय एकही कर्ता पुरुष नव्हता. शेवटी अहिल्याबाई व कारभारांच्या विचारअंती मुख्य कारभार अहिल्याबाईच्या अखत्यारीतच राहावा आम्ही बाहेरचा म्हणजे मोहिमेचा सर्वभाग म्हणजेच सरदारकी तुकोजींना सोपवावी असे ठरले.[1] फारसा घोळ न पडता सुभेदारांची वस्त्रे तुकोजी होळकरास मिळाली आणि पुढील कामगिरी ओघानेच यांच्याकडे आली.[2] अशाप्रकारे होळकर राज्यात दुहेरी राज्यव्यवस्था सुरु झाली त्याचे दुष्टपरिणाम मराठा राज्याला भोगावे लागले.

## 2) माधवराव पेशव्यांना पाठिंबा -

तुकोजी होळकर पुण्यात कारभाराची वस्त्रे स्वीकारुन व नजरेचा ऐवज देवून वाफगावी आले असता माधवराव साहेबांचा हुज-या तुकोजी होळकरांना बोलावून घेऊन गेला.[3] कारण माधवरावांना तुकोजींची निष्ठा कोणाकडे आहे याची खात्री करावयाची होती. यावेळी पेशवे घराण्यातही दुहीची वणवा भडकला होता. रघुनाथ पेशवे पदाच्या प्राप्तीकरिता धडपडतेच होतेच. चुलत्या पुतण्यात पेशवेपदाकरिता वितृष्ट निर्माण झाले होते. हयावेळी तुकोजी श्रीमंत माधवरावसाहेबांना म्हणाले ' आमची क्रिया कै.बाजीराव साहेबांची व कै.सुभेदार

---

1) हो.इ.स. खंड 5, भा.3 पा.7
2) हो.इ. 1 पा.296
3) हो.इ.सा.6 पा.34

या उभयतांची वचन प्रामाण्य झाले आहे. तेच आम्ही जाणतो 'जो त्यांच्या गादीवर तो आमचा मार्तंड' दुस-याशी आम्हास कारण नाही"[4] तुकोजींचे कारभारी गंगोबा तात्या चंद्रचुड यांचा कल मात्र रघुनाथराव दादाकडे होता. यानंतर तुकोजी होळकर चांदवडास गेले.[5] रघुनाथराव तेथेच होते. चांदवडास श्रीमंत माधवराव साहेबांचे पत्र तुकोजीरावांकडे आले असता तुकोजींनी श्रीमंतास गुप्तपणे निरोप पाठविला की, ' आपण नाशिकला मुक्काम करावा आम्ही व दादासाहेब कुच करुन घोडवेच्या सुमारे जाऊ लागलो म्हणजे आपण आम्हावर चालुन यावे आपले फौजेचा धुलोरा कोशा पाहिला म्हणजे घोडे घालून लुटुन घेतो.'[6] हयाप्रमाणे श्रीमंत माधवराव साहेबांची स्वारी पाहताच पूर्वसंकेताप्रमाणे तुकोजींनी घोडे घालुन दादासाहेबांची फौज लुटुन घेतली. श्रीकृपेने श्रीमंतास यश आले पण दादासाहेब संधीचा फायदा घेऊन किल्ल्यावर गेले.[7] दुस-या दिवशी किल्लेदाराने दादासाहेब श्रीमंताच्या स्वाधीन केले.

यांप्रकाराने श्रीमंताची मर्जी तुकोजीवर बसली. श्रीमंतानी तुकोजीस वस्त्रे, अलंकार देवून गौरविले आणि इंदोरला जाण्याची परवानगी दिली.[8]

3) तुकोजीवरील जप्ती उठविली -

पानिपतावरील पराभवानंतर श्रीमंत पेशव्यांच्या मनात कै.मल्हारराव सुभेदाराविषयी मनात किलमिष निर्माण झाल्यामुळे नानासाहेब पेशव्यांनी होळकरावरजप्ती बसविली होती.

मधल्या काळात माधवराव पेशवेपदी आरुढ झाल्यावर पुणे दरबारात चुलत्या पुतण्यात बराच वाद निर्माण झाला होता. पण तो वाद संपल्यामुळे पेशवे माधवराव साहेब

---

4) हो.कै.- 6, पा.34
5) हो.कै.6 पा.35
पे.द.19, ले.78, पा.86, ले.79, पा.87.
ले.83, पा.90, ले.82, पा.88,89.
6) हो.इ.सा. 6 पा.35
पे.द.19, ले.85, पा.92
7) हो.इ.सा. 6, पा.35.
पे.द.19 ले.85, पा.92
8) हो.इ.सा.6, पा.36.

यादवी कलहातून मुक्त होऊन पूर्णपणे कार्यास मोकळे झाले. श्रीमंतानी दक्षिणेतील कामगिरी स्वतःच्या अखत्यारीत घेऊन उत्तरेतील कार्य तुकोजी होळकर, महादजी शिंदे, रामचंद्र गणेश कानडे व बिसाजी कृष्ण बिनीवाले हयांच्यावर सोपविण्याचे ठरविले.[9] पण त्यापूर्वी होळकर शिंदे हयांचे गुंते मोकळे करायचे होते.

ता.27.4.1967 च्या पत्राप्रमाणे होळकरांवर जप्ती व दादासाहेबास नजर देणेबाबत व जागेसबंधी पत्र रवाना झाले.[10] दादासाहेबांनी सनद देवून पाठविले. तुम्ही मुलुक ठाणे खाली करुन द्या. दादासाहेबाच्या चित्तात नवा मुलुक दिला तो निश्चय रुप घ्यावा. शिवाय नजर मातबर परस्परे चित्त शुध्द नाही.[11]

सन 1767 ला होळकरांची जप्ती सरकारी हुकमाने उठली. पेशव्यांचे कर्ज फेडण्याबद्दलचा होळकर आणि शिंदे हयांचा करार इ.स.1767 चे अखेरीस झाला.[12] सन 1768 मध्ये होळकरांची ' मागील सालासालची बाकी, खंडण्या, कर्जपट्टी वगैरे माफ केली, याउपर तुम्हाकडे गुंता नाही.'[13]

कै. मल्हारराव होळकर यांजकडे सरंजाम महाल वगैरे होते, हयाची जप्ती सरकारात केली होती. त्यास पुर्ववत प्रमाणे तुकोजी होळकर यांजकडे सरंजाम करार करुन जप्ती मोकळी केली असे. तरी दाखलगिरी न करणे म्हणोन महालवार व प्रांतावार पत्रे रवाना.[14]

---

9) हो.इ.भा.1, पा.297.

10) अप्रकाशित, द.क्र.29.
प.क्र.176.

11) अप्रकाशित, द.क्र.29.
प.क्र.176.

12) हो.इ.भा.1, पा.297.

13) हो.इ.भा.1, पा.297
पे.द.29, ले.183, पा.187.
म.इ.सा.खंड 13-14 रायरीकर खाजगीवाले दप्तर, प.162,पा.165.

14) हो.इ.भा.1, पा.297.
पे.द.29.

पुणे पेशवे दप्तर ता.12.5.1768 इ.यादी राजश्री तुकोजी होळकर सु I समान यशार जिल्हे याकडे सरकारचा ऐवज. खेरीज बुंदी मागील सालसनाचा, खंडण्या, कर्जपेठीवी वगैरे ओढ आहे. सनसबा अखेर हयास मल्हारजी होळकर यांचा काळ जाहला. सरदारी ओढग्रस्त जाहली. याजकरिता मागील फडशा करावा म्हणोन विनंती केली. त्याजवरुन मशारनिल्हे थोर सरदार व मल्हारजी होळकर मृत्यु पावले. याजकरिता खेरीज बुंदी मागील सालोसालची बाकी खंडण्या, कर्जपट्टी वगैरे येणे ते माफ केली असे. याउपर तुम्हाकडे गुंता नाही. बूंदीचा हिशेब सरकारात द्यावा व पुढे देत जावा. येणेप्रमाणे करार करुन मशारनिल्हेचे नावे सनद देणे. छ.24 जिल्काद चैत्र शुध्द मुक्काम पुणे.[15]

दि.14 जानेवारी 1761 रोजी पानिपतच्या रणभूमीवर मराठयांच्या झालेल्या दारुण पराभवाचा परिणाम केवळ दक्षिणेच्या राजकारणावरच नव्हे तर उत्तेरेच्या राजकारणावर ही होणे स्वाभाविकच होते.[16] हया पराभवामुळे आणि झालेल्या अपार हानीमुळे मराठे निष्प्रभ, दुबळे झाल्याचे वाटून दक्षिणेत निजाम आणि हैदर हयांनी डोके वर काढले. त्याप्रमाणे दिल्ली, आग्रा, दोआब, बुंदेलखंड, माळवा हया भागातील लहान मोठया राज्यकर्त्यांनी उत्तरेतील मराठा प्रभुत्व संपुष्टात आणण्याचे प्रयत्न सुरु केले होते.[17]

हया काळात पुण्यातही पेशव्यांच्या घरातच चुलत्या पुतण्याच्या वाद (रघुनाथराव आणि माधवराव) एवढा वाढला की त्याला संघर्षाचे स्वरुप प्राप्त झाल्यामुळे पेशवे माधवरावांनाही काही काळ उत्तरेकडे मुळीच लक्ष घालता आले नाही.

---

15) हो.इ.भा.1, पा.298,299.
   पे.द.29.

16) एन.एन.एम.भा.2, पा.517.

17) पे.द.खंड 29, ले.220, पा.232.
   ले.222, पा.234.

4) तुकोजींची उत्तरेकडील कामगिरी - 1769-72.

10 जुन 1768 ला पेशवे माधवरावांनी घोडप येथे रघुनाथरावांचा पराभव करुन त्यांना पुण्यास नजर कैदेत ठेवले. जानोजी भोसल्यांचा पराभव होऊन 1769 च्या कनकपूरच्या तहाने जानोजी भोसलेवर पेशव्यांनी जबर बसवून वेळप्रसंगी पेशव्यांना मदत करण्याचे वचन मिळविले. निजाम मित्र बनला होता. हैदरखानवरही जवळपास नियंत्रण प्रस्थापित करण्यात माधवराव यशस्वी झाले होते. इ.स.1769 पर्यंत पेशवे माधवरावांची दक्षिणेच्या कटकटीतून बरीच सुटका झाली होती.

श्रीमंत माधवराव पेशव्यांचे स्वप्न दक्षिणेपूरतेच मर्यादित नव्हते तर उत्तरेतही मराठयांचा प्रभाव पूर्ववत प्रस्थापित करण्याचा होता.[18] आणि म्हणुन पेशवे माधवरावांनी दक्षिण कामगिरी स्वतः स्वीकारुन उत्तरेच्या कामगिरीवर रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्ण बिनीवाले हयांच्या नेतृत्वात इ.स.1769 च्या एप्रिल महिण्यात एक मोठी सेना रवाना केली.[19] हयांच्या मदतीला तुकोजी होळकर आणि महादजी शिंदेंची रवानगी उत्तरेत झाली.

तत्पूर्वी 28 सप्टें 1767 रोजी सखाराम बापू तुकोजी होळकरास लिहितात ' महादजी शिंदे यास घेऊन लांब लांब मजला करीत यावे '[20] 6 मे 1768. महादजी शिंदे तुकोजीस लिहितात 'आपण व आम्ही समागमेच हिंदुस्थानात जाऊ '[21]

पानीपतानंतर काही काळ मराठे व अब्दाली दोघेही दिल्लीच्या राजकाराणातून निवृत्त होताच जाट, रोहिले व वजीर सुजाउद्योला यांनी या संधीचा फायदा करुन घेवून दिल्लीच्या राजकारणातून मराठयांचे कायम उच्चाटण करुन आपले वर्चस्व स्थापण्याचा प्रयत्न सुरु केला. यावेळी बादशाहा शहाआलम अलिगोहर हा ब्रिटिशांचा अंमलाखाली अलाहाबाद

---

18) पे.द.खंड 29, ले.231, पा.2399
19) खरे वा.वा. ऐतिहासिक लेख संग्रह भा.4,पा.1879.
 पे.द.खंड 29, ले.224, पा.236, ले.231, पा.239.
20) च.दि.नि.3, ले.7.
21) च.दि.नि.3, ले.7.

येथे असहाय्य आणि असंतुष्ट होता. मराठयांनी सरळ दिल्लीपर्यंत चाल करुन राजधानी ताब्यात घ्यावी असा आदेश माधवराव पेशव्यांचा विसाजी कृष्ण बिनीवाले हयांना होता. ' रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्ण बिनीवाले हया दोघामध्ये माळव्यात लष्कर आल्यापासून चुरस वाढत चालली होती. प्रत्येक गोष्टीत यांची हमरीतुमरी चाले '[22] उत्तरेत आल्यावर रामचंद्र गणेश कानडे व होळकर, शिंदि या तिघांनी तीन कार्यक्रम वाटून घेतले. कानडे बुंदेलखंडाकडे वळले. होळकर बुंदीकोट्याकडे व शिंदे उदेपुराकडे. आपआपल्यापरी खंडणी वसुलाकडे ही मंडळी गुंतली होती.[23] उत्तरेत मराठी फौजा पोहोचताच जाट राजा नवलसिंगनी हयांना विरोध करण्यास सुरुवात केली.[24]

यावेळी तुकोजी व महादजीत मतभेद निर्माण झाले. 14.5.1769 त्रिंबक शिवदेव लिहितो ' शिंदि होळकर उदयपूराकडे आहेत. उभयतांचे चित्त शुध्द नाही'.[25] महादजीने राणारतन सिंहाचा पक्ष घेतला. तुकोजीने राणा आरसीकडुन खंडणी सोडे चौसष्ट लक्ष करार केली. रतनसिंहास सव्वालक्षाचा वाटा द्यावा व महादजीस पाच लक्षाचा वाटा द्यावा याप्रमाणे करार केला.[26] होळकरांचा सरदार खंडूजी अरगडे ता.4.12.1769 रोजी लिहितो ' बुंदीकोटयाचे प्रकरण बारा लक्षपर्यंत चुकणार आहे'[27] पुढे जाटाचे मुलुखात जाऊ. जाटाचे पारपत्य केल्यास माधवसिंग पन्नास लाख व बादशहा पन्नास लाख देण्यास तयार आहे. जाटाने आमचे तोंडावर विस हजार फौज पाठविली आहे '[28] जाटाचे पारिपत्य करण्यास इ.स.1769 च्या अखेरीस सर्व फौजा निरनिराळया कामगि-या आटपून चंबलवर एकत्र होऊन जाटाचे मुलुखात शिरल्या. दि.5 एप्रिल 1770 रोजी गोवर्धन येथे जाट आणि मराठे हयांच्यात झालेल्या लढाईत जाटांचा निर्णायक पराभव झाला. त्यांची संपूर्ण फौज लुटल्या गेली.[29]

---

22) ऐ.ले.सं. पा.1879.
23) हो.इ.भा.1, पा.300.
24) सी.पी.सी.भा.1, नं.128, 161.
25) पे.द.29, ले.233.
26) पे.द.29, ले.243.
27) हो.इ.भा.1, पा.300.
शिंदि इ.सां.गुलगुले-2 ले.75,पा.62.
28) हो.इ.भा.2, पा.300.
29) सरकार, फॉल भा.3 पा.9.
हो.इ.भा.1, पा.300.

नवलसिंगाकडे मिस्टर सुमरु व फ्रेंच जनरल माडेल हे युरोपियन अंमलदार होते. हयांचा सुभेदार तुकोजीरावांनी पराभव केला.[30] जाटाचे खंडणीचा करार पासष्ट लाख दरबार खर्च मिळून जाला आहे......... परंतु सरकारातून मामलत जालियामुळे होळकर आजुदे आहेत........शिंदि यांचे मत मामलत करावयाचे आहे.[31] नवलसिंग जाटाच्या पराभवामुळे मराठयांच्या मार्गातील एक महत्वाचा काटा नाहिसा झाला. त्यानंतर लगेचच मराठयांनी आग्रा आणि मथुरा ही ठिकाणेही हस्तगत केली.[32]

मराठयांच्या उत्तरेतील आगमनामुळे नजीबखान घाबरला. पानिपतच्या पराभवाचा मराठे बदला घेतील या भीतीपोटी त्याने तुकोजी होळकरामार्फत मराठयांशी मैत्री केली. नजीबचा होईल तितका उपयोग करुन नंतर पारिपत्य करावे असे तुकोजी व विसाजीचे मत होते तर नजीबचे पूर्णपणे पारिपत्य करावे असे महादजी व रामचंद्र गणेशाचे मत होते. शेवटी पेशव्यांचे विचारे ठरले की नजीबशी कायमची दोस्ती करु नये. दिल्लीच्या मसलतीत त्याचा शक्य तितका उपयोग करुन घ्यावा आणि मागाहुन त्यास जेर करावे.[33] एप्रिल 1770 मध्ये मराठे यमुना ओलांडून अहमदखान बंगशाच्या प्रदेशात शिरले. हयावेळी सुध्दा नजीबखान अहमदखान बंगश हयांचेशी संधान साधुन मराठयांचा घात करण्याच्या गुप्त कारवाया करीतच होता. परंतु हयावेळी मराठे पूर्वानुभवाने सावध झाले होते. चारही बाजुंनी पठाणांचा वेढा पडण्याची शक्यता दिसताच मराठे यमुनपर्यंत परत आले. दि.31 ऑक्टोंबर 1770 रोजी नजीबखानाचा मृत्यु झाला. त्याचा मुलगा झबेताखान हा पित्याची संपत्ती आणि सत्ता हयांचा वारस झाला.[34] झबेताखानाने बादशहा शहाआलम कडुन मीरबक्षीचे पद जबरीने मिळवून घेतले.[35]

---

30) हो.इ.भा.1, पा.300.
31) पे.द.29,ले.233, पा.236, ले.258, पा.263.
ले.257, पा.263, ले.260 ते 263, पा.264.
32) सी.पी.सी.भा.3, नं.211.
एन.एच.एम.भा.2, पा.526, 527.
33) हो.इ.भा.1, पा.300,301.
34) सी.पी.सी.भा.3, नं.605.
35) एन.एच.एम.भा.2, पा.527.

आणि हया अधिकाराच्या बळावर दोआबात त्याने मराठयावर चाल केली. मराठयांनी पूर्ण सहकार्याने बंगश आणि रोहित्याविरुध्द लष्करी कारवाई केली. इटावा हस्तगत करुन दि.15 डिसेंबर 1770 रोजी त्यांनी फरुकाबाद ताब्यात घेतले. मराठयांना तोंड देणे अशक्य होऊन अहमदखान बंगशाने प्राणाची भीक मागत पानिपत युध्दापूर्वीचा मराठयांच्या ताब्यात असलेला दोआबातील सर्व प्रदेश परत त्यांना दिला.[36] हयामुळे दोआबात मराठयांची सत्ता आणि प्रतिष्ठा प्रस्तापित झाली. याप्रमाणे जाट रोहिले नामोहरण झाले. नजीबुद्योला व बंगश मृत्यु पावले. इंग्रज कंपनी सरकार तटस्थ राहिले आणि मराठयासमोर उभे राहण्यास कोणीही राहिला नाही.

**5) मराठयांच्या मदतीने बादशहा दिल्लीतख्तावर - 6 जानेवारी 1772.**

जाट आणि रोहिले हे मराठयांचे प्रमुख दोन शत्रु हयांच्या सत्तेला पायबंद बसला आणि त्याचबरोबर बादशहाला दिल्लीत परत आणून दिल्लीवर ताबा मिळविण्याकरिता मराठयांचा मार्ग मोकळा झाला.[37] नजीबखानाच्या निधनानंतर मिर्झा नजफखान हा दिल्लीच्या कारभारात प्रमुख झाला. मराठयांच्या नेतृत्वात ब्रिटिशाविरुध्द उत्तरेच्या सत्ताधिशांची युती होऊ न देण्याचा प्रयत्न ब्रिटिशांचा होता. तशी युती बादशहा भोवतीच केंद्रित होऊ शकेल हयांची जाणीव असल्यामूळे अलाहाबाद येथे बादशहा आलम हयाला इंग्रजांनी आपल्या नियंत्रणात ठेवले होते.[38]

इंग्रजांच्या भरवश्यावर दिल्लीत जाऊन आसन स्थिर करण्यात अर्थ नसल्याची कल्पना बादशहाला आली. शिवाय बादशहाची माता झीनतमहलनेही मराठयांच्या आधार घेण्याचा सल्ला दिला. तेव्हा मराठयांचा दोआबात तळ असतांना वजीर शुजाउद्योला याने

---

36) सी.पी.सी.भा.3, नं.505,517,530.
पे.द.खंड 29 ले.22, पा.18,19.
हो.इ.भा.1, पा.301.

37) सी.पी.सी.भा.3, पा.614.

38) दत्ता के.के. 'शहाआलम सेकंड ॲंड दि इस्ट इंडिया कंपनी' पा.47.

रामचंद्र गणेश कानडेची भेट घेतली. मिर्झा नजफखानालाही मराठयांची भेट घेण्यास पाठविले. परंतु मराठयांच्या अटीबद्दल बादशहा घासाघीस करु लागला. शेवटी मराठयांनी दुस-या कोणाला तरी तख्तावर स्थापण्याचा धाक घालताच मात्र बादशहा अनुकूल झाला.

इ.स.1771 च्या प्रारंभी झाबेतारवानाकडून दिल्ली हस्तगत करण्यास मराठा सैन्य पुढे सरसावले आणि 10 फेब्रुवारी 1771 रोजी दिल्ली काबिज केली.[39] बादशहाचा मुलगा जवानबख्त हयाला तख्तावर बसवुन शिंदेनी नजराणा पेश केला, हे पाहताच दि.12 फेब्रुवारी 1771 रोजी दिल्लीला जाण्याकरिता बादशहाने अलाहाबाद सोडले.[41] 6 जानेवारी 1772 रोजी बादशहा शहाआलम दिल्लीला येऊन पोहचला.[42] बादशहा शहाआलमला दिल्लीच्या तख्तावर बसविण्याचे महत्वांचे कार्य इ.स.1772 मध्ये मराठयांनी महादजीचा पुढाकाराने साध्य केले.[43]

### 6) तुकोजी आणि रोहिले फत्तरगड मोहीम -

मराठयांच्या साहाय्याने बादशहा तख्तावर बसल्यामुळे साहजिकच मराठयांची प्रतिष्ठा दरारा एकदम वाढला होता. तथापि आपला दबाव कायम असावा असे उत्तरेकडील सरदारांना वाटणे साहहिकच होते. रोहिले एकदम स्तब्ध झाले नव्हते. मराठयाविरुध्द कारवाई करणारा एक शत्रु उरला होता तो म्हणजे झबेताखाना बादशहाच्या मिरबक्षीबद्दल होळकर आणि शिंद्यात मतभेद झाल्याने मराठी सरदारात दोन पक्ष दिसु लागले.[44] मोगल

---

39) सी.पी.सी.भा.3, नं.605,665.
पे.द.खंड 29, ले.265, पा.270, ले.266, पा.271.
म.प.5,पा.261.

40) सी.पी.सी.भा.3, नं.694.
पे.द.खंड 29,ले.89, पा.84, दि.14.4.1771 च्या पत्रात कराराचे तपशिल.

41) सी.पी.सी.भा.3, नं.717,720, सरकार कॉल भा.2 पा.552,553.

42) पे.द.खंड 29, ले.89,पा.84.

43) पे.द.खंड 29, ले.266,पा.271,जि.च.पा.74.
केळकर न.चि.' मराठे आणि इंग्रज ' पा.117.

44) हो.इ.भा.1,पा.302, हो.कै.खंड 6, आवृत्ती दुसरी पा.40.

फौजेस बादशहाने मराठयावर हल्ला करण्यास उत्तेजन दिले. होळकर व बिनीवाले हयांच्या फौजावर बादशाही पंधरा हजार फौज चालुन गेली. तुकोजी होळकरांनी त्यांचा पराभव केल्याने डिसेंबर 1772 मध्ये बादशहाला होळकरासी तह करावा लागला.[45] यांचे वैषम्य वाटून शिंदि पंचवीस कोस मागे गेले. पण पांडुरंग रणसोड पारनेकर व दिवाण फडणिसांना पाठवून शिंदिना व कानडेना समजावून आणले. हयानंतर मात्र त्रिवर्गसरदार एकत्र होवून झाबेताखान रोहिला यांच्या राजकाराणास लागले.[46] सन 1772 फेब्रुवारीमध्ये मराठे झाबेताखानावर चालुन गेले. शिंद्याचे लोकांचा मारा अजब ठरला. मराठयांनी रोहिल खंडातील त्यांचा सर्व प्रदेश आपल्या ताब्यात घेतला.[47] झाबेताखान, अंधाराचा फायदा घेवून पळून गेला. पथरगडापर्यंत मराठयांनी त्याचा पाठलाग केला. दुस-या दिवशी सुभेदार तुकोजीराव स्वतः जातीनिशी गंगापार उतरले. तिसरे दिवशी गाठ घालून लढाई मातब्बर झाली. बक्षीचे डोके कापून आणुन फौज बरबाद केली.[48] शिंदे रामचंद्र गणेशांनी कुमक केली नाही. बक्षी मारल्याचे समजताच झाबेताखान साठ हजार फौज व तिनशे तोफा घेऊन तुकोजींच्या मुकाबल्यास आला. दुतर्फा शह पाडून रोहिले कुल बरबाद झाले.[49] हे वर्तमान शिंदे व रामचंद्र गणेशा यास समजताच कुच करुन सुभेदारास सामील झाले. त्रिवर्ग एक होऊन पथरागडास मोर्चे लावून त्यांनी किल्ल्यावर हल्ला केला. हे ठाणे एप्रिल 1772 मध्ये घेतले. येथेच झाबेताखानाची कुटूंबीय मंडळी त्यांच्या हाती लागली. झाबेताखान मात्र उत्तरेच्या जंगलात पळून गेला.[50]

सुभेदार तुकोजीराव व नवलसिंग यांची लढाई भरतपूर व डींग यामध्ये होऊन जाटांचा पूर्ण पराभव झाला. या युध्दात खुद्द तुकोजीराव हजर होते. लढाई होळकरांनी मारली. हया ठिकाणी तुकोजींना प्रचंड लुट मिळाली. पानिपतापासून हत्ती, घोडे, तोफा आणि इतर अनेक

---

45) हो.इ.भा.1 पा.302.
हो.कै.खंड 6 पा.40,41.

46) हो.कै.खंड 6 पा.40-41

47) हो.इ.भा.2, पा.302
पांडे आर.जी.महादजी शिंदे ॲंड पुणा दरबार, पा.52

48) हो.कै.खंड 6 पा.41

49) हो.कै.अप्रसिध्द भागापैकी पा.1

50) हो.कै.खंड 6, पा.41, हो.कै.पैकी अप्रकाशित भा.पा.1
ऐ.ले.सं.भा.4, पा.1887.

मौल्यवान वस्तुंची रोहिल्यांनी आणलेली लुट मराठयांनी परत मिळविली.[51] तिन्ही लष्कराची लुट एकत्र करुन तुकोजीरावांनी बरहुकुम हिस्सा वाटुन दिला.[52] हयानंतर फौजा माघारी फिरुन जाटांपासून खंडणी वसूल करुन सुभेदार तुकोजीराव होळकर इंदुरास परतले. या स्वारीस फत्तरगढची स्वारी म्हणतात.

मराठयांच्या साहयाने दिल्लीच्या तख्तावर बादशहा शहाआलम स्थानापन्न झाला. आणि दिल्लीचा मराठयांनी ताबा घेतला. हे यश मराठयांची मान अभिमानाने ताठ व्हावी असेच होते. या यशाने मराठयांनी पानिपतावरील कलंक धुवून महापराक्रमी म्हणुन मराठयाचे स्थान सिध्द केले. आणि शिवाजी महाराजांच्या हिंदवी स्वराज्याच्या महान आकांक्षेतील एक प्रमुख टप्पा हस्तगत केला. माधवरावांचे उद्‌दीष्ट पूर्ण झाले. पहिल्या तीन पेशव्यांनी जोपासलेले स्वप्न पुर्ण झाल्याचे समजले तेव्हा पेशवे माधवराव मृत्युशय्ये वर होते. पण हया वार्तेने अतीव समाधानी होऊनच त्यांनी प्राण सोडला. पेशवे माधवराव वयाच्या अवघ्या अठ्ठाविसाव्या वर्षी पुण्याजवळ थेऊर येथे बुधवार दि. 18 नोव्हेंबर 1772 रोजी निधन पावले.[53]

### 7) बारभाई मंडळाची स्थापना - इ.स.1773

पेशवे माधवरावांच्या मृत्युनंतर मराठा साम्राज्य अंतस्थ वादवीमूळे उध्वस्त होऊन मराठा साम्राज्याच्या -हासास सुरवात झाली. रघुनाथरावांच्या पेशवे पद मिळविण्याच्या आसुरी महत्वाकाक्षेमुळे खुद्द नारायणराव पेशव्याच्या शनिवार वाडयात दि.30 ऑगस्ट 1773 रोजी त्यांची हत्या झाल्यामुळे मराठा इतिहासाला फार मोठा कलंक लागला.[54] पुण्यात रघुनाथरावांच्या

---

51. हो.कै.खंड 6 पा.42 हो.कै.पैकी अप्रकाशित भाग पा.2,3,4
    हो.इ. भाग 1 पा.304
    पे.द. खंड 29 ले 270 पा. 274
52. हो.इ. भाग - 1 पा.304 हो.कै. अप्रकाशित पा.3,4
53. हे.प.या. पा.463
    खोब्रेकर वि.गो. पा. 373
54. पे.द. खंड 29 ले. 156 पा. 158
    म.इ.सा. भा.4 पा.45
    ऐ.ले.सं.भा-4 ले.1232 पा.1946 ले.1243 पा.1966 ले.1257 पा.1991

विरोधात बारभाई मंडळाची स्थापना पेशव्यांची गादी मिळविण्याकरीता पुण्यातील मंत्रीमंडळाविरुध्द रघुनाथरावांनी इंग्रजांचा घेतलेला आश्रय आणि त्यातुन उदभवलेले मराठा राज्याला अत्यंत घातक ठरलेले मराठा इंग्रज युध्द अशी संकट परंपरा मराठा राज्यावर कोसळली.

पेशवे नारायणरावांच्या मृत्युनंतर पेशवे पद दुसरी कुणीही व्यक्ति पेशव्यांच्या घरात नसल्याने रघुनाथरावांकडे आले. रघुनाथरावांचे मुख्य सहकारी चिंतो विठ्ठल आणि मोरोबा फडणीस बनले.[55] परंतु न्यायाधीश रामशास्त्री प्रभुणे हयांनी नारायणराव पेशव्यांच्या हत्तेच्या कटात रघुनाथराव सामील असल्याचा निकाल व देहान्ताची शिक्षा फर्माविली यामुळे जनमत रघुनाथरावांच्या विरोधात तयार झाले.[56] दरबारातील नेत्यांची मनेही संतप्त झालेली होती.[57] हयाचवेळी नारायणरावांची पत्नी गंगाबाईच्या पोटी पेशव्यांचा वंश वाढत असल्याची बातमी मंत्रीमंडळाला कळली. गंगाबाईना मुलगी झाली तर गंगाबाईच्या मांडीवर दत्तक देवून पेशव्यांचा कारभार चालवावा अशी योजना सखाराम बापू बोकीलांच्या पुढाकाराखाली साकार होऊ लागली.[58]

मराठा राज्यात चाललेल्या हया गोंधळाचा फायदा घेऊन निजामाने मराठयांविरुध्द शस्त्र उपसले.[59] तेव्हा निजामाचे पारिपत्य करण्यासाठी रघुनाथराव दादांनी इ.स.1773 मधे पुणे सोडले. हयामुळे सखाराम बापू आणि नाना फडणीस हयांना रघुनाथरावा विरुध्द कार्यवाही करण्यासाठी परिस्थिती अनुकुल झाली. सखाराम बापू आणि नाना फडणीसांच्या पुढाकाराने बारभाई मंडळाची निर्मिती झाली.[60] आणि कारभाराची सुत्रे हया मंडळाकडे आली.

---

55. फॉरेस्ट 'सिलेक्शन फ्रॉम दि लेटर्स' डिसपेचेस अँड स्टेट पेपर्स मराठा सीरीज' भा-1 पा-252
56. भिडे रा.गो. 'अलिजा बहादर महादजी शिंदे' पा.8
57. पे.द.खंड - 5 ले. 17 पा.14
    ऐ.ले.स. भाग-4 पा. 2009
58. ऐ.ले.सं. भा-4 पा. 2008
59. ऐ.ले.सं. भा-4 पा.2017
60. ऐ.ले.सं. भा-5 पत्रे 1299 पा.2090
    फॉरेस्ट मराठा सीरीज भा-1 पा.253

हया बारभाईत सखाराम बापू बोकील, नाना फडणीस, हरिपंत फडके, त्रिंबक पेठे, मालोजी घोरपडे, पटवर्धन, तुकोजीराव होळकर आणि महादजी शिंदे आदी नेते होते.[61] रघुनाथरावविरुध्द त्रिंबकराव पेठे, साबाजी भोसले आणि हरिपंत फडके हयांना फौजेसह बारभाईनी रवाना केले.[62] दि. 18 एप्रिल 1774 रोजी पेशवे नारायणरावांचा पुत्र सवाई माधवराव पुरंदर येथे जन्माला येताच बारभाईची स्थिती अधिकच बळकट झाली.[63] सवाई माधवरावांच्या वयाच्या चाळीसाव्या दिवशी पुरंदर येथे मोठा दरबार भरवून त्यांना पेशवे पदाची वस्त्रे दि. 28 मे 1774 रोजी देण्यात आली.[64]

रघुनाथरावांमध्ये पेशव्याच्या सैन्याला तोंड देण्याची हिम्मत नव्हती. तुकोजी होळकर हयांची मदत मिळेल हया आशेने रघुनाथराव दादा ब-हाणपुर येथे आले.[65] पुढे ते नर्मदा उतरुन कसेबसे इंदुरास येऊन पोहचले. सुभेदार तुकोजीराव तीन कोस सामोरे येऊन त्यांना मोठया आदराने शहरात घेऊन गेले.[66] परंतु तुकोजी होळकर व महादजी शिंदेची कोणत्याच पक्षाला सामील होण्याची इच्छा नसल्याने[67] रघुनाथरावांना समजुतीच्या चार गोष्टी

---

61. पे.द.खंड 5 ले 24 पा. 21-22
ऐ.ले.सं. भा-4 पा.2008
62. पे.द.खंड 5 ले 30 पा.27 ले.43 पा.39
63. पे.द.खंड 5 ले.45 पा.42
' इलियट अँड डाक्सन ' दि हिस्ट्री ऑफ इंडिया ' या 8 पा.295
डॉडवेल ' केंब्रीज हिस्ट्री ऑफ इंडिया ' या 5 पा.255
खोब्रेकर वि.गो.पा.415
64. पे.द.खंड 5 ले. 49 पा.44
खोब्रेकर वि.गो. पा.415
65. सी.पी.सी. भा-4 नं. 1026
फॉरेस्ट मराठा सिरीज भा-1 पा.233
66. हो.इ.भा-2 पा.305 पा.67, 68
67. उभयता धनी आपण कोणासी गुंजावे समानबल जबर आहेत.
दोन्ही टाकतील आणि सुलुखावर येतील. तर आपण दरम्याने पडून सुलुख करुन घ्यावा.
पे.द. खंड 36 ले. 58 पा.46

सांगुन आत्मघाती मार्गापासून त्यांना परावृत करण्याचा तुकोजीराव होळकर व महादजी शिंदेनी बराच प्रयत्न केला.[68] पण पुण्याचे मंत्री आपल्याला कैद करतील हया भितीने रघुनाथरावांच्या मनाने धसका घेतला. आणि 10 डिसेंबरच्या रात्री सर्वांना चुकवुन त्यांनी थेट गुजराथकडे पळ काढला.[69] त्यांना तुकोजीराव होळकर आणि महादजी शिंदे अडवू शकले असते परंतु पेशव्याच्या घराण्यातील एक श्रेष्ठ व्यक्तिविरुध्द कारवाई करण्याची कदाचित त्यांची तयारी नसावी.[70]

हयावेळी त्रिंबकराव पेठे ही रघुनाथरावांच्या मागावर होतेच. त्रिंबकराव पेठेंनी सखाराम बापूंना पाठविलेल्या पत्रात लिहिले की लढाईस आवश्यक सरंजाम, तोफा, दारुगोळा, तोफ, भाले, चिलखते, कापड वगैरे लवकर पाठवावे.[71] हयाच पत्रात ते पूढे लिहितात होळकर, शिंदे हिंदुस्थानातुन सरदारासह आले आहेत. त्यांना लवकर पोहचण्याविषयी आम्ही पत्रे पाठविलीत. आपणही त्यांना पत्रे पाठवुन लवकर सामील होण्याविषयी कळवावे. हरिपंत फडके, मोरोबा दादा ही लवकर सामील झाल्यास एकमेकांच्या साहाय्याने आणि सल्ल्याने मसलत लवकर पार पडेल.[72]

रघुनाथराव अचानकच रात्रीचे पळुन गेल्यामुळे पुणेर मंडळीचा रोख तुकोजीराव व महादजी शिंदेवर होता. त्यावेळी तुकोजी रावांनी नाना फडणीस हयांना पत्र लिहुन आपला संपूर्ण पाठिंबा बारभाईसच असल्याचे स्पष्ट केले.[73] तुकोजीराव लिहितात ' राजश्री महादजी

---

68. एम.एच.एम. भा-3 पा.47
69. खरे बा.बा. ना. फ. च. पा. 35-36
70. एन.एच.एम. भा-3 पा.46
71. अप्रकाशित - पे.द.रुमाल नं.5 क्र.36
त्रिंबकराव पेठेंचे सखाराम बापूंना लिहलेले पत्र.
72. अप्रकाशित - पे.द.रुमाल नं.5 क्रं.36
73. अप्रकाशित पे.द.5 क्रं.66
हे पत्र स्वतः तुकोजीरावांनी नाना फडणीस यास लिहीले आहे. या पत्रावरील शिक्काही तुकोजीचाच आहे.

शिंदे आणि आमचे काही मतभेद होते. आता मतभेद मिटलेत. आणि स्वामीसेवा एकरुपपणे करण्याचे ठरले. महादजीपंत गुरुजींनी आपणाकडील सविस्तर वर्तमान सांगितले. श्रीमंत (रघुनाथराव) इकडे आले तरी आपण त्याचा दुसरा अर्थ घेऊ नये. आमचा विचार आपल्या (नानांच्या) खेरीज नाही. आमचे लक्ष आपल्या शिवाय इतरत्र नाही. जेही कार्य करु ते आपल्या सत्यानेच घडेल.[74]

8) **रघुनाथरावांचा पाठलाग व गुजराथ मोहीम -**

रघुनाथरावांच्या मागोमाग हरिपंत फडके नर्मदेपर्यंत आले. त्यावेळी तुकोजीराव आणि महादजींनी हरिपंत फडक्यांना कळविले. आपण नर्मदा उतरल्यास आमचा प्रदेश खराब होईल. कदाचित रघुनाथरावही भलतीकडे जातील त्याची समजुतकाढूनआम्हीच त्यांना पुण्याला घेऊन येतो.[75] त्यांच्या म्हणण्यानुसार हरिपंतानी रघुनाथरावांना 7 लाख श्रीमंताचे लष्करी खर्च म्हणुन दिले. पुणे दरबारने पुर्ण अखत्यार तुकोजीराव आणि महादजींना देवून त्यांच्या मागण्या मंजुर केल्या. पण रघुनाथरावांनी त्यांना चुकवुन पळ काढला.[76]

रघुनाथराव गोविंदराव गायकवाडचे साहाय्य मिळविण्यास गुजराथेत गेले. तुकोजीराव होळकर, महादजी शिंदे, हरिपंत फडक्यांच्या लष्करात राहुन रघुनाथरावांना सतत निरोप पाठवित होते. पण उपयोग झाला नाही. शेवटी ता. 17/2/1775 रोजी माहि नदीवर रघुनाथराव आणि मराठा फौजेची मोठी निकराची लढाई झाली. या लढाईचे प्रमुख तुकोजीराव आणि महादजी होते. रघुनाथरावांचा पुर्ण पराभव होऊन त्यांच्या तोफा, हती, निशाने या सरदारांच्या हाती पडलीत. रघुनाथरावांनी पळ काढुन खंबायत मार्गे सुरत गाठले.[77]

---

74. अप्रकाशित पे.द.5 क्र.66
75. ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 305
76. ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 306
77. ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 306

हयावेळी तुकोजीरावांनी सखाराम बापूंना रघुनाथ रावांच्या हालचाली संबंधी पत्र पाठविले. तुकोजीराव लिहीतात, ' श्रीमंत इंग्रजासह माही उतरुन भडोच ला गेले. आम्ही त्याचे मागे रेवातीरास आलो. पुढे आम्ही व हरिपंत बाबा भडोचच्चा 12 कोसावर नर्मदा उतरणार तर एकदम पुर आल्याने अर्धे लोक अर्धे खाली राहिले. त्यामुळे आली मोहनचे मार्गे आकबरपूरचे घाट उतरुन पारच्या फौजेस सामिल होऊ.' [78]

9) **पहिले इंग्रज मराठा युध्द - इ.स. 1775 -**

पेशवे पद मिळविण्यास रघुनाथराव सुरतला इंग्रजांच्या आश्रयास गेले. 6 मार्च 1775 रोजी त्यांनी इंग्रजासोबत सुरतचा तह केला.[79] हया तहामुहे इंग्रज-मराठा युध्द अपरिहार्य ठरले. रघुनाथरावांना पेशवे पदी बसविण्यास पुण्याकडे जाण्यास कर्नल किटींगच्या नेतृत्वात दि. 15 मार्च 1775 रोजी ब्रिटीश सैन्य सुरतवरुन निघाले. 18 मे 1775 रोजी अडास येथे त्यांना हरिपंत फडके कडून झालेल्या प्रखर विरोधाने इंग्रजांचा भ्रमनिरास झाला.[80] हयामुळे ग.ज.वॉरन हेस्टिंग्जने कर्नल अॅप्टन हयाला कलकत्याहुन पुण्यास तहाच्या वाटाघाटी करण्यास पाठविले. [81] हयांच्यात दि. 1 मार्च 1776 रोजी पुरंदर येथे तह झाला. [82]

---

78. अप्रकाशित पे.द.कमाल नं.5 पत्र क्रं. 56
79. पे.द.खंड 36 ले 257 पा. 219 ले.258 पा. 220
    फॉरेस्ट ' मराठा सिरिज ' भा-1 पा.307
    आईटसन सी.यु. ' ए कलेक्शन ऑफ ट्रिटीज एन्गेजमेन्टस अॅड सब दज्स रिलेटींग टू इंडिया अॅड नेबरिंग कंट्रीज ' भा-6 पा.21
80. ऐ.ले.सं. भा-5 ले.1464 पा. 2319-2320
    फॉरेस्ट ' मराठा सिरीज' भा-1 पा. 227-230
    ठाकुर वा.वा. हो. इ. भा-1 पा. 306-307
81. पे.द.खंड-36 ले. 281 पा. 240
82. आइटसन सी.यु. भा-6 पा.28
    सेन एस.एन. ' अॅग्ली मराठा रिलेशन्स ' पा. 282-83
    मॅफरसन ' सोलजरिंग इन इंडिया ' पा. 283
    खरे वा. वा. ना. फ. च. पा.45

हयावेळी पुणे दरबारास तुकोजीराव होळकर आणि महादजींची गरज प्रकर्षाने भासु लागल्याने त्यांना आणावयास कारकुन पाठविले. ' या सबंधी गंगाजी अन्हाड याने हरिपंत तात्यास पत्र लिहुन होळकर, शिंदे यांनी त्वरीत यावे असे लिहिले आहे. त्या पत्रात गंगाजी लिहितात. ' *होळकर व पाटील बाबास देशी येण्याविषयी ताकीद करीत आहे.* होळकर आणि शिंदे हे उभयता एकाच मुहूर्तावर सोबतच येणार आहेत.' [83]

**10) तुकोजीरावास - पंचमहालाची सनद -**

तुकोजीराव होळकरांना प्रांत नेमावार पंचमहाल (गुजराथ) येथे सरंजाम दिल्याबाबत सनद.[84]

' तुकोजी होळकर यास सालमजकुरी सरंजाम दिल्हे येवीसी सनद.

2 प्रांत नेमावार पंचमहाल

। 5 ।। नेमावार

। 5 ।। कावफोड

। 5 ।। सतवस

। 5 ।। राजोर

। 5 ।। दरव गाव

---

5

येकुण पांच महाल येथील कमबीस नारो बलाल भुसकुटे याजकडे होती ते दुर करुन होळकर याजकडे पेशजी प्रेम खेरीज, मौजे हरदा व बाबई व कोकरी एकुण तीन गाव मुगाजी सावत याज बा । व मौजे हिजलगाव पो । नेमावार हा गाव पिलाजी जाधव याज बा । येकुण चार गाव करुन सदरहु महालचा निमे अमल सरंजाम करुन दिल्हा असे तरी सन पै वरतगीर पासुन अमल देणे म्हणोन सनद [85]

---

83. अप्रकाशित पे.द.रुमाल नं.5 पा.83
84. अप्रकाशित पे. द. हिंदुस्थान रुमाल नं. 204
85. अप्रकाशित पे.द. हिंदुस्थान रुमाल नं. 204

**11) सदाशिवरावभाऊंचा तोतया - इ.स.1776 तुकोजीची कामगिरी -**

1 मार्च 1776 रोजी झालेल्या पुरंदरच्या तहाने किंचित स्वस्थता मिळते न मिळते तोच तोतयाचे बंड उभे राहिले. सदाशिवराव भाऊंचा तोतया रत्नागिरीच्या किल्ल्यात कैद होता. किल्लेदार रामचंद्र नाईक परांजपे ह्यांनी फेब्रुवारी 1776 मध्ये तोतयाची सुटका केली. [86] पुणे दरबारने काही पायदळ व तोफा देवून भिमराव पानसे हयास तोतयाच्या बंदोबस्तास पाठविले. तुकोजी होळकर, शिंदेना मदतीस सोबत पाठविले. [78] तोतयाचे अनुयायी सिंहगडापर्यंत पोहचले. [88] हरिपंत फडकेच्या दक्षतेमुळे त्यांचा पराभव झाला. इंग्रजांच्या मदतीमुळे तोतयाने मुंबईचा मार्ग धरला. किल्लेदाराला वढणीवर आणण्याचे काम तुकोजी होळकरांवर सोपवून शिंदे तोतया मागे गेले. [89] मुंबईला पोहचण्यापूर्वी रघुजी आंग्रेनी नोव्हेंबर 1776 मध्ये तोतयाला पकडून महादजींच्या स्वाधीन केले. [90] तोतया असल्याचे सिध्द होताच आणि त्यानेही तशी कबुली देताच त्याला 17 डिसेंबर 1776 ला मृत्युदंड दिला. [91]

---

86. ऐ.ले.सं. भा-6 ले. 1907 पा. 2693
87. ठाकुर वा.वा. हो. इ.भा-1 पा. 307
    ऐ. ले. स. भा-6 ले. 1881 पा. 2658 ले 1907 पा. 2693
88. ऐ.ले.स. भा-6 ले. 1881 पा. 2658
89. ठाकुर वा.वा. हो. इ.. भा-1 पा. 307
90. म.शि.का. ले. 21 पा. 20 ले. 22 पा. 21
    पे.द. खंड 36 ले. 314 पा. 272
    ऐ. ले. स. भा-6 ले. 1924 पा. 2710
91. पे.द. खंड 40 ले. 27 पा. 22
    ऐ.ले.सं. भा-6 पा. 2620

## 12) तुकोजीरावाकडून नरसो गोविंदाचे पारिपत्य - जुलै 1777

पुणे दरबार चारीकडून अडचणीत आलेला पाहुन पुंड लोकांनी बंडाळया करण्यास प्रारंभ केला. सोलापुर प्रातांत नरसो गोविंद हा बंडखोर उभा राहिला. त्याने पटवर्धनांचे करकंभ हे ठाणे 25 मे 1777 रोजी घेतले. [92] त्याला शिक्षा करुन ठाणे परत हस्तगत करण्याचेकाम तुकोजीराव होळकरांवर आले. [93] दि. 23 जुलै 1777 रोजी तुकोजीरावांनी वेढा घालुन करकंभ हे ठाणे हस्तगत केले. घोडी, ऊंटे, लुटली आणि तो पळुन जात असता पाठलाग करुन त्याला कैद केले. [94]

## 13) तुकोजी होळकर यांना आलमपूरजवळ भांडेर व दमुवाची सनद -

दि. 22 मार्च 1777 रोजीच्या पत्रानेप्रमाणे ' तुकोजी होळकर याजकडे फौजेचे बेगमास पेस्तर साल सनसमान सबैनापासुन पाच लाख रुपयांचा सरंजाम पेशजी पा । रावेर पैकी अमल मशारनिलेकडे सरंजाम दिला आहे. त्या सुद्या कमाल बेरजेचा दयावयाचा करार जाहाला त्यापैकी महाल सरंजामास लावून दिल्हे त्याच्या सनदा ' [95]

दि. 27 मार्च 1777 च्या पत्राप्रमाणे ' तुकोजी होळकर यास पेस्तर साल सन समान सबैनापासून पाच लक्ष रुपयांचा सरंजाम दयावयाचा करार केला. त्यापैकी रुपये 30648 रुपयांचा गाव तालुके झांशीपैकी कमाल आकाराचे अलमपूरानजीक पा । दमूवा व 5।। भांडेर पैकी नेमून घ्यावयाचा करार करुन हे सनद तुम्हास सादर केली असे. तरी तीस हजार साहाशे अठेचालीस रुपये याचे कमाल आकाराचे गाव सदरहु महाल पैकी नेमून देणे म्हणोन रघुनाथ हरी नेवाळकर कमावीस घर तालुके झांसी यास तसे कळविले. '[96]

---

92. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-। पा. 307
93. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-। पा. 307
94. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-। पा. 307
95. अप्रकाशित पे.द. हिंदुस्थान क.नं. 204 (22 मार्च 1777)
96. अप्रकाशित पे.द. हिंदुस्थान क.नं.204 (27 मार्च 1777)

## 14) तुकोजी होळकर आणि मोरोबाचे कारस्थान - 1778

पुरंदरच्या तहाने मुंबईकर फिके पडले असले तरीही त्यांनी आपला हट्ट सोडला नाही. तहाच्या अटी विरुध्द रघुनाथरावाला आपल्या जवळच ठेवुन घेतले. त्याचवेळी फ्रेंचाचा वकील सेण्ट ल्युबिन हा पुणे दरबारी आल्यामुळे दोन्ही पक्षात साशंकवृत्ती निर्माण झाली.[97] आणि यातच मोरोबांच्या कारस्थानाची भर पडली. नाना फडणीसांना कारभारातुन दुर करुन रघुनाथरावांना पेशवा म्हणुन पुण्यात परत आणण्याकरिता मोरोबा फडणीसांनी कारस्थान उभारले. मोरोबाला सर्वतोपरी मदत करण्यास मुंबईकर इंग्रजाप्रमाणे पुण्याचा इंग्रज वकील मॉस्टीनही उत्सुक होता. [98] हया कारस्थानात मारोबांना पाठिंबा देण्याकरिता चिंतो विठ्ठल सदाशिव रामचंद्र, मानाजी फाकडे तयारच होते. मोरोबांनी नारो गणेशामार्फत तुकोजीरावास आपल्याकडे ओढण्याचे प्रयत्न चालविले. [99] तीन महिने पुण्याचा कारभार मारोबांच्या ताब्यात होता. नाना फडणीस आणि बाल पेशव माधवराव पुरंदरवर जवळ जवळ कैदेतच होते. नाना फडणीसांनी हरिपंत फडके व महादजी शिंदेना त्वरीत पुण्यात येण्याची विनंती केली. [100]

मोरोबांना लष्करी पाठिंबा होता तो केवळ तुकोजीरावांचाच; तुकोजीरावांचा मुख्य आधारच नाहीसा झाला. मोरोबांचा व्युह लगेचच कोलमडून पडेल हे महादजी शिंदेनी हेरले. त्यांनी तुकोजीरावांना भेटून त्यांना म्हटले. ' होळकर आणि शिंदे घराण्यानी केलेल्या आजवरच्या कामगिरीवर विशेष भर दिला. ब्रिटीश मोरोबा द्वारा पुण्यात आले तर स्वतः सर्व सत्ता बळकावातील. हयावेळीही होळकर शिंद्याच्या निष्ठेवरच मराठी राज्याची सुरक्षितता अवलंबून असल्याचे तुकोजींना महादजींनी पटवून दिले आणि त्यांना आपल्या बाजूला वळविण्यात यशस्वी झाले. [101] तुकोजीरावांचा आधार तुटल्याने आणि नाना पुण्यावर चालुन येत

---

97. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 308
98. ऐ.ले.सं. भा-6 ले. 2980 पा. 2820
    ऐ.ले.सं. भा-7 ले. 2324 पा. 3009
    सी.पी.सी. भा-5 न. 905
99. ठाकुर वा. वा. हो.इ.भा-1 पा.308
100. ऐ.ले.सं. भा-7 ले. 2318-2319 पा. 3234-3236
101. ऐ. ले. सं. भा-7 ले. 2399 पा. 3325

असल्याचे दिसताच मोरोबांनी पुण्यातुन पळ काढला. 12 जुलै 1778 रोजी नारो गणेश, बजाबा पुरंदरे आणि सहका-यांसह पकडल्या जावून त्यांना अहमदनगरच्या किल्ल्यात कैदत ठेवले.[102] पुन्हा एकदा पेशवे होण्याचा रघुनाथरावांचा डाव फसला.[103] रघुनाथरावांचे लोढणे हाती धरुन पुण्यावर वर्चस्व स्थापण्याचा इंग्रजांचा डाव तुकोजी होळकर आणि महादजी शिंदि मुळे फसुन हया सरदारांमुळे नानांचे वर्चस्व पुणे दरबारात कायम राहिले. पूर्ण सत्ता त्यांच्या हातात आली. [104]

**15) वडगावचा तह - दि. 17 जानेवारी 1779**
**तुकोजीची कामगिरी -**

मोरोबांचे कारस्थान फसल्यामुळे पुण्याची सत्तासुत्रे काबीज करण्याचा रघुनाथरावांचा डाव फसल्यामुळे इंग्रजांच्या उद्दीष्टांना धक्का लागुन त्यांनी पुणेकराविरुध्द आक्रमक पवित्रा घेतला. [अ 104] फ्रेंच वकील सेंट ल्युबीनचा पुणे दरबारात मानमरातब झाला खरा पण इंग्रजास दहशत बसावी हा हेतु बाजूला राहुन परिणाम असा झाला की मुंबईकर आणि कलकत्तेकर इंग्रज एक होऊन पुणे मोहिमेचे ग.ज.वॉरन हेस्टींगजने मुंबईचा ग.हार्नबी याला पूर्ण स्वातंत्र्य [105] देऊन मद्रासच्या अधिका-यांना मदतीचे आदेश दिले. इंग्रजाचा राग कमी करण्यास नाना फडणीसांनी फ्रेंच वकील ल्यु सेंट ल्युबीनला दि. 17 मे. 1778 रोजी रजा दिल्याने त्याने दि. 1 जुलै 1778 रोजी पुणे सोडले.[106]

---

102. खरे वा.वा. ना. फ.च. पा. 86
103. ऐ.ले.सं.भा.6 पा. 3193 - 3195
सी.पी.सी. भा-5 नं. 920-984
देवधर वाय्.एन. ' नाना फडणवीस ' पा. 39
104. सी.पी.सी. भा-5 नं. 1510
अ-104 ऐ.ले.सं. भा-6 पा.3193, 3195, 3196
105. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 308
106. सी.पी.सी. भा-5 नं. 1166
म.रि. उ वि 1 पा. 148

कर्नल ईगटनच्या नेतृत्वाखाली नोव्हेंबर 1778 मधे रघुनाथरावांना सोबत घेऊन इंग्रज फौज पुण्याच्या दिशेने निघाली. मराठयांनी गनिमी काव्याने इंग्रजांवर अकस्मात हल्ले करुन त्यांची रसद तोडून त्यांना हैराण केले. हया सर्व लष्करी कारवाईची जबाबदारी प्रामुख्याने तुकोजीराव होळकर, भीमराव पानसे, हरिपंत फडके आणि महादजी शिंदेवर होती.[107] घाट माथ्यावर युध्द सुरु होते. खंडाळयास कर्नल के बाण लागुन जखमी झाला तर काल्याच्या मुक्कामी तोफेचा गोळा लागून कॅप्टन स्टुअर्ट 4 जानेवारी 1779 रोजी मारला गेला.[108] कर्नल इगर्टन आजारी पडल्याने परत गेला. इंग्रज लष्कर 9 जानेवारी 1779 रोजी तळेगावला पोहचले.[109] पुण्याला सहज पोहचण्याचा इंग्रजांचा अंदाज साफ चुकून त्यांना हे आक्रमण अती महागात पडले. मराठयांनी सारा प्रदेश जाळल्याने इंग्रजांना दाणा, वैरण आणि पाणीही मिळणे दुरापास्त झाले. शेवटी नाईलाजाने इंग्रजांनी मुंबईच्या दिशेने माघारीस सुरवात करताच मराठयांनी अकस्मात घेरल्यामुळे त्यांना वडगावात शिरावे लागले.[110] जोराची लढाई होऊन मराठयांच्या सर्व अटी कबुल करुनच इंग्रजांना सुटका करुन घ्यावी लागली.

बोरघाटची ही लढाई जोरदार झाली. ही लढाई तुकोजीराव होळकरांनी जिंकली. या लढाईत तुकोजीराव सर्व मुलांसह व पुतणे बापु होळकरांसह हजर होते. त्यांनी चांगली मर्दूमकी केली. ' इंग्रज घाट चढुन आल्यावर बरेच दिवस लढाई चालली. यामुळे श्रीमंताचे पत्र सुभेदारास आले की, आपण जातीने 80,000 फौजेसह असता शत्रुचे पारिपत्य होत नाही. तेव्हा आम्ही स्वत: यावे काय ? आपले उत्तर आले म्हणजे तशी तयारी करता येईल.[111]

---

107. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 308
108. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 308
     जि.च. ले. 5 पा. 345, पा.85
109. एन.एच.एम. भा-3 पा.79
110. ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 309
111. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 309
     भागवत हो. कै. - 6 पा. 11

हयामुळे सुभेदारांना धक्का बसुन आपल्या सोबत मरणास तयार असणा-या 1800 लोकांसह हल्ला केला. अखेरीस 1800 पैकी 600 राहिले. त्यांनी तलवार गाजवून इंग्रजांची संपूर्ण पलटण बुडवून चार तोफा हस्तगत करुन 250 लोक परत आले. चोवीस पालखीनवीस व तेरा हत्तीनवीस कामास आले. सर्वाच्या घरी सुभेदार जातीने जाऊन त्यांचे सांत्वन केले. आणि श्रीमंतास पत्र लिहिले की आज्ञेप्रमाणे पलटण कापुन काढली.[112]

इतक्यात इंग्रजांचा निरोप तुकोजीरावांना आला की तुमची मैत्री आम्हाला तोडायची नाही. रघुनाथराव तुमचे, तुम्ही आटोपून बंदोबस्त करावा. आपली मैत्री कायम राहावी. हा सांगावा तुकोजीनी नाना फडणीसांना कळविला. नांनानी सर्व जबाबदारी तुकोजीरावावरच सोपविली. त्याप्रमाणे त्यांनी रघुनाथरावांना स्वाधीन करुन त्यांचे 6 लक्षाचे जवाहिर परत करावे असा निरोप इंग्रजांना देऊन तुकोजीराव पुण्यात आले.[113]

## 16) तुकोजीचे पुण्यात स्वागत -

तुकोजीराव पुण्यात आले असता स्वत: श्रीमंत पेशवे जातीने तीन कोस सामोरे आले. भेटीच्या वेळी दोन्हीकडचा तोफखाना बंद झाला. नाना फडणीसांनी शिरे दरबार भरवून चार घटका तुकोजीरावांचे स्तुतीस्त्रो केले. सुभेदारांनी (तुकोजींना) एकच उत्तर केले की, ' चाकरी चाकरांनी केली त्याचा इतका बडिवार कशास पाहिजे ' इतके बोलुन विडे घेऊन मुक्कामास आले.[114]

---

112. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 309
भागवत अ.ना. हो.कै. 6 पा.12
(अप्रसिध्द भागापैकी)

113. भागवत अ.ना. हो. कै. खंड - 6 अप्रकाशित भागापैकी पा. 12-13

114. भागवत अ.ना. हो कै. खंड 6 अप्रकाशित भागापैकी पा. 13
ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 310

इंग्रजाबरोबर बिनशर्त वाटाघाटी शिवाय दुसरा पर्याय नव्हता. रघुनाथरावांना स्वाधीन केल्याशिवाय वाटाघाटी होणार नसल्याचे मराठयांनी स्पष्ट कळविले.[115] शेवटी 17 जानेवारी 1779 रोजी मराठे-इंग्रजात वडगावचा तह झाला.

1) रघुनाथरावांना मराठयांच्या स्वाधीन करावे.
2) साष्टी, ठाणे आणि गुजराथमधील घेतलेला मराठयांचा सर्व प्रदेश परत करावा.
3) बंगालमधुन मुंबईकरांच्या मदतीस येत असलेली इंग्रज फौज परत जावी.
4) तहाची अंमलबजावणी होईपर्यंत दोन ब्रिटिश अधिकारी स्टवर्ट आणि फार्मर ओलीस म्हणुन राहावेत.[116]

बोरघाटचे युध्द, वडगांवचा तह आणि या युध्दात मराठयांना मिळालेले यश हयामध्ये तुकोजी होळकरांचा फार मोठा वाटा आहे हे मात्र आपणांस विसरता येणार नाही. हया यशावरुन तुकोजी पराक्रमात कमी होता हे कुणीही म्हणु शकणार नाही. तुकोजींच्या हया पराक्रमावर खुश होऊन श्रीमंत पेशव्यांनी त्यांना खालील देणगी आदर सत्कार करुन दिली.[117]

**17) तुकोजी होळकरास रावेर व कोच प्राप्ती -**

1 प्रगणे रावेत प्रांत खानदेश येथील आकार रु.194016 पैकी पेशजी मशार जिल्हे कडेस 97000 आहेत व सरकारात अम्मल होता तोही दिला. आकार रु.97016

1 परगणे कोंच जमेचा आकार रु.275336

एकूण आकार रु.4,69,352 चे

महाल तुकोजी होळकर यांचे दुमाला करुन देण्याबद्यल नारो कृष्ण सुभा पांत यांचे नावि पत्र सनद तुकोजीरावांचे नावि.

---

115) केलकर कां.श.18 वीरशती फेहिंदी पत्र'
ले.131, पा.270.
116) ऐ.ले.सं.भा.7 पा.3392-3393
कानेटकर य.गो. 'सखाराम बापूंचे चरीत्र' पा.207-208.
117) वाडकृत सवाई माधवरावांची रोजनिशी
ठाकुर बा.वा.हो.इ.भा.2 पा.310.

हया पराक्रमाने तुकोजीरावांची दौलत तर वाढलीच पण त्याहीपेक्षा मोठा लाभ झाला तो हा की या वेळेपासून नाना फडणिसांच्या मनातील होळकरांविषयीचा संशय दुर होऊन पूर्ण मिलाफ झाला.[118] पुढे नानांनी होळकरांचीच बाजु शिंद्यांच्या तुलनेत उचलुन धरली.

हरीपंत होळकरांच्या डे-यात त्यांना भेटायला गेले असता ' होळकर हिशोबाचा फडशा लौकर करण्याबाबत बोलले. विष्णुपंत आले म्हणजे दोघेही येतील. आपण पत्र लिहून त्यांना बोलावून घ्यावे, असे हरीपंतानी नाना फडणीसांस कळविले कारण दोन महिने झाले तरी सल्लामसलत पुसली नाही. बापू अगर नाना डे-यास आले नाहीत. त्यामुळे तुकोजीराव जरा नाराज झाले. पत्र पाठवून त्यांचे समाधान केले.[119]

## 18) रघुनाथरावांचे पुन्हा इंग्रजाकडे पलायन आणि युध्दाचा भडका - 1780

वडगांवच्या तहात ठरल्याप्रमाणे रघुनाथराव पुणे दरबारच्या स्वाधीन झाले. हयावळी रघुनाथरावांनी सर्वासमक्ष सांगितले की, ' इंग्रजाचे घरात राज्य जाईल याअर्थी त्यानपासोन निघोन तुकोजी होळकर आणि शिंदे याजकडे आलो. आपण निश्चय केला की यापुढे राज्याचा लोभ धरणार नाही. स्नानसंध्या करण्यातच वेळ घालवु. खाजगी खर्चास दिलेला 12 लक्षांचा मुलूक घेवून झाशीस राहु ' अशा आशयाची पत्रे त्यांनी तुकोजीराव, महादजी शिंदे व नाना फडणिसास पाठविली.[120] निजाम, हैदरअली, मुधोजी भोसलेंनाही पत्रे पाठविली आणि मुहूर्त बघुन झाशीकडे कुच केले. श्रीमंत पेशवे माधवरावांनी तुकोजीराव व शिंद्यासह इतर सरदारांनाही रवानगी वस्त्रे दिली.[121]

एवढे सर्व होऊनही स्वस्थ राहणे रघुनाथरावांच्या स्वभावातच नव्हते. रघुनाथरावांना झाशीपर्यंत सोबत तुकोजीराव कडील जिवनराव पात्रनीस व शिंद्याकडील हरी

---

118) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.1 पा.118.

119) अप्रकाशित - होळकरांच्या हिशोबासबंधी पे.द.5 प.क्र.89 (फे.1778)

120) अप्रकाशित पे.द.क्र.नं.5 प.क्र.97 (21-1-1779 चे)

121) अप्रकाशित पे.द.क्र.नं.5 प.क्र.97.

बाबाजी हे सरदार होते. [122] नर्मदा ओलांडत असता हरीबाबाजीला जखमी करुन रघुनाथरावाने गुजराथकडे पळ काढला. [123] गोडार्डने त्यांचे स्वागत सुरत येथे करुन पेशव्याविरुध्द युध्दाची तयारी केली.

तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे 15000 घोडदळासह गोडार्डचा सामना करण्यास बडोद्याच्या दिशेने निघाले.[124] फार्मर वस्टवर्ट हयांना इंग्रजांचे शत्रुत्व काही प्रमाणात का होईना पण बोथट करण्याच्या उद्देशाने मुक्त केले. [125] गुजराथेत मराठे व गोडार्ड मधे चकमकी होऊन 11 डिसेंबर 1780 रोजी गोडार्डने वसई जिंकली.[126] अशा बिकटप्रसंगी नाना फडणीसांनी इंग्रजाविरुध्द पुणेकर मराठे, निजामअली, हैदरअली आणि मुधोजी भोसले हयाचा चर्तु:संघ निर्माण केला.[127]

उत्तरेस इंग्रज लष्करी मोहिम काढणार अशी बातमी कळताच जून 1780 मधे तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे माळव्यात येऊन पोहचले. इ.स.1781 च्या प्रारंभीच पुण्याच्या दिशेने मोठया फौजेसह कुच करीत जनरल गोडार्ड बोरघाटच्या पायथ्यापर्यत चालुन आला. त्याला तोंड देण्यास नाना फडणीसांनी बोलावल्या वरुन तुकोजी खानदेशातून आले. दि.29 जानेवारी 1781 रोजी श्रीमंताची व तुकोजींची भेट झाली. श्रीमंतानी वस्त्रे देऊन त्यांना निरोप दिला. [128]

---

122. ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 311
123. पे.द.खंड 36 ले. 108 पा. 95
ऐ.ले.सं. भा.-7 ले 2503 पा. 3480
124. म.शि.का. ले.90 पा. 82
बर्वे एम.व्ही. पा. 70
125. म.शि.का. ले.90 पा. 90 ले.100 पा. 100
पारसनिस द.ब. ' हिस्टारिकल पेपर्स रिलेटेट टू ग्वाल्हेर स्टेट ' भा-1 ले.15
गोडार्डचे पत्र ता. 10/3/1780 चे केळकर न.चि. पा. 81
126. ऐ.ले.सं. भा-7 पा.3533 ठाकुर वा.वा. हो.इ
सी.पी.सी. भा-4 नं. 1638 भा-2 पा. 311
127. म.शि.का. ले. 110 पा. 119
सी.पी.सी. भा-4 नं. 1857
डॉडवेल भा-5 पा. 269
128. ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 312

### 19) तुकोजी होळकरांचा पराक्रम -

खंडाळयाला इंग्रजांचा तळ होता तर त्यांच्या तोंडावर कार्ले येथे तुकोजीराव आणि हरिपंत तळ देऊन राहिले. त्यांनी चढाई करुन इंग्रजांचा पराभव करुन रसद तोडून टाकली. पनवेल दरम्यानच्या लढाईचा वृतांत परशुरामचंद्र पटवर्धन नाना फडणीसांना कळवितात. ' ' आपल्या सांगण्याप्रमाणे इंग्रज दगाबाज असल्यामुळे आम्ही सावध आहोत. आज प्रातः इंग्रज पनवेल वरुन निघाल्याचे कळताच तुकोजी होळकर व आम्ही तयार होऊन पुढे गेलो. इंग्रजांची वस्ती मोहली त्यांची घोडे व दहा विस माणुस वाया जाहले. श्रीमंताचे पुण्ये करुन कोणत्याही गोष्टीची फिकीर नाही.[129] ता. 30 एप्रिलच्या लढाईत तुकोजीराव, पटवर्धन, फटकेंनी इंग्रजावर मागुन पुढुन हल्ला करुन त्यांना कोंडीत पकडल्याने गोडार्डचा पूर्ण पराभव केला. लढत लढतच इंग्रज सैन्य पनवेलवरुन मुंबईस माघारी गेले.[130] मुंबईस पोहचताच गोडार्डने नाना फडणीसांकडे तहाचे संधान लावले. उत्तर हिंदुस्थानतही महादजी शिंद्यानी कर्नल म्युरचा पराभव केला.[131] तिकडूनही शरणागतीची चिठ्ठी आली. मराठयांशी कसा तरी तह घडवून आणावा आणि आपली प्रतिष्ठा राखावी हयाकरीता इंग्रजांनी तहाची धडपड सुरु केली.[132] शेवटी दि. 17 मे 1782 रोजी पुणे दरबार व इंग्रज हयांच्या मधे महादजी शिंद्याच्या मध्यस्थिने सालबाईचा तह घडून आला.[133]

सालबाईच्या तहानंतर रघुनाथराव मराठयांच्या स्वाधीन झाले. रघुनाथरावांना आणावयास तुकोजी होळकर गेले होते. त्यांची व रघुनाथरावांची बोलणी झाली. रघुनाथराव गोदातीरी कोपरगावी दरमहा 25,000 रुपये घेऊन राहिले. तिथेच ता. 11 डिसेंबर 1783 साली त्यांचा मृत्यु झाला.[134]

---

129. अप्रकाशित मेणवली दप्तर डे.कॉ. क्रं.न. 20 फा. 1 प.क्र.94
130. ठाकुर वा.वा. हो.इ.भा-1 पा. 312
131. ऐ.ले.सं. भा-7 ले. 2636 पा. 3632
132. अप्रकाशित सिक्रेट अँड पोलिटिकल डिपार्टमेंट डायरी नं.25 पत्र क्रं.30 पा.240 मुंबई.
133. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 313
अप्रकाशित सिक्रेट अँड पोलिटिकल डिपार्टमेंट डायरी नं.26
पत्र क्रं. 43 पा. 445 (मुंबई)
134. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 314

याप्रमाणे सन 1774 मधे उभारलेले बारभाईचे कारस्थान आणि त्यातुनच रघुनाथरावांच्या पेशवेपद मिळविण्याच्या आसुरी महत्वाकांक्षेपायी उद्भवलेले आणि सतत आठ वर्षे पर्यंत चाललेले पहिले मराठा इंग्रज युध्द मराठयांच्या विजयाने आणि सालबाईच्या तहाने संपले.

20) तुकोजीची टिपू विरुध्द मोहीम -

पेशव्यांच्या घरातील दूही, रघुनाथरावांची पेशवा होण्याची आसुरी महत्वाकांक्षा, त्यामुळे झालेली नारायण रावांची हत्या, बारभाई कारस्थान आणि नंतरचे इ.स. 1774 ते 1783 पर्यंत प्रदीर्घ चाललेले मराठा इंग्रज युध्द हयामुळे हया नऊ वर्षात मराठे एवढे गुरफटले होते की त्यांना इतरत्र बघायला उसंतच मिळाली नाही. हयाचा फायदा त्यांच्या वै-यांनी अर्थातच घेतला. डोक्याशी निझाम तर पायाशी हैदर मराठा राज्याचे लचके तोडीत होते.[135] मराठा सरदारांना हे दिसत असुनही यांच्याकडे लक्ष देणे शक्य नव्हते. होळकर, शिंदे, फडके, पटवर्धन हे सर्व एकत्र होऊन घरच्या आणि दारच्या शत्रुला तोंड देत होते.[136] हे सर्व परिश्रम यशस्वि होऊन हयाचे फळ सालबाईच्या तहाने मिळाले. रघुनाथराव लवकरच मृत्यु पावले. इंग्रज ही स्वस्थ बसल्याने मराठयांना याउपर हैदर आणि निजामाकडे मिळण्यास अवधी मिळाला.

1781 मध्ये हैदरचा मृत्यु होऊन त्याचा पुत्र टिपू सुलतान हा सत्ताधीश झाला होता. गादीवरबसल्यावर सर्वप्रथम त्यांची गाठ इंग्रजासोबत पडली. त्याने बिदनूरास इंग्रज फौज कैद करुन त्यांना आपले म्हणणे मान्य करायला लावल्यामुळे टिपुस आपल्या सामर्थ्याची घमेंड चढली.[137]

---

135. ठाकुर वा.वा. हो. इ. भा-1 पा. 315
136. ठाकुर वा.वा. हो. इ. भा-1 पा. 315
137. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 315

इ.स. 1780 च्या तहाने नरगुंद व फित्तुर वर मराठयांचे सार्वभौमत्व स्थापन झाले. परंतु संस्थानाकडील खंडणीमात्र हैदरने घ्यावयाची होती. [138] परंतु टिपुलाही संस्थाने आपल्या राज्यात समाविष्ट करावयाची होती. शिवाय टिपूच्या मराठयांवर रोष होता. कारण चतु:संघाचा एक सदस्य हैदर असुनही त्याला न विचारता मराठयांनी सालबाईचा तह केला होता. हयावेळी जर हैदर इंग्रजाची शक्ति कर्नाटकात न ओढता तर कदाचित मराठे सालबाईचा तह आपल्या मनासारखा करु शकले नसते. [138 अ] नाना फडणीसांनी टिपूचा कावा ओळखूनच तुकोजी होळकरांसह यादगीर येथे ता. 21 मे 1784 रोजी निजामाची भेट घेतली पण टिपूवर स्वारी करण्याची मसलत सिध्द न झाल्याने एकटयानेच टिपूवर स्वारी करण्याचे ठरविले. [139]

टिपूने मराठयांच्या नरगुंद वर अचानक आक्रमण करुन तिथला मराठा सरदार व्यंकटराव यावे व त्याचा दिवाण काळे सह अनेक सैनिक व मराठा स्त्रियांना बंदी करुन त्यांच्यावर अनन्वित अत्याचार केलेत. 29 जुलै 1785 रोजी त्यांना श्रीरंगपट्टणला नेत असतांना वाटेतच काळेच्या आईचे धक्कयाने निधन झाले. [140]

त्यानंतर टिपूने आपला मोर्चा किट्टूराकडे वळविला. सप्टेंबर 1785 मधे त्याने किट्टूवर अधिकार करुन तिथल्या मराठा सरदार व स्त्रियांचे अतोनात हाल केले. [141] याच वेळी जिवानी गोपाळ पटवर्धन हयांनी नाना फडणीसांना पत्र पाठवून टिपूने मराठयांवर केलेले अत्याचार कळविले. [142] ते लिहितात, ' टिपूने ब्राम्हण भ्रष्ट केले. मराठा स्त्रिया

---

138. ठाकुर वा.वा. हो. इ. भा-1 पा. 315
138अ सरदेसाई म.न.3 पा. 160,163
139 ठाकुर वा. वा. हो. इ भा-1 पा. 315
140. सरदेसाई म.न.3 पा. 164
ठाकुर वा.वा. हो. इ. भा-2 पा. 315
141. सरदेसाई म.न.ई. पा. 164
142. अप्रकाशित मेणवली दप्तर डे.कॉ. क्रं.नं.20 फा.नं. 3 प.क्रं.1
हया पत्रावर तारिख व साल नाही मात्र हे पत्र जिवाजी गोपाळ पटवर्धनांनी नाना फडणीसांना लिहुन टिपूचे अत्याचार कळवून लगेच मदत करणाच्या विनंतीकरिता लिहिलेले आहे.

नासविल्या. त्याचे वर्तन, अत्याचार अमर्याद आहे. आपण ताबडतोब त्याच्या विरुध्द मातब्बर मराठा सरदार तुकोजी होळकर, भोसले, गायकवाड, फडके इत्यादींना फौजेसह पाठवावे. जमल्यास इंग्रजांचे ही साहाय्य घ्यावे. कारण टिपूचे पारिपत्य होणे अत्यावश्यक आहे. टिपूचे अत्याचार लिहिण्यासांगण्या पलीकडचे आहेत. तरी कृपा करुन टिपूवर आक्रमण करुन त्याचे पारिपत्य होणे अत्यावश्यक आहे.' [143]

टिपूचे अत्याचार आणि त्याने नरगुंद घेतल्याचे कळताच तुकोजीराव होळकर व हरिपंत फडके बारामती वरुन पंढरपूर मार्गे निघाले. नाना फडणीस, मुधोजी भोसले पेशव्यांची हुजरात घेऊन निघाले पटवर्धन, रास्ते व अक्कल कोटकारही येऊन मिळालेत. [144] होळकरांची फौज 12,000 सरकारची फौज 40,000 भोसल्यांची 10,000 एकुण 62,000 तर टिपुकडील जमाव 50,000 गाडद, 60,000 बार, 200 तोफा 30,000 फौज याप्रमाणे सरंजाम आहे. [145]

फित्तुराकडे 25000 पायदळ व तोफांनिशी टिपूचा सरदार सैय्यद बुराण होता. त्याच्या पारिपत्यास तुकोजींना फित्तुराकडे पाठविले. मदतीला बेहेरे ही होते. इ.स. 1786 मधे तुकोजींनी फित्तुराखेरीज सर्व ठाणी हस्तगत केली. सैय्यद बुराण डोंगरझाडीच्या आश्रयास गेले. [146]

टिपूकडून बदामीचा किल्ला हस्तगत केल्यानंतर श्रीमंत माधवराव व नाना फडणीस पुण्यात परत गेले. कर्नाटकात छावणीस तुकोजी व हरीपंत असून टिपूच्या मसलतीची सर्व जबाबदारी त्यांच्या वरच आहे. [147] गजेंद्रगड हस्तगत झाल्यानंतर हरिपंत पुढे गेले.

---

143. अप्रकाशित मेणवली द.डे.कॉ. भ.नं.20, फा.3 प.क्रं.1

144. म.शि.का. ले.431 पा.613
म.द.बा. भा-1+2 एकत्र ले.126 पा.102
भावे मराठी क्रं.नं.2 पा.115

145. म.शि.का. ले. 445 पा. 623

146. म.द.बा. भा. 1+2 एकत्र ले.128 पा. 103 ले. 129 पा. 105
ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 316
म.शि.का. ले. 445 पा. 623

147. म.द.बा. भा.1+2 एकत्र ले. 130 पा. 106
म.शि.का. ले. 461 पा. 640-41
ठाकुर वा.वा. हो.इ.भा. 1 पा. 319

होळकरांची व बु-हानुद्दीनासोबत गाठ पडून जोरदार लढाई झाली. टिपूच्या फौजेसोबत लढतांना बापू होळकरांनी पराक्रमाची शर्थ केल्याने त्यांना माघार घ्यावी लागली.[148] या लढाईच्या वेळी टिपूची फौज स्वार 18,000 व पायदळ 60,000 आणि तोफाही होत्या. दुस-याही दिवशी पाच प्रहर युध्द झाले. लढाई होळकरांनी मारली.[149] हरिपंताना लढाईचे वर्तमान कळताच तेही फौजेसह मदतीला गेले.

नोव्हें. 1786 मधे तुकोजीराव होळकरांकडे तहाचे बोलणे करण्याकरिता टिपूने आपल्या वकिलाला पाठविले आणि निजामाकडेही आपला वकील पाठविला. पण दोन्हीकडे काहीही निष्पन्न झाले नाही.[150]

30 नोव्हेंबरला टिपू सावनूर वरुन निघून इटग्याच्या उत्तरेस दोन कोसावर मुक्कामाला आला. मराठे कलकेरिस होते. त्यांच्यावर टिपुने अचानक छापा घातला पण मराठयांच्या सावधगिरीपुढे त्याचे काही एक न चालुन माघारी वळावे लागले.[151] यावेळी अहिल्याबाईंनी तुकोजीस पत्र पाठवून कळविले की, ' टिपू चलाख आहे. तुम्हाला निरोप पत्र पाठविल तुम्ही सावध असा. फंदफितुरी होण्याचा संभव आहे.' कुणाचे फंदफितूर ऐकु नका आपली बदनामी करणा-यास दूर ठेवावा पेचात पडाल असे वागू नका.'[152]

टिपूवरील मोहिमेत मराठयांना तुकोजी होळकर व हरिपंत फडकेमुळे यश मिळाले. टिपूच्या मसलतीचे ओझे सर्वस्वी तुकोजीवरच होते. आणि त्यात ते यशस्वी ही झाले.[153] शेवटी मराठे आणि टिपू मधे तुकोजी होळकरांच्या मध्यस्थिने मार्च 1787 मधे

---

148. म.द.बा. भा.1+2 एकत्र ले. 137 पा. 112
म.शि.का. ले. 481 पा. 664 ले. 485 पा. 671
149. म.द.बा. भा. 1+2 ले. 137 पा. 112
म.शि.का. ले. 481 पा. 664 ले. 485 पा. 671
150. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 317
151. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 317
152. म. द. बा. भा. 1+2 एकत्र ले. 142 पा. 116
153. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 319

गर्जेंद्रगड इथे मराठे व टिपू मधे तह झाला. तह असा -

1) टिपूने मराठयांना पाचवर्षापासून न दिलेली खंडणी 65 लक्ष रु. आता द्यावी.

2) बादामी, नरगुंड, किट्टूर मराठयांना परत करावे तर अडोनी निजामाला द्यावी.

3) सावनूर मराठा अधिपत्यात नवाबाला परत कराव.

4) टिपूने कैद केलेली सर्व माणसे मुक्त करावी.

श्रीरंगपट्टणच्या कैदेतच कालोपंतांचा मृत्यु झाला. तहाने मराठयांना बदामी, कित्तूर, गर्जेंद्रगड व नवलगुंद आणि 65 लक्ष रु. मिळाले.[154] तह ठरवित असतांना तुकोजींनी टिपूकडून तीन लक्ष घेतल्याची वंदंता पसरली होती.[155]

पण हयात तथ्यांश नाही. या मोहिमेत टिपूकडून तुकोजींना काहीही न मिळाल्याचा स्पष्ट उल्लेख आढळतो.[156]

तसेच तुकोजींवर फितुरीचा आरोप भोसले, मोगलांनी केला. पण त्याचे खरेशास्त्री यांच्या ऐतिहासिक लेख संग्रह भाग आढव्याच्या प्रस्तावेनेत खंडण केले. फितुरीच्या आरोपाला एकही पुरावा उपलब्ध नसल्याचे सांगुन टिपुस तुकोजींनी दिलेले उत्तर तुकोजींचा बाणेदारपणा दाखविणारे आहे. (ज्यासमयी सरकारात वकिलाचे प्रयोजन लागेल त्यासमयी आणविले जातील)[157] टिपू सोबतच्या तहाचे पूर्ण श्रेय तुकोजीरावांनाच आहे. त्यांच्यात मध्यस्थीने मराठे आणि टिपू मधे तह घडला.[158]

---

154. म.द.बा. भा 1+2 एकत्र ले. 144 पा. 117
म.शि.का. ले. 491 पा. 677 ले. 485 पा. 671
155. म.शि.का. ले. 491 पा. 677
156. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 321
157. ठाकुर बा. वा. हो. इ. भा-1 पा. 321
158. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 321

कर्नाटकाच्या स्वारीवर निघतांना तुकोजी होळकरांना पेशव्यांनी निरोप देतांना वस्त्र, आभूषण, जडाव वगैरे 6445-11-0 रु. किंमतीचा देऊन त्यांना मोठया मानमरातबाने निरोप दिला.[159]

अशाप्रकारे इ. स. 1785 मधे टिपू विरुध्द कर्नाटक मोहिमेवर गेलेले तुकोजी होळकर कर्नाटक मोहीम यशस्वी करुन जुन 1787 मधे पुण्यात येऊन पोहचले.[160] कर्नाटकातून तुकोजीराव पुण्यात येऊन पोहचत नाही तोच उत्तर हिंदुस्थानची कामगिरी पुढे उभी राहिली. हयापुढे ते इ.स. 1793 पर्यत उत्तर हिंदुस्थानाच्या कारभारातच गुरफटले गेले.

इ. स. 1787 पर्यत तुकोजीराव होळकरांना टिपू विरुध्दची कामगिरी यशस्वी पार पाडून टिपूला मराठयांसोबत तह करण्यास भाग पाडले. या तहाचे पूर्ण श्रेय तुकोजींनाच द्यावे लागेल. पहिल्या इंग्रज मराठा युध्दानंतर म्हणजे सालबाईच्या तहानंतर उत्तरेकडील राजकारणाची धुरा महादजी शिंदिनी सांभाळली तर दक्षिण तुकोजींनी सांभाळले. हया सरदारद्वयांच्या कर्तृत्वावर पराक्रमावर मराठाशाही तग धरुन होती.

टिपू विरुध्दची मोहिम आटोपून तुकोजीराव दक्षीणेत पोहचले. त्यांना श्वास घेण्यास थोडी उसंत मिळते. न मिळते तोच दक्षीणेत पोहचताच उत्तरेत महादजींच्या मदतिस जाण्याची कामगिरी त्यांची वाट पाहात होती. कारण हयावेळी लालसोटच्या विपत्तीमुळे महादजी संकटात सापडल्यामुळे महादजींच्या विनंतीवरुन नाना फडणीसांनी तुकोजींची नियुक्ती उत्तरेत महादजी शिंदेच्या मदतीस केली. आणि 1794 पर्यत तुकोजीराव उत्तरेतच गुंतुन राहिले.

---

159. ठाकुर वा. वा. हो. इ. भा-2 पा. 318
सवाई माधवराव पेशव्यांची रोजनिशी

160. म.द.बा. भा 1+2 एकत्र ले. 146 पा. 118-119

*****

# प्रकरण - 4 थे

1) तुकोजी होळकर आणि अलीबहादर यांची उत्तरेकडील मोहीम
2) तुकोजींची पहिली उत्तरेकडील मोहीम - 1769-73
3) मराठयांच्या मदतीने बादशहा पुन्हा तख्तावर - 6 जाने. 1772
4) तुकोजी आणि रोहिले फत्तरगड मोहीम
5) तुकोजी व अलीबहादरांची महादजींच्या मदतीस उत्तरेस रवानगी - इ.स. 1788
6) तुकोजीचे आणि अलीबहादराचे वेळ काढू पणाचे धोरण
7) अलीबहादर महादजी भेट - 6 नोव्हें. 1788
8) गुलाम कादरचे पारिपत्य -
9) तुकोजी-महादजींची भेट - 31 जुलै 1789
10) तुकोजी होळकरांची अर्ध्या आधिकाराची मागणी
11) महादजी आणि अलीबहादरात मतभेद
12) तुकोजी होळकरांची शिष्टाई (मध्यस्थी)

## प्रकरण - 4 थे

### तुकोजी होळकर आणि अलीबहादर यांची उत्तरेकडील मोहीम -

तुकोजी होळकरांच्या उत्तरेकडील कामगिरीचे दोन भाग पडतात.

**पहिला भाग -**

तुकोजी होळकरांची उत्तरेकडील मोहीम इ.स. 1769 ते 1773

**दुसरा भाग -**

अलीबहादरासोबत उत्तरेकडील कामगिरी इ. स. 1788 ते 1793

**तुकोजींची पहिली उत्तरेकडील मोहीम - 1769-73**

थोरल्या माधवराव पेशव्यांचे स्वप्न दक्षिणेपुरतेच मर्यादित नव्हते तर उत्तरेतही मराठयांचा प्रभाव पूर्णवत प्रस्थापित करण्याचे होते.[1] आणि म्हणुनच पेशवे माधवरावांनी दक्षिणेची जबाबदारी स्वतः स्वीकारुन उत्तरेच्या कामगिरीवर रामचंद्र गणेश कानडे आणि विसाजी कृष्ण बिनिवाले हयांच्या नेतृत्वात इ.स. 1769 च्या एप्रिल महिन्यात एक मोठी सेना रवाना करुन त्यांचे मदतनिस म्हणुन तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे हयांची रवानगी केली. [2]

---

1) प. द. खंड - 29 ले. 231 पा. 239

2) खरे वा.वा. ऐतिहासिक लेख संग्रह भा.4 पा.1879
पे. द. खंड - 29 ले. 224 पा. 236
ले. 231 पा. 239

पानिपतानंतरच्या संधीचा फायदा घेऊन जाट, रोहिले आणि वजीर सुजाउद्दीला यांनी दिल्लीच्या राजकारणातुन मराठयांचे कायमचे उच्चाटन करुन आपले वर्चस्व स्थापण्याचा उद्योग सुरु केला. हया वेळी दिल्लीचा बादशहा शहाआलम असहाय अवस्थेत अलाहाबादला ब्रिटीश अंमलाखाली होता. उत्तरेत आल्यावर रामचंद्र गणेश कानडे, तुकोजीराव होळकर आणि महादजी शिंदे या तिघांनी कामाची वाटणी केली. कानडे बुंदेल खंडात, होळकर बुंदीकोटयाकडे तर शिंदे उदेपुराकडे खंडणी वसुल करण्यात ही मंडळी गुंतली होती.[3]

जाटाचे पारिपत्य करण्यास इ.स. 1769 च्या अखेरीस सर्व फौजा आपापल्या कामगि-या आटोपुन चंबलवर एकत्र झाल्या. दि. 5 एप्रिल 1770 रोजी गोवर्धन येथे मराठे - जाट संघर्षात जाटांचा भीषण पराभव होऊन त्यांची पूर्ण फौज लुटल्या गेली.[4] तुकोजीराव होळकरांनी नवलसिंगाचे अंमलदार मिस्टर सुमरु आणि फ्रेंच जनरल गार्डेल यांचा पूर्ण पराभव केला.[5] हया नंतर लगेच मराठयांनी आग्रा आणि मथुरा जिंकले.[6]

मराठयांच्या उत्तरेतील आगमनामुळे नजीबखान घाबरला. नजीबखान अहमदखान बंगशाशी संधान साधुन मराठयांचा घात करण्याच्या गुप्त कारवाया करित होता. पण पुर्वानुभवाने मराठे शहाणे झाले होते. दि. 31 ऑक्टोबर 1770 रोजी नजीबखानाचा मृत्यु होऊन त्याचा पुत्र झबेबाखान त्याचा वारस झाला.[7] सबेताबखान मराठयांवर चालुन आला. पण मराठयांनी त्याचा पराभव करुन इटावा जिंकुन दि. 15 डिसेंबर 1770 रोजी फरुखाबादही जिंकले. शेवटी अहमदखान बंगशाला प्राणांची भीक मागावी लागुन त्याने पानिपत युध्दापूर्वीचा संपूर्ण प्रदेश मराठयांना परत केला.[8]

---

3) ठाकुर हो. इ. पा. 300
4) सरकार फॉल भा.इ. पा.9
ठाकुर वा.पा. हो. इ. भा.2 पा. 300
5) ठाकुर वा. पा. हो. इ. भा. 2 पा. 300
6) सी.पी.सी. भा.3 नं. 211
एन.एच.एम. भा-2 पा. 526, 527
7) सी.पी.सी. भा-3 नं. 605
8) सी.पी.सी. भा-3 नं. 505, 517, 530
पे.द.खंड - 29 ले. 22 पा. 18 - 19
ठाकुर वा.वा. हो. इ. भा-2 पा. 301

**मराठयांच्या मदतीने बादशहा पुन्हा तख्तावर - 6 जाने.1772**

इंग्रजांच्या भरवशावर दिल्लीची गादी परत मिळविण्याच्या आशेवर विसंबुन राहण्यात अर्थ नसल्याची जाणीव बादशहा शहाआलमला झाली. वजीर शुजाउद्यौला आणि मिर्झा नजफखाना मार्फत बादशहाने मराठयांशी बोलणे केले. 10 फेब्रुवारी 1771 रोजी झबेताखानाकडून मराठयांनी दिल्ली काबीज केली.[9] आणि 6 जानेवारी 1772 रोजी बादशहा शहाआलम दिल्लीला येऊन पोहचला.[10] महादजी शिंदेच्या पुढाकाराने बादशहाला दिल्लीच्या तख्तावर बसविण्याचे मराठयांचे महान स्वप्न साकार झाले.[11]

**तुकोजी आणि रोहिले फत्तरगड मोहीम -**

मराठयांच्या मदतीने बादशहा शहाआलम दिल्लीच्या तख्तावर बसल्यामुळे मराठयांचे वजन, दरारा, प्रतिष्ठा वाढली असली तरी त्यांचा एक शत्रु अद्याप उरला होता. झबेताखान बादशहाच्या मिरबक्षी गिरीबद्दल होळकर आणि शिंद्यात मतभेद झाल्याने मराठा सरदारात दोन पक्ष दिसु लागले.[12] होळकर व बिनिवाले यांच्या फौजांवर बादशाही पंधरा हजार फौज चालुन गेली. होळकरांनी त्या फौजेचा पराभव केल्याने डिसेंबर 1772 मधे बादशहाला तुकोजी होळकरांशी तह करावा लागला.[13]

---

9) सी.पी.सी. भा-3 नं. 605, 665
पे. द. खंड 29 ले. 265, 270 ले. 266 पा. 271
म.प.इ. पृ. 161

10) पे.द. खंड 29 ले. 89 पा. 84
दत्ता के. प्र. 59

11) पे.द. खंड 29 ले. 266 पा. 271
जि. च. पा. 74
केळकर न.चि. मराठे आणि इंग्रज पा. 117

12) ठाकुर वा. वा. हो. शा. इ. भा-2 पा. 302
भागवत अ. ना. हो. कै. खंड 6 पा. 40

13) ठाकुर वा. वा. हो. शा. इ. भा-2 पा. 302
भागवत अ. ना. हो. कै. खंड 6 पा. 40-41

हयानंतर तीनही सरदार एक जुटीने झबेताखान रोहिल्याच्या राजकारणास लागले. सन 1772 च्या फेब्रुवारीत मराठे झबेताखानावर चालुन गेले. महादजींच्या तोफांपुढे त्याचा टिकाव लागला नाही. आणि मराठयांनी त्याचा रोहील खंडातील सर्व प्रदेश ताब्यात घेतला.[14] झबेताखान मात्र अंधाराचा फायदा घेऊन पळुन गेला. पथ्थूरागड पर्यंत मराठयांनी त्याचा पाठलाग केला. दुस-या दिवशी स्वतः तुकोजीराव होळकर गंगापार उतरुन बक्षीचे डोके कापुन आणुन फौज नेस्तनाबूत केली.[15] यावेळी तुकोजींना महादजी शिंदे, रामचंद्र गणेश कानडेने मदत केली नाही. बक्षी मारल्याचे कळताच झबेताखान साठ हजार फौज व तिनशे तोफा घेऊन तुकोजींच्या मुकाबल्यास आला पण तुकोजींनी त्याचा पूर्ण पराभव केला.[16] ही बातमी कळताच महादजी शिंदे व रामचंद्र गणेश कानडे, तुकोजी होळकरास सामील होऊन तिघांनी मिळुन पथरागडावर हल्ला केला आणि 2 एप्रिल 1772 मधे हे ठाणे मिळविले. येथेच झबेताखानाची कुटुंबीय मंडळी त्यांच्या हाती पडली. पण झबेताखान मात्र उत्तरेच्या जंगलात पळून गेला.[17] तुकोजींची भरतपूर व डिग या परिसरात नवलसिंगाशी लढाई होऊन तुकोजींनी विजय मिळविला. या ठिकाणी तुकोजींना मराठयांची रोहिल्यांनी पानिपतावरुन नेलेली लुट मिळाली. त्यात हत्ती, घोडे, तोफा व अनेक मौल्यवान वस्तू परत मिळाल्या.[18] ही सर्व लूट एकत्र करुन तुकोजींनी सर्वांना सारखी वाटून दिली.[19] यावरुन तुकोजींचे औदार्यच दिसुन येते. या स्वारीस फत्तरगडची स्वारी म्हणतात. यानंतर जाटांपासून खंडणी वसुल करुन तुकोजीराव इंदूरास परतले.

---

14) ठाकुर वा. वा. हो. शा. इ. भा.2 पा. 302
पांडे आर.जी. महादजी शिंदे अँड पुणा दरबार पा. 52

15) भागवत अ. ना. हो. कै. खंड 6 पा. 41

16) भागवत अ. ना. हो. कै. अप्रसिध्द भागापैकी पा. 1

17) भागवत अ.ना. हो. कै. 6 पा.41 व अप्रकाशित
हो. कै. अप्रसिध्द भागापैकी पा. 1.8

18) हो. कै. खंड 6 पा. 42 हो. कै. अप्रकाशित भागापैकी पा. 2,3,4,
ठाकुर वा.वा. हो. शा. इ. भा-2 पा. 304
पे. द. खंड 29 ल. 270 पा. 274

19) ठाकुर वा. वा. हो. शा. इ. भा-2 पा. 304
हो. कै. अप्रकाशित भागापैकी पा. 3,4

हयानंतर मात्र तुकोजीराव दक्षिणेतच पेशव्यांच्या कामगिरीवर सतत पंधरा वर्षे एवढे गुंतुन पडले की उत्तरेच्या राजकारणात डोकावण्यास त्यांना उसंतच मिळाली नाही.

**तुकोजी व अलीबहादरांची महादजींच्या मदतीस उत्तरेस रवानगी - इ.स. 1788**

राजस्थानातील लालसोट जवळ 28 जुलै 1787 रोजी झालेल्या युध्दानंतर महादजी शिंद्यांना माघार घ्यावी लागली. लालसोटचे युध्द म्हणजे मराठयांच्या दृष्टीने दुसरे पानिपतचे युध्दच होते. महादजी शिंद्यांच्या माघारीमुळे मराठयांच्या शत्रुनी दिल्लीतून मराठयांची सत्ता समूळ नष्ट करण्याचे प्रयत्न केले. या प्रयत्नात गुलाम कादरनी दिल्ली येथे जावून बादशहा शहाआलम कडून मिरबक्षी हे पद प्राप्त केले.[20]

इस्माइल बेग याने आग्रा शहराला वेढा दिला. तेव्हा शिंद्यांचा सरदार लखोबा दादा बक्षी याने मोठया धैर्याने इस्माइल बेगचा प्रतिकार केला. शिवाय बादशहाला पगार न मिळाल्याने तो नाराज झाला. बादशहाच्या पाठिंब्याशिवाय मराठा सत्ता टिकणे केवळ अशक्य असल्यामुळे मराठे अजुनही जिवंत असल्याचे शत्रूंना दाखवून देणे जरुरी होते. हयाच मुळे महादजींनी पुण्याला नाना फडणीसांना सविस्तर पत्र पाठवून द्रव्याची आणि सैन्याची त्वरीत मदत पाठविण्याची विनंती केली.[21] हे पत्र ऑगष्ट 1787 च्या शेवटी पुण्याला पोहचले.[22] हया

---

20) पारसनिस कृत ' दिल्ली येथील मराठयांची राजकारणे ' नं. 228 पा. 195, 196 नं. 230 पा. 198-200 पी.आर.सी. 1 नं. 116 पा. 243 नं. 174 पा. 256 डॉ. अंधारे, संशोधन शिंपले पा. 94

21) भ.शि.का. ले. 505 पा. 699 ले. 507 पा. 701 ले. 508 पा. 701 ले. 509 पा. 702 (पी.आर.सी.) पु.रे.कौ. भा-1 ले. 203 पा.284 ले.204 पा.287 शि.रा.भा-1 ले. 126 पा. 56

22) सरदेसाई गो.स. एन.एच.एम. भा-3 पा. 158

पत्रामुळे नाना फडणीसांनी ताबडतोब 5 लक्ष रुपये आणि महादजी शिंदेच्या मदतीकरिता तुकोजी होळकर व अलीबहादराच्या नेतृत्वाखाली सैन्य पाठविण्याचा निर्णय घेतला त्यानुसार दि. 8-9-1787 ला अलीबहादराची रवानगी केली.[23]

**तुकोजींचे आणि अलीबहादराचे वेळ काढुपणाचे धोरण -**

तुकोजी व अलीबहादराला महादजीची वारंवार लवकर पोहचण्याविषयी पत्रे येत होती. तशीच पत्रे पुण्यालाही नाना फडणीसांना आल्याने नाना फडणीसांनी दि. 8-9-1787 रोजीच अलीबहादराची रवानगी महादजींच्या मदतीला केली.[24] दि. 26 डिसेंबर 1787 पर्यंत अलीबहादर भीमातीरीच होते. नानांनी त्यांना टोक्यास गंगातीरापर्यंत जाण्याचे कळविले. तेथेच त्यांना सैन्य व रक्कम पोहचविल्या जाईल असे सांगितले.[25] तुकोजींच्या सैन्यातील पेंढा-यांना घालवुन देण्यास अलीबहादर नाऊरला जाणार होते परंतु त्यापूर्वीच पेंढारी माळव्यात निघून गेल्याने अलीबहादर 14 मार्च 1788 रोजी ब-हाणपूरास येऊन पोहचले.[26] त्यांचा विचार भोपाळ मार्गे हिंदुस्थानात जाण्याचा होता.[27] पण ब-हाणपूर मुक्कामातच त्यांना नाना

---

23) ठाकुर वा.वा. हो.सा.इ. भा-[illegible] पा. 326
डॉ. अंधारे संशोधन शिंपले पा.30
म.शि.का. ले. 509 पा. 702
शि.रा.भा.1 ले. 125 पा. 55, 56

परंतु पाटीलबावाचा आग्रह यामुळे नसलतीस अनुमोदन दिले कारण त्या सरकारात सावकारांचे देण्याचे पेच असता पाच लक्ष रुपये सावकाराची केलेल असे बोलुन तरतूद करुन फौज रवाना करावयाची त्यास आंढीमुळे फौज लवकर जमा होणार नाही. यास्तव श्रावण मासी अलीबहादर यास बाहेर काढिले.
( अप्रकाशित मे.सं.डे.कॉं.स. 82 फा. 3 पत्र 93 पूर्ण )

24) अप्रकाशित भे.स.डे.कॉं.क. 82 फा.3 पत्र क्रं. 93 (पूणे)

25) 'मराठी दप्तर रुमाल ' भा-3 ले. 26 पा. 48

26) पु.रे.कॉं. भा-1 ल. 201 पा. 281
भावेकृत ' मराठी दप्तर रुमाल ' भा.इ.ले. 32 पा. 51

27) पु.रे.कॉं. भा-1 ले.209 पा. 281

फडणीसांचे पत्र मिळाले की ' तुम्ही महेश्वरी जा. तिथे तुम्हाला तुकोजी होळकर सामील होतील. तुम्ही आणि तुकोजी मिळोन जावे.'[28] त्याप्रमाणे अलीबहादर दि. 16 एप्रिल 1788 रोजी महेश्वरास जाऊन पोहचले.[29] दि. 20 एप्रिल 1788 रोजी अलीबहादर अहिल्याबाईना भेटले.[30] तुकोजी होळकर ही वाफगावावरुन फेब्रुवारी 1788 मधे निघून दि.20 एप्रिल 1788 रोजी महेश्वरास येऊन पोहचले.[31] तुकोजी होळकर आणि अलीबहादर एकमेकांना भेटले.[32] मातोश्री अहिल्याबाईंनी त्यांना मेजवानी दिली.[33] तुकोजी होळकर व अलीबहादर माहेश्वराला असतांनाच गुलाम कादरचे पत्र तुकोजींना आले. ' आमचे शिंदेशी भांडण सुरु आहे. आपण व अलीबहादर येणार आहात असे कळले. तुमचा व आमचा भाऊपण पूर्वीपासून आहे ता तसाच पुढेही कायम राहील याची खात्री बाळगावी आणि शिंद्याच्या मदतीला येऊ नये.' [34] ह्या पत्रामुळे तुकोजी होळकर उत्तरेकडे जाण्यास वेळ करु लागले आणि आपल्या सोबतच अलीबहादरलाही थांबवुन ठेवू लागले.[35] तुकोजी होळकर आणि अलीबहादराचा स्वभाव मिळता जुळता होता. अलीबहादरला स्वतःचे निर्णय घेण्याची स्वतंत्र बुध्दीही नव्हती. तुकोजी होळकरांच्या मनात मोरोबा फडणीसांच्या कारस्थानापासुन महादजी शिंद्याविषयी तेढ निर्माण झाली होती.

---

28) भागवत अ.ना. हो.शा.इ. सा.भा.1 पा. 19-20
अप्रकाशित गोरे दप्तर ले. 567 पा.10 दि.16 मार्च 1788 चे अलीबहादरांना नानाचे पत्र (सीता मऊ)

29) भावेकृत मराठी दप्तर स.भा.3 ले. 34 पा. 52

30) भागवत अ.ना. हो.इ.सा. भा.1 ले. 7 पा.23

31) भागवत अ.ना. हो.इ.सा. भा.1 ले. 7 पा. 23

32) भागवत अ.ना. हो.इ.सा. भा.1 ले. 7 पा. 23

33) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.१ पा. 326
भावेकृत मराठी दत्तर कमाल भा.3 ले. 35 पा. 53
भागवत अ.ना. हो. इ. सा. भा-1 ले. 11 पा. 21
डॉ. अंधारे संशोधन शिंपले पा. 30

34) म.द.बा. भा.2 ले. 184 पा. 152-153

35) अलीबहादरांचे नानांना पत्र दि. 30-10-1788 चे
शि.रा.भा.1 ले. 158 पा. 75

महादजींना वकील ए-मुतालिकचे पद व सन्मान मिळाल्यापासून तुकोजी होळकरांच्या मनात द्वेष निर्माण झाला होता. [36] तुकोजी होळकर आणि अलीबहादर या दोघांनाही महादजीचा उत्कर्ष सहन होत नव्हता. लालसोटच्या युध्दानतर आपण स्वत:च उत्तर भारतातील राजकीय व्यवहाराची घडी बसवून मान मिळवावा. अशी इच्छा त्यांना होती. पण दोघातही राजकीय दुरदार्शता, शौर्य, मुत्सद्दीगिरीचा अभाव होता.

तुकोजी होळकरांना व अलीबहादरांना नाना फडणीसांनी लवकर जाण्याविषयी पत्रे पाठविली. तुकोजींनी व तुम्ही (अलीबहादरांनी) दोघांनी मिळून लवकर जाणे झाल्यास फारंच चांगले. पण काही कारणास्तव तुकोजींना चार दिवस अधिक महेश्वरास थांबण्याचे कारण असेल तर मात्र तुम्ही एकटयाने पुढे निघुन जाऊन महादजींना लवकर भेटावे. [37] पण या पत्राचाही काही उपयोग झाला नाही.

तुकोजींचा आणि अलीबहादरांचा महेश्वरास जवळपास दोन महिने मुक्काम होता.

हया अवधीत अहिल्याबाई होळकरांनी तुकोजींना आणि अलीबहादरांना महादजीच्या मदतीस लवकर जाण्याचे सांगितल्याचा उल्लेख तत्कालीन ऐतिहासिक कागदपत्रात मिळत नाही. मराठयातील दुही दिसु नये म्हणुन तुकोजी होळकरांना व अलीबहादरांना लवकर येण्याविषयी महादजी शिंदेनी अनेकदा कळविले. [38] त्याचवेळी तुकोजी रावांच्या नातीचे लग्न असल्यामुळे ते महेश्वर येथे थांबले. [39] महादजींची खरी इच्छा तुकोजी होळकर

---

36) अप्रकाशित फॉरीन सिक्रेट डिपार्टमेंट दि. 24 डिसेंबर 1784 नं. 9 दिल्ली.

37) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले. 36 पा. 55
अप्रकाशित भे.सं. डे. कॉ. क. 82 फा. 3 पत्र क्र.94 पुणे
भावेकृत मराठी दप्तर कमाल भा-3 ले. 38 पा. 55

38) म.शि.का. ले. 530 पा. 738 ले. 540 पा. 754
अप्रकाशित भे.सं.डे.कॉ.क. 82 फा. 3 पत्र क्रं. 108 पूणे

39) ठाकुर वा.वा. हो. इ. भा-१ पा. 329

आल्यावर सर्व कारभार त्यांच्या स्वाधीन करुन आपण छावणीस उज्जैनीस जावे. तुकोजी होळकरांसोबत दहा हजार फौजेसह अंबुजी इंगळेंना तैनातीस ठेवावे अशी होती. परंतु तूकोजी व अलीबहादर दोघांनाही महेश्वर पुढे लवकर जाण्याची इच्छा नव्हती.

### अलीबहादर महादजी भेट - 6 नोव्हे. 1788

तुकोजी होळकरांच्या म्हणण्यानुसार अलीबहादराने दोन महिने व्यर्थ महेश्वरात घालविले. वारंवार पत्रे पाठवूनही त्याची दखल तुकोजी होळकरांनी व अलीबहादर यांनी न घेतल्याने शेवटी महादजी शिंदेनी या दोघास घेऊन येण्याकरिता शेवटी अंबूजी इंगळे यांना महेश्वरास पाठविले.[40]

या दोघांनीही महादजींनी आपली गेलेली पत पुन्हा प्राप्त केल्याचे ऐकले तेव्हा तुकोजी आणि अलीबहादर हिंदुस्थानात घेण्यास निघाले. पण ते सरळ महादजी शिंदे यांच्या मदतीस न जाता तुकोजींच्या म्हणण्याप्रमाणे आधी मेवाडात गेले. उभयता मेवाडातून जयपूरकडे जाणार असे ठरले. या ठिकाणी नाना फडणीसांनी अंतस्थ तुकोजी होळकर आणि अलीबहादरास महादजी शिंद्यांना लवकर मदत न करण्याविषयी बजावले होते. याचे कारण महादजी शिंदेची उत्तर भारतातील वाढती प्रतिष्ठा नाना फडणिसाला सहन होत नव्हती. वास्तविक महादजी शिंदेच्या सल्ल्यानूसार तुकोजी होळकर आणि अलीबहादर वागते तर मराठयांचा दबदबा त्वरीत उत्तर भारतात प्रस्थापित होता. उत्तर हिंदुस्थानची जबाबदारी एकटया महादजी शिंदेचीच आहे असे नाना फडणिसांना वाटत होते. या सर्वांवर नियंत्रण ठेवण्यास नाना फडणिसाने आपले वकील कृष्णाजी जगन्नाथला जोधपूर येथे पाठविले.[41] परिणाम हा झाला की इस्माइल बेग आणि गुलाम कादर यांनी 18 जुलै 1788 रोजी दिल्ली

---

40) भ.शि.का.ले.530, पा.732, ले.540, पा.754.
अप्रकाशित, मे.स.डे.कॉ.क.82, फा.3,पत्र क्र.108 पुण.

41) भ.रि.3 वि.भा.2, पा.154.

42) म.शि.का.ले.533, पा.742.
सोने का.ना.पेशव्यांची बखर पा.132-133.

जिंकली.[42] शहाआलमवर अनन्वित अत्याचार करुन त्याचे डोळे फोडले.[43] हे वृत्त ऐकून महादजीने राणेखानास दिल्लीवर पाठविले. त्याने 2 ऑक्टोबरला दिल्ली जिंकली. पण गुलाम कादर यास संपत्तीसह यमुना नदी ओलांडून घौसगडाकडे निसटला. राजपुत्राण्यात मात्र तुकोजी होळकर आणि अलीबहादरास मतभेद निर्माण झाले. अलीबहादर अंबुली इंगळे सोबत फौजेसह बुंदी, कोथ, जयनगर हयाप्रदेशातून भरतपुरास रणजितसिंग जाटाची भेट घेवून मथुरेला येवून पोहचला. 6 नोव्हेंबर 1788 रोजी मथुरेला महादजी शिंद्याची भेट घेतली.[44] यावेळी महादजी शिंदेनी अलीबहादरास पेशव्यांचा प्रतिनिधी म्हणून मेजवानी देवून हत्ती, पोषाख वगैरे देवून त्याचा सत्कार केला.[45] तुकोजी होळकरासही महादजींनी तातडीने येण्याचे कळविले. पण ते गेले नाही. मल्हारराव होळकरांचा मतलबी स्वभाव तुकोजी होळकरातही पुरेपूर दिसतो. स्वतःच्या अल्प स्वार्थाकरिता राज्याचे नुकसान झाले तरी काहीच वाटत नसे. हयावेळी तुकोजींनी फक्त गोड शाब्दिक सहानुभुती दाखवून मदतीचे आश्वासन दिले हाच स्वभाव अहिल्याबाई होळकरांचाही तत्कालीन कागदपत्राचा सखोल अभ्यास केल्यानंतर दिसून येतो.[46]

**गुलाम कादरचे पारिपत्य -**

अलीबहादरचा प्रभाव उत्तरेतील राजेरजवाडयावर पडावा म्हणुन महादजी शिंदेनी मुद्याम त्यांची रवानगी गुलाम कादरच्या पारिपत्याकरिता केली.[47] 19 डिसेंबरला

---

42) म.शि.का.ले.533 पा.742
सानें का.ना.पेशव्यांची बखर पा.132-133.

43) सरदेसाईकृत म.शि.का.ले.530 पा.537-538.
पारसनिस एच.पी.आर.जी.3 भा.3 ले.74 पा.111.
पु.रे.कॅ.भा.1 ले.277-235 पा.310 ते.324.
भ.द.बा.भा.2 ले.181 पा.149.

44) दि.म.रा.भा.1 ले.347 पा.283.
म.शि.का.ले.539 पा.751 ले.543 पा.759.

45) भावेकृत मराठी दप्तर क्र.3 ले.76 पा.63-64.
भागवत हो.श.सा.भा.1 ले.29 पा.32-33.
पारसनीकृत (महेश्वर दरबारची बातमीपत्रे) भा.2,म.द.बा.भा.2 ले.184 पा.152.
539 पा.751 ते 754.

46) भागवत हो.इ.सा.भा.1 पा. 15( मुख्य स्वारी)

47) अप्रकाशित गोरे दप्तर ले.578 पा.35 (सितमऊ)
म.शि.का.ले.539 पा.751.

अलीबहादराने गुलाम कादरला पकडण्यात यश मिळविले.[48] दि.31 डिसेंबरला 1788 रोजी अलीबहादरांनी गुलाम कादरला मथुरेला महादजी शिंदेच्या छावणीत आणले.[49] 4 मार्च 1789 रोजी सम्राटासमोर गुलाम कादरला ठार मारण्यात आले.[50] गुलाम कादरचे पारिपत्य केल्यामुळे अलीबहादराचे नांव सर्वतोमुखी होऊन त्याची प्रतिष्ठा वाढली.[51] यामुळे शहाआलमने शाही फर्मान काढले आणि गोवध बंदी करुन मथुरा वृंदावन ही पवित्र स्थळे मराठयांना दिलीत.[52] अलमबहादराच्या या कामगिरीमुळे तुकोजी होळकरांनी नजरेस भरण्याजोगी कोणतीच कामगिरी यावेळी केली नाही. तुकोजी होळकर राजकारणात अयोग्य व शरीराने असमर्थ होता. त्यातच कारभाराची सर्व सुत्रे अहिल्याबाईच्या हातात होती. हयामुळे तुकोजी होळकर-अहिल्याबाई आणि नाना फडणिसांकडून बांधल्या गेला, आणि या व्यवस्थेमुळेच तुकोजीचे तेज चमकू शकले नाही.

**तुकोजी-महादजींची भेट - 31 जुलै 1789.**

अलीबहादराने गुलाम कादरला पकडुन मथुरेला महादजी शिंदे यांच्याकडे आणले. त्याचवेळी तुकोजी होळकरांना महादजी शिंदेनी पत्र लिहिले की, तिकडची सर्व कामे तशीच टाकून त्वरीत निघुन यावे. या हरामखोरास मथुरेला आणले आहे. रावराजा माचेडीकर याने जयपुरकराची कासपहाडी घेतली म्हणुन आपण त्वरीत यणे.[53] पेशव्याकडून आणि

---

48) अप्रकाशित सिक्रेट अँड पोलिटिकल डिपार्टमेंट डायरी नं.39,पत्र क्र.4 पा.21-22 मुंबई.
शेजवलकर त्र्यं.श. 'नागपूर अफेअर्स' भा.2 ले.82 पा.41,सी.पी.सी.भा.8 नं.997.

49) ठाकूर वा.वा.हो.इ.पा.331.
राजाध्यक्ष न.व्य.'जिबाबादादा बक्षीचे चरित्र' पा.138.
म.शि.का.ले.551 पा.771.

50) म.द.बा.भा.2 ले.176 पा.144.
म.शि.का.ले.552 पा.775.

51) भावेकृत मराठी दप्तर क्र.3 नं.51 पा.66.
का.स.प.या.ले.441 पा.389-90 क्र.442
पा.390 ले.532 पा.749-50 म.शि.का.ले.530.
पा.738-40 ले.337 पा.746-47.

52) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.51 पा.66.
ले.174 पा.182.
म.शि.का.ले.571 पा.811.
डिस्कलकर साबारा ऐतिहासिक लेख भालाभा । ले 242 पा.120

53) म.द.बा.भा.2 ले.173 पा.141.

डिसेंबर 1788 मध्ये अहिल्याबाई कडुनही तुकोजी होळकरास महादजी शिंदे यांच्याकडे लवकर जाण्याविषयी कळविले होते.[54] हयावेळी तुकोजी होळकर कोटे प्रान्ती होते. नांव घेण्याजोगी कोणतीही प्राप्ती त्यांना यावेळी झालेली नव्हती. पागेकरी त्यांना पैशाकरिता अडवित होते. तुकोजी होळकरांनी अहिल्याबाईकडे पैशाची मागणी केली. पण अहिल्याबाईनी त्यांना प्रथम महालाचा हिशोब दाखवा आणि मगच मागील हिशेब पाहून रक्कम देण्यात येईल असे म्हटले.[55] त्यामुळे तुकोजी होळकरांची आर्थिक वाईट स्थिती झाली. तुकोजींना नेहमीच पैशाची अडचण भासे त्याकरिता त्यांना सतत अहिल्याबाईकडे हात पसरावा लागे आणि त्या विवेचनामुळे त्यांच्याकडून भारी कामगिरी मोकळया मनाने पार पाडल्या जात नसे. दि.21 जुन 1789 रोजी तुकोजीराव होळकर मथुरेपासून 30-40 कोसावर येवून पोहचले. ' लवकर भेट घेवून कामकाज करावे ' असे पत्र अहिल्याबाईनी महादजी शिंदेना लिहावे म्हणून तुकोजीरावांनी विनंती केली.[56] तुकोजी होळकर दि.30 जुलै 1789 रोजी मथुरेस पोहचले. दि.31 जुले 1789 रोजी तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे यांच्या भेटी झाल्या.[57]

## तुकोजी होळकरांची अर्ध्या अधिकाराची मागणी -

तुकोजी होळकरांची आणि महादजी शिंदेची भेट प्रेमपूर्वक झाली. मेजवान्या झडल्या अलीबहादरही भेटले तोफखाने सुरु होवून भेटीच्या पूर्वरंगाच्या आरंभ झाला.[58]

---

54) म.द.बा.भा.2 ले.173 पा.141.
55) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.332.
56) ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.1 ले.224.
ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.332.
57) म.शि.का.ले.558 पा.784 ले.560 पा.769.
भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.84 पा.94.
ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.1 ले.238.
58) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.332.

पाहेल्या भेटात महादजी शिंदेनी निंबाहेडाच्या बाबीची गोष्ट काढून थोडेसे नमते घेतले. दोघांचे प्रेम बघुन अलीबहादरानेही पुण्यास कळविले ' परिणाम लागेल तो खरा '[59] महादजी शिंदेनी अहिल्याबाईनाही पत्र लिहिले की, ' ज्याप्रमाणे सुभेदार आपणास त्याप्रमाणे मजला जाणावे मागे जी गोष्ट झाली, पुढे उभयपक्षी एक विचारे चालावे '[60] महादजी शिंदेनी अलीबहादरासही आग्रहाने चौघडा व जरी पटका दिला. यावेळी तुकोजी होळकर महादजी शिंदेच्या पूर्ण आहारी गेले होते. दोघात बरेच सख्य होते.[61] पण हे प्रेम मात्र फार दिवस टिकले नाही. वास्तविक नव्या जिंकलेल्या प्रदेशात तीन भाग होत होते. एक भाग पेशव्यांचा, दुसरा भाग होळकरांचा आणि तिसरा भाग शिंदेचा. ही परंपरा सुरुवातीपासूनच होती. हया परंपरेला अनुसरुनच तुकोजी होळकरांनी आपला वाटा महादजी शिंधाकडे मागितला.[62] महादजींनी वाटा देण्याचे मान्य केले. पण झालेल्या खर्चाची वाटणी करण्याचीही अट घातली.[63] हयावर तुकोजीराव म्हणालेत ' तुमचा आमचा भाऊपणा, एकभाऊ घरी असतो दुसरा कमाई करतो. परंतु वाटयास दोघेही सारखेच'[64] शेवटी 9 लक्ष 21 हजार रुपये उत्पन्नाचा प्रदेश तुकोजींना देण्याचे महादजींनी मान्य केले. ' त्यांपैकी 2 लक्ष 10 हजाराच्या गढमुक्तेश्वर व हपाड महालांच्या सनदा महादजींनी करुन दिल्या पण हयात 'सायर' व 'इनामी' ही दोन गवि मात्र स्वतःकडेच ठेवली. हयामुळे तुकोजींनी महादजींना स्पष्ट कळविले की आमच्या महालात दुस-यांचा अंमल कसा चालेल? दोनही गवि देत असाल तरच सनदा ठेवून घेवू अन्यथा काहीही नको असे म्हणून सनदा परत पाठविल्यात. त्या शिंदेनी ठेवून घेतल्या.[65] वरील वाटयाच्या हकीकतींचे सविस्तर पत्र तुकोजींनी अहिल्याबाईंना पाठविले हयावर अहिल्याबाईंनी म्हटले की, ' आधीच वाटणी वाजवी केली नाही त्यातही

---

59) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.332-333.
60) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.332-333.
61) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.333.
62) सरकार कॉल भा.4 पृ.9.
63) भ.नं.3 भा.3 पा.171.
64) म.द.बा.भा.2 ले.207 पा.174
सरदेसाई मो.स.म.रि.3 वि.भा.2 पा.186.
65) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.2 पा.336.

मामलतीत स्वतःच्या अंमल ठेवून नुसतेच महाल लावून दिले ' अहिल्याबाईच्या या उत्तराने महादजी शिंदे खवळले. 2 लाखाच्या सनदा स्वतःकडे ठेवून घेतल्या, आणि 9 लाखाचे आश्वासन हवेतच विरले.[66] तुकोजी होळकरांनी वाटयाचा आपला हक्क सोडला नाही तर त्याच्या सतत लकडा लावला कारणं पुण्याहून नाना फडणीस तुकोजी होळकरांना वाटणी मागण्याकरिता प्रोत्साहन देत होतं.[67] हया वादामुळे उत्तरेतील मराठा साम्राज्य दुबळे झाल्याचे दिसून येते.

**महादजी आणि अलीबहादरात मतभेद -**

महादजी आणि अलीबहादर यांच्यातोल स्नेह लवकरच संपुष्टात आला. त्यांच्यात मतभेद झालेत आणि कटकटी सुरु झाल्या. तुकोजी आणि अलीबहादराला महादजी विरुध्द नानांकडून सतत प्रोत्साहन मिळत होते. नानांनी महादजींच्या मार्गात विघ्ने आणण्याचा सतत प्रयत्न केला.[68] अलीबहादर आणि महादजी यांच्यातील मतभेदांची प्रमुख तीन कारणे होती.[69] 1) अलीबहादराच्या खर्चाची बेगमी, 2) बूंदेलखंडाचे राजकारण, 3) गोसावी प्रकरण.

महादजी शिंदेच्या मदतीकरिता आलेल्या अली बहादरच्या हाताखालील फौजेचा खर्च महादजी शिंदेनी करावा अशी नाना फडणीसाची इच्छा होती. परंतु हयावेळी महादजी शिंदेची आर्थिक परिस्थिती अतिशय सोचनीय असल्यामुळे त्यांना तसे करणे शक्य नव्हते.[70] अलीबहादरचे म्हणणे की, दोन लक्ष रुपये फौजेचा खर्च सरकारातून नेमून दिला आहे तो नख्त देत जावा, वरकड पुण्याच्या आज्ञाप्रमाणे वागु.[71]

---

66) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.336-337
67) 'वाटणीच्या वगैरे चाली पूर्वीपासून चालत आल्याप्रमाणे उभयपक्षी चालावे'
ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.1 ले.298.
भागवत अ.ना. हो.इ.सा.भा.1 ले.28 पा.45.
68) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.1 ले.21 पा.32.
69) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.336.
70) म.शि.का.ले.539 पा.754.
71) शि.रा.भा.1 ले 159 पा.75.

दिल्लीचे राजकारण अलीबहादराकडे सोपवून महादजींची पुण्यास जाण्याची इच्छा होती. पेशव्यामार्फत अलिबहादरास कायमचे दिल्ली येथे ठेवले असते तर तो मुसलमान असल्यामुळे त्याचे राहणे दिल्लीतील मुसलमानांना खुपले नसते.[72] महादजींनी जर फौज आणि पैशाचा बंदोबस्त केला तर दिल्लीचा कारभार करणे आपणास शक्य होईल असे अलीबहादरास वाटत होते.[73] बुंदेल खंडातील बंदोबस्त लहान लहान सरदारांनी करावा आणि अलीबहादरांनी मथुरा, दिल्ली प्रांती राहून आपणांस मोकळे राहून आपणास मोकळे करावे असा महादजींचा आग्रह परंतु नाना फडणीसांच्या दडपणामुळे अलीबहादरांनी ते मान्य केले नाही. अलीबहादरास सर्वतोपरी मदत करण्याचे आश्वासन महादजी शिंदिनी दिले पण तरीही नाना फडणीसांच्या चिथावणीमुळे कारभार सांभाळण्यास त्यांनी नकार दिला.[75] महादजी शिंदि सारखा बलाढय सरदार नाना फडणीसांना पुण्यात नको होता. त्यामुळे अप्रत्यक्ष का हाईना नाना फडणीसांनी महादजी शिंदिच्या मार्गात विघ्ने आणली.[76] तुकोजी होळकर आणि अलीबहादर जरी महादजी शिंदिच्या मदतीकरिता उत्तरेत आले होते तरी त्यांनी महादजी शिंदेच्या मार्गदर्शनाखाली काम करावे असे नाना फडणीसांनी ठरवून दिले नव्हते. नाना फडणिसांना अलीबहादर बुंदेल खंडात गेल्यामुळे काही जाहागिरी आणि नजराणा सरकारात घेता येईल म्हणून महादजी शिंदिच्या परवानगीने अलीबहादरांनी ताबडतोब बुंदेल खंडात जावे असा तगादा लावला.[77] इ.स.1785 मधील खंडेराव दरीच्या युध्दापासूनची पन्ना, चरखारी आणि जैतपूर हया संस्थानिकाकडून मागील खंडणीची रक्कम अदयाप महादजी शिंदिना मिळाली नव्हती.[78] हयामुळे सध्यातरी अलीबहादरांनी बूंदेल खंडात जावू नये असे महादजी शिंदिना वाटत होते. पेशव्यांनीही महादजी शिंदिना कळविले की, ' अलीबहादर बुंदल खंडात गेले म्हणजे हिंदूस्थानचा बंदोबस्त

---

72) डॉ.अंधारे भा.रा.' संशोधन शिंपले ' पा.95.
73) ठाकूर वा.वा.हो.इ.भा..1 पा.334.
आपटे द.वि. त्रैमासिक भा.इ.सं.भ.पूणे शके 1845 पा.27'28.
74) म.शि.का.ले.539 पा.754.
आपटे द.वि. ' पाटिल बावांचे दिल्ली येथील राजकारण '
त्रैमासिक भा.इ.सं.मं. पूणे शके 1845 पा.27-28.
75) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.1 ले.21 पा.32-33.
76) आपटे द.वि.त्रैमासिक भा.इ.सं.म.पूणे शके 1845 पा.28.
भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.1 ले.21 पा.32-33.
77) अप्रकाशित गोरे दप्तर ले.579 पा.37-38 (सीतामऊ)
दि.19 जून 1789 चे अलीबहादरांना नानाचे पत्र.
78) दि.8 सप्टेंबरचे अलीबहादरांचे नानांना पत्र
अप्रकाशित गोरे दप्तर ले.593 पा.85 (सितामऊ)

होळकर शिंदिकडून काढला असे होत नाही. बुंदेलखंड वैयक्तिक पेशव्यांच्या हिस्स्यातील असल्याने त्यांच्या बंदोबस्तास गेलेच पाहिजे.[79] तुकोजी होळकरांनीही महादजी शिंदेची समजूत मोठया युक्तीने काढून अलीबहादरांना बुंदेलखंडात रवाना करावे असे नाना फडणीसांना कळविले होते.[80]

तुकोजी, अलीबहादर आणि महादजी शिंदे यांच्यात कटकटी चालू असतानाच जूलै 1789 मध्ये महादजी शिंदि आजारी पडले.[81] चौकशी अंती आढळून आले की, नागरीनबाई, तुकाबाई महादजी शिंदिवर गोसाव्यांच्या सांगण्यावरुन जादूटोणा करीत होती.[82] हिंमत बहादूर दोषी असल्याचे सिध्द होताच महादजी शिंदेनी अलीबहादरांना पूढे काय करावे हयाविषयी सल्ला विचारला. अन्यायाप्रमाणे पारिपत्य करण्याचा सल्ला अलीबहादरांनी दिला.[83] रायजी पाटील गोसाव्यास पकडून आणत असताना त्याने रायजी पाटलाला धक्का देवून पळून जावून अलीबहादराच्या डे-यात आश्रय घेतला. अलीबहादराकडे महादजी शिंदिनी गोसाव्यांची मागणी करताच त्या मागणीला अलीबहादराने नकार दिला.[84] हयामुळे मतभेद आणखीच वाढले. पेशव्यांच्या प्रतिष्ठेकरिता तुकोजी होळकरांनी अलीबहादरांना मदत करावी आणि त्यांच्या ताबेदारीत असावे अशी तुकोजींना नाना फडणीसांची ताकीद होती.[85] महादजी शिंदिनी हिंमत बहादूरांची दौलत जप्त करण्यास देवजी गवळी हयांना पाठविले पण अलीबहादराच्या आज्ञेमुळे तुकोजींचे सैन्य हिंमत बहादूराच्या दौलतीच्या रक्षणास सज्ज होते.[86]

---

79) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.95 पा.105-106, ले.97. पा.108, ले.104,5,6 पा.112 ते 116 ले.101 पा.110-111. भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.1 पा.44 ले:23 पा.36-37. ले.34 पा.52-74 ले.37 पा.58-59.
80) अप्रकाशित गोरे दप्तर ले.579 पा.37-38 (सितामऊ)
81) म.शि.का.ले.561 पा.793.
82) भ.रि.3 वि.भा.2 पा.188.
83) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.1 ले.23 पा.36-37 ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.333.
84) अप्रकाशित गोरे दप्तर ले.590 पा.72 सीतामऊ.
85) शि.रा.भा.1 ले.215 पा.106-107. पु.रे.कॉ.भा.1 ले.252 पा.347 ले.253 पा.348.
86) जोशी/सरकार भा.2 पा.23.

तुकोजी आणि अलीबहादरांना गोसावी प्रकरणामुळे महादजी शिंदिच्या मार्गात अडथळे आणण्याची सुवर्णसंधीच मिळाली. त्यांना नाना फडणीसांचा पाठिंबा होता.[87] पुण्यावरुन पत्रे हीच की अलीबहादरांना पाठिंबा द्यावा. तुकोजी महादजी शिंदे यांना म्हणाले की, तुमचे म्हणणे योग्य असले तरी श्रीमंताच्या हुकूमाचा अवमान कसा करावा या प्रकरणात नाना फडणीसांनीही अलीबहादराचाच पक्ष घेवून महादजी विरुध्द प्रोत्साहनच दिले.[89]

## तुकोजी होळकरांची शिष्टाई (मध्यस्थी)

अलीबहादरांनी गोसावी परत न दिल्यास पुण्यास परतण्याची धमकी नाना फडणीसांना महादजी शिंदेनी दिली, तर दुसरीकडे गोसाव्याला दिलेले वचन पाळण्यास सल्ला नाना फडणीसांनी अलीबहादराला दिला. तुकोजींनी मध्यस्थी करुन मार्ग काढण्याची सुचनाही नाना फडणीसांनी केली. तुकोजींनी महादजी शिंदेना समजाविण्याचा प्रयत्न केला. ' अलीबहादर आणि आपण एकच आहोत. अलीबहादर पेशव्याकडून मदतीस आल्यामुळे हयांचा मान राखावा. लोक त्यास लेकरु म्हणतील आपण मोठे म्हणून मनसुब्यात फुट नसावी.[90] परंतु तुकोजींचा हा सल्ला काही महादजी शिंदेना पटला नाही.

200 सैन्यांच्या संरक्षणाखाली हिंमत बहादर गोसाव्याला मथुरेस ठेवून अलीबहादरांनी इस्माईल बेग विरुध्द जयपूरवर आक्रमण करावे. बुंदेलखंडात जावू नये आणि खर्च महादजी शिंद्याकडून घ्यावा.[91] अशी शिष्टाई तुकोजींनी केली पण ती अलीबहादरांना अ

---

87) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.। ले.25 पा.47.
88) शि.रा.भा.। ले.215 पा.106-107.
89) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.87 पा.97.
90) ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.। ले.251.
91) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.92 पा.101-2.
ले.87 पा.97-98 ले.113 पा.121 डॉ.अंधारे भा.स.पा.91.

अमान्य झाली. तेव्हा गोसाव्यास झाशी किंवा अरुणच्या किल्ल्यात कैदेत ठेवण्याचा प्रस्तावही मांडला.[92] पण तोही धुडकावून दिला. पुण्याला परतण्याचा निरोप नाना फडणीसांनी दिला. पुण्याचा परतण्याचा निरोप नाना फडणीसांनी दिला.[93] पण तोही मानला नाही. ह्या प्रकरणात तुकोजींच्या अलीबहादरांना असलेल्या उघड पाठिंब्यामुळे महादजी शिंदे खुपच संतापले.[94] पुण्यात अलीबहादरांना महादजी शिंदिविरुध्द इतक्या कठोर शब्दात तक्रारी केल्या की अलीबहादरांच्या आईने मेहरम बाईनेही त्या सबंधात अलीबहादराला ठोकले.[95]

तुकोजींनी पुन्हा एकदा महादजी शिंदि आणि अलीबहादरात समेट घडवून आणण्याचा प्रयत्न केला. अलीबहादरांनी गोसाव्यास अरुणच्या किल्ल्यात पाठवून त्याचा लवाजमा अलीबहादराजवळ आणि बायकामुळे महादजीकडे असावीत. अलीबहादराला दरमहा 77,000 रुपये दरमहा खर्चास मिळावे.[96] अशीं तडजोड सुचविली पण ती नाना फडणीसांनी अमान्य केली. उलट नाना फडणीसांनी अलीबहादरास स्पष्ट कळविले की, तुकोजी आणि महादजी जयपूर स्वारीस गेले तरच अलीबहादरांनी जीवे अन्यथा जावू नये.[97] शेवटी तुकोजींनी सुचविलेला हा प्रस्तावही अलीबहादराने अमान्य केला.[98] शेवटी हे भांडण अहिल्याबाई होळकराकडे गेले असता त्यांनी कळविले की, ' तिघातून एकाचाही दाब कमी झाला तर सर्वांचा नाश झाला असे समजावे. परमुलुखात अशी मसलत करु नये '[99] नाना फडणीसांनाही शेवटी महादजींची बाजु न्याय्य वाटल्याने त्यांनीही गोसाव्यास महादजीच्या स्वाधीन करण्याचा आदेश दिला.[100] पण ह्या आदेशाला अलीबहादराने केराची टोपली दाखविली.[101]

---

92) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.75-54, 86,87 लें.92 पा.105 ल.101 पा.110-111.
93) शि.रा.भा.1 ले.125 पा.55-56.
भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.173 पा.181.
94) हिंगणे दप्तर खंड-3 लें.23 पा.65-66.
95)
96) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.75 पा.86-87.
लें.94, पा.105 ले.101 पा.110-111.
97) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ल.144 पा.146.
98) ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.1 ले.258.
99) ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.1 ले.259.
100)म.शि.का.ले.583 पा.843.
101)म.शि.का. ले.583 पा.843.

तुकोजींचा प्रयत्न सतत गोसावी प्रकरण संपविण्याचा होता.[102] शेवटी तुकोजींना यश येवून त्यांच्या मध्यस्थिने बाबाराव वकीलामार्फत दि.6 फेब्रुवारी 1790 रोजी ब-याच दिवसापासून चिघळत असलेल्या गोसावी प्रकरणाचा शेवट झाला. त्याच दिवशी अलीबहादराच्या छावणीत जावून महादजी शिंद्यानी हिंमत बहादूरास मानाची वस्त्रे दिली. मागील सर्व गुन्हे माफ केले. घोडा, हत्ती बक्षीस दिला आणि गोसाव्यांच्या बाया माणसा भोवतालचा पहरा उडविण्याची आज्ञा दिली.[103] सर्वानुमते ठरले की हिंमत बहादर गोसाव्यास मोकळे करावे हयामुळे त्याने वाकडी वर्तणूक केल्यास त्याचे पारिपत्य करावे.[104] आणि अशाप्रकारे तुकोजींच्या सतच्या प्रयत्नांनीच शेवटी एकदाचे गोसावी प्रकरण मिटले.

पुढे महादजींनी अलीबहादरास रक्कम देणे बंद केले हयामुळे अलीबहादर निष्कांचन झाला होता. तेव्हा मे 1791 मध्ये त्याने बुंदेलखंडात जाण्याचा निर्णय घेतला.[105] त्यावेळी अलीबहादराची रकमेची अडचण तुकोजींनी भागविली. तुकोजीकडून अलीबहादराने साडे तीन लाख रुपये कर्ज घेतले व सप्टेंबर 1791 मध्ये तो भदावर मार्गाने बुंदेलखंडात जाण्याकरिता निघाला.[106] तुकोजी मात्र इ.स.1793-94 पर्यंत उत्तरेतच अडकले.

---

102) अप्रकाशित पारसनीय ट्रान्सक्रीप्ट (पूणे) खंड 8, पा.221.
फोर्ट विल्यम भा.16 पा.275,327.

103) अप्रकाशित पारसनीय ट्रान्सक्रीप्ट (पूणे) खंड 8 पा.265.

104) भावेकृत मराठी दप्तर क्रमांक भा.3
ले.132 पा.138 ले.138 पा.143 ले.139 पा.140.

105) भावेकृत मराठी दप्तर कमाल भा.3 ले.179 पा.187.
ले.181 पा.189.
सातारा ऐतिहासिक लेखमाला भा.1 ले.220 पा.101
ले.276 पा.142 ले.277 पा.142-143 ले.140 पा.145.
डॉ.अंधारे ' संशोधन शिंपले ' पा.99.

106) म.द.बा.भा.2 ले.219 पा.187 ले.224,पा.191.
डॉ.अंधारे ' संशोधन शिंपले' पा.99.

# प्रकरण - 5 वे

## तुकोजी होळकर - महादजी शिंदि हयांचे संबंध

1) तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे हयांचे संबंध
2) महादजींना सरदारी मिळवुन देण्यास मल्हाररावांची मदत
3) वस्त्रे देण्याची शिंदि - होळकराबाबत रीत
4) अहिल्याबाईना महादजींची मदत
5) तुकोजी महादजी उत्तरेकडे इ.स. 1769-1772
6) तुकोजी महादजींमधे नजीबखान व झाबेताखानाबाबत मतभेद
7) मराठयांच्या मदतीने बादशहा पुन्हा तख्तावर
8) तुकोजी महादजींचा बारभाईस पाठिंबा
9) तुकोजी होळकर व महादजी यांची प्रथम आंग्ल-मराठा युध्दात एकदिलाने कार्य
10) तुकोजींचे महादजींच्या मदतीस उत्तरेत प्रयाण -
11) गोसावी प्रकरणावरुन मतभेद आणि तुकोजीची शिष्टाई
12) राजपुताण्याच्या मसलतीवरुन मतभेद
13) पाटण व मेडत्याच्या युध्दात तुकोजी होळकरांची कामगिरी
14) वाटणी संबंधीचा वाद
15) तुकोजी - महादजीमधे मतभेद का निर्माण झाले.

*****

## प्रकरण - 5 वे

### 1) तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे हयांचे संबंध -

तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे हयाच्यातील संबंधाचा आढावा घेताना त्यांचा सहकार्याचां काळ आणि बेनबावाचा काळ दोन्हीचा मागोवा घेणे अत्यावश्यक आहे. दोघाचाही कार्यकाळ सारखाच आहे. दोघेही समकालीन असल्याने त्यांचे तुलनात्मक विवेचन किंवा त्यांच्या संबंधाचा समालोचनात्मक आढावा घेणे अप्रस्तुत होणार नाही.

मल्हाररावांच्या मृत्युनंतरही तुकोजी-महादजी संबंध सलोख्याचे राहिले. पण पुढे मात्र त्यात वितुष्ट निर्माण होऊन मतभेदांची रवाई दिवसेंदिवस वाढतच गेली. परंतु आरंभी दोघामध्ये सलोख्याचे व जिव्हाळयाचे संबंध होते ही गोष्ट पुढील घटनेवरुन प्रकर्षाने जाणवते.

### 2) महादजींना सरदारी मिळवुन देण्यास मल्हाररावांची मदत -

पानिपतानंतर मल्हारराव आणि महादर्जीनी एकत्र कार्य केले. पेशव्याने मल्हाररावावर सर्व हिंदुस्थानचा कारभार सोपविला होता.[1अ] महादजी मदतीला होतेच. महादर्जींना सरदारी मिळावी हयाकरीता मल्हाररावांनी प्रयत्न केले. मल्हाररावानेच महादजींचा रघुनाथरावाच्या रागापासून बचाव केला.[2] मृत्युपूर्वी महादजींची रघुनाथरावांसोबतच भेट करुन दिली. याच वेळी महादजीव केदारजी शिंदे मधे समेट झाला. आणि त्यांनी सरदारीची वस्त्रे महादर्जींनाच देण्याची विनंती केली.[3]

---

1अ पुरंदरे दप्तर - भा.1 ले. 419
हिंगणे दप्तर - भा.1 ले. 202, 211, 212, 213

2. गाडगीळ ह.र.विंचुरकर घराण्याचा इतिहास पा.80
राजाध्यक्ष न.व्य. जीवबादादा केरकर यांचे चरित्र पा.50

3. पे.द.खं.29 ले. 66 पा. 68

3) वस्त्रे देण्याची शिंदे - होळकरांबाबत रीत -

पेशवे दप्तरातील पत्रावरुन होळकर - शिंदिना सरदारीची वस्त्रे देण्याची रीत कशी होती याची कल्पना येते. याविषयी मातोश्री अहिल्याबाई लिहितात. ' मुतालकी सिका श्रीमंताचे नावाचा देणे तो उभयता येक जागा असतील तेव्हा द्यावा. हे रीत पहिल्यापासोतन आहे.' [4] महादजी शिंदे यैथे आले म्हणून रा. तुकोजी होळकर याजला बोलाऊ पाठविले. ते एक दो रोजानी येतील यांचे शिंदिचे एक चित्र करुन उभयेतां वस्त्रे देऊन रवाणा करावे.[5] थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या काळातच होळकर - शिंदे हे सरदार उदयाला येऊन त्यांनी आपल्या पराक्रमाने व एकनिष्ठ सेवेने पेशव्यांचा विश्वास व मर्जी संपादन केली. माळव्याचा स्वतंत्र कारभार शिंदे - होळकरांना देण्यात आला.[6] 22 नोव्हेंबर 1731 रोजी मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंदिच्या नावे संयुक्त सरंजाम दिला.[7] आणि पेशव्यांच्या उत्तरेकडील कारभाराचे पहिले मोठे सरंजामदार बनण्याचा मान होळकर-शिंद्यानांच मिळाला. इ.स. 1728 पासून ते इ.स. 1794 पर्यंत हे एकत्रच कार्य करीत होते.

4) अहिल्याबाईना महादजींची मदत -

अहिल्याबाईचा पुत्र मालेरावाचा ता. 27/3/1767 रोजी मृत्यु झाला. होळकरांच्या घराण्याला वारस नाही या सबबीवर तेथील व्यवस्था आपल्या मनाप्रमाणे करुन भरपूर द्रव्य उकळण्याचा डाव रघुनाथरावांनी केला. पण अहिल्याबाई खंबीर होत्या त्यांनी पेशवा माधवरावांना सर्व हकीकत कळविली.[8] तेव्हा माधवराव पेशव्यांनी स्पष्ट कळविले.

---

4. चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले - 134
5. पे.द. खं. 39 ले. 39 पा. 41
6. पे. दं. ख. 30 ले. 318 पा. 339
7. डॉ. राम इंगळे पा. 4
8. ठाकुर वा.वा. हो.इ.सा. भा-1 ले. पा. 163 ले. 13

' तुमचे दौलतीविसी पापबुध्दी ठेवलं त्याचे पारिपत्य बेलाशक करावे.' [9] तुकोजींना फौजेवर मुख्य नेमून तुकोजींना तातडीने येण्याची आज्ञा दिली.[10] महादजींना रघुनाथरावाने इदूरावर चालुन जाण्यास सांगितले तेव्हा ते म्हणाले, ' मी जातीने पेशव्यांची पाहिजे ती चाकरी करण्यास तयार आहे. पण या कामास मी आपली तलवार लावणार नाही.[11] म्हणजेच मल्हाररावांनी केलेल्या उपकाराची फेड अशा कठीण प्रसंगी महादजींनी केली.

5) तुकोजी महादजी उत्तरेकडे - इ.स. 1769-1772

इ.स. 1766 मध्ये मल्हाररावांच्या मृत्युनंतर होळकर शिंदे हयांच्यात सलोखा होता. सखाराम बापू ता. 28/9/1760 रोजी तुकोजीस लिहितात. ' महादजी शिंदे यास घेऊन लांबलाब मजला करित यावे.' [12] ता. 6 मे 1768 रोजी महादजी तुकोजीस लिहितात. ' आपण व आम्ही समागमेच हिंदुस्थानात जाऊ.[13] इ.स. 1769 च्या एप्रील महिन्यात रामचंद्र गणेश कानडे, विसाजी कृष्ण बिनिवाले, तुकाजी होळकर, महादजी शिंदे यांची सैन्यासह रवानगी उत्तरेत झाली.[14] उत्तरेत आल्यावर पावसाळा असल्यामुळे रामचंद्र गणेश कानडे यांनी बुंदेलखंडात छावणी करुन पूर्वीचा उठलेला अंमल बसविण्याचा प्रयत्न सुरु केला. तर तुकोजी होळकरांनी बुंदी कोटयाकडे तर शिंदेनी उदयपुराकडे जाऊन खंडण्या वसूल केल्या.[15] मराठी फौजा उत्तरेत येताच जाट राजा नवलसिंगाने त्यांना विरोध करण्यास सुरवात केली.[16] मराठे आणि जाट हयांच्यात ता. 6 एप्रिल 1770 रोजी झालेल्या लढाईत जाटांचा पूर्ण पराभव झाला.[17] हयानंतर मराठयांनी लगेचच आग्रा आणि मथुरा ही ठिकाणे हो हस्तगत केली.[18]

---

9. म.रि. म.वि. भा.4 पा. 205
10. म.री. उ वि भा-1 पा.7
11. म.री.म.वि. भा-1 पा.7
12. चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले. 7
13. चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले.9
14. खरे वा.वा. 'ऐतिहासिक लेखसंग्रह' भा-4 पा. 1879
    पे.द.खं.29 ले. 224 पा. 236 ले. 231 पा. 239
15. डॉ. राम इंगळे पा. 58
16. सी.पी.सी. भा-3 नं. 128, 161
17. सरकार कॉल भा.3 पा. 9
18. सी.पी.सी. भा-3 नं. 231
    एन.एच.एम. भा-2 पा. 526-527
    म.रि. म.वि. भा-4 पा. 213

6) तुकोजी-महादजींमध्ये नजीबखान आणि झाबेताखानाबाबत मतभेद -

मराठयांच्या उत्तरेकडील आगमनामुळे नजीबखान घाबरला आणि त्याने तुकोजीमार्फत मराठयांशी मैत्री केली. पण ही गोष्ट महादजींना पसंत नव्हती. नजीब दोस्तीचा आव आणून पानिपतापूर्वीचेच डाव रचू लागला. नारो नरसी लिहितो. ' नवलसिंग जाटान तो सर्वांशी आंतरर्यामी अनुसंधान बांधोन मामलतीचे बोलणे दीर्घ सुत्रावर पडले आहे. नजीबखान आदि करुन पारचे रोहिले पठाणाची सुत्रे आहेत. जे सर्वांनी एकत्र होऊन एकवेळा दक्षिणीयासी लढाई घावी. यात जे ठरल ते पुढे पाहोन घ्यावे..... महादर्जीनी सांगितले होते ते जाटासी मामलेत करुन उपरांत आंतर वेदीत उतरणे.' [19] मराठयांनी रोहिले व पठाणाकडे प्रदेशाची मागणी केली. पण ती त्यांनी नजीबखानाच्या पाठिंब्यामुळे साफ नाकारली.[20] ' नजीबचा होइल तितका उपयोग करुन नंतर पारिपत्य करावे.' असे तुकोजी आणि विसाजी कृष्ण बिनिवाले यांचे म्हणणे होते. परंतु नजीबाचे पूर्णपणे पारिपत्य करावे असे महादजी आणि रामचंद्र गणेशांचे म्हणणे होते. पूर्वानुभवाने शहाणे झालेले मराठे यमुनेपर्यंत परत आल्याने त्यांचा घात करण्याचा नजीबखानाचा कावा असफल झाला. नजीब ता. 31 ऑक्टोबर 1770 रोजी मरण पावला. त्याचा मुलगा झबेताखान त्याचा वारस झाला.[21] त्यांच्यासोबतच्या धोरणाबाबत तुकोजी-महादजी मध्ये मतभेद निर्माण झाले. तुकोजीमुळे झबेताखानाला महादजी कैद करु शकले नाही. वासुदेव शास्त्री खरे लिहितात. 'राजपुत व पठाण सरदारांविषयी होळकर व शिंदे या घराण्याची धोरणे भिन्न भिन्न होती. या लोकांना जिवंत ठेवून त्यांच्यावर वर्चस्व गाजवावे असे होळकरांचे धोरण । तर हयाउलट हयांच्यात फुट पाडून त्यांचा कायमचा नायनाट करावा असे महादजी शिंद्यांचे धोरण होते.[22] होळकराच्या धोरणाच्या समर्थनार्थ तळंदीपेंच लिहितात. ' होळकरांच्या धोरणाला इतिहास, परंपरा आणि मुत्सद्दीपणा याचा मोठा पाठिंबा होता. पानपतानंतरचे मराठयांचे सामर्थ्य लक्षात

-----------------------------------------------

19. पे.द. खं. 29 ले. 246 पा. 248
20. पे.द. खंड- 29 ले. 246 पा. 248
21. सी.पी.सी. भा-3 नं. 605
22. खरे वा.वा. नाना फडणीसांचे चरीत्र पा. 140

घेतले तर स्थानिक लोकांना होता होई तो न दुखविता त्यांना ताबेदारीत वागवुन त्याजपासून शक्य तेवढा फायदा करुन घ्यावा हे होळकरांचे धोरण चुकीचे नव्हते.[23] महादजी शिंदेच्या सल्ल्यानी तुकोजीराव होळकरांनी नजीबखान व त्याचा पुत्र झाबेताखानाचा कायमचा काटा काढला असता तर पुढे गुलामकादरने सम्राट शहाआलम व शाही कुटुंबातील स्त्रीयांवर जे अत्याचार केले आणि गुलामकादरचे पारिपत्य करण्यास अलीबहादरला जो काळखंड लागला तो लागला नसता आणि शहाआलमला डोळसपणे लवकरच दिल्लीच्या तख्तावर बसविता आले असते. या घटनेवरुन पूर्वीच्या अनुभवावरुन शहाणे होणे हे तुकोजींना समजले नाही हे स्पष्ट दिसते. मराठयाना तोंड देणे अशक्य होऊन अहमदखान बंगशाने प्राणांची भीक मागत पानीपता पूर्वीचा दोआबातील संपुर्ण प्रदेश मराठयांना परत दिला.[24]

7) मराठयांच्या मदतीने बादशहा पुन्हा तख्तावर -

जाट आणि रोहिले हया मराठयांच्या शत्रुंना नामोहरण केल्यामुळे बादशहाला परत आणून दिंल्लीवर ताबा मिळविण्याचा मराठयांचा मार्ग मोकळा झाला.[25] मराठयांना झबेताखानाकडून ता. 10 फेब्रुवारी 1771 रोजी दिल्ली हस्तगत केली.[26] बादशहा शहाआलमने मराठयांच्या सर्व अटी कबूल करुन ता. 12 फेब्रुवारी 1771 रोजी करारावर सही केली.[27] आणि ता. 6 जानेवारी 1772 रोजी मराठयांच्या मदतीने बादशहा शहाआलम

---

23. खरे वा. वा. नाना फडणीसांचे चरीत्र पा. 140
24. सी.पी.सी. भा-3 नं. 505, 517, 530
25. सी.पी.सी. भा-3 नं. 614
26. सी.पी.सी. भा-3 नं. 605, 665
    पे.द.खं.29 ले. 265 पा. 270 ले. 266 पा. 271
    ओतुरकर रा.वि. 'महाराष्ट्राचा पत्ररुप इतिहास' पा. 161
27. सी.पी.सी. भा-3 नं. 694
    पे.द. खं.29 ले. 89 पा. 84

दिल्लीच्या तख्तावर बसला.[28] हयाचवेळी तुकोजी होळकरांनी फत्तरागडची यशस्वी मोहीम केली.[29] आणि पानिपतावरुन रोहिल्यांनी मराठयांची मौल्यवान वस्तुंची नेलेली लुट, घोडे, हत्ती, तोफा इ. फत्तरागड वरुन परत मिळविली.[30] नजीबखानाची कबर उध्वस्त करुन त्याची हाडे फेकुन त्याने केलेल्या अत्याचाराचा मराठयांनी पुरता सूड घेतला. पानिपतचा कलंक धुवुन काढला.[31]

पारसनिस लिहीतात, ' पानिपतच्या अपयशामुळे ज्या दिल्ली नगरीत ज्या मराठी राजसत्तेचे समुळ उच्चाटन झाले होते. तेथे इ.स.1771 मधे मराठयांचे वर्चस्व पुन्हा स्थापीत होऊन दिल्ली पतीस तक्तनशीन करण्याचा सुप्रसंग मराठयास प्राप्त व्हावा ही गोष्ट त्यांच्या दृष्टीने अत्यंत संतोषदायक व गौरवास्पद वाटावी यात आश्चर्य नाह.[32]

उत्तरेतील हया यशाच्या बातमीमुळे पुण्यात आसन्नमरण असलेल्या पेशवा थोरल्या माधवरावांना अपेक्षा पूर्तीचे समाधान वाटले. पेशवे माधवराव वयाच्या अवघ्या अठ्ठाविसाव्या वर्षी पुण्याजवळ थेऊर येथे बुधवार ता. 18 नोव्हेंबर 1772 रोजी निधन पावले.[33] मराठयांच्या सत्तेवर आकाशच कोसळले. आणि त्यात मराठेशाही होरपळुन निघाली. नजीबखान झाबेजखान यांच्या प्रश्नावरुन होळकर-शिंदि मधे निर्माण झालेल्या दुहीमूळे मोहिमेचा लाभ मराठयांना अपेक्षेप्रमाणे घेता आला नाही असे म्हणणारे विसरतात की या स्वारीचे प्रमुख रामचंद्र गणेशकानडे आणि विसाजी कृष्ण बिनिवाले यांचे मतभेद इतके तीव्र झालेत कि शेवटी पेशवा माधवरावांनी रामचंद्र गणेशांना परत बोलाविले. तुकोजी लिहितात, '

---

28. पे.द.खं.29 ले. 89 पा. 84 ले. 266 पा. 271
    दत्ता के. पा. 59 केळकर न.चि. ' मराठे आणि इंग्रज ' पा.117
29. ठाकुर वा. वा. हो. इ. भा- पा. 304
30. पे.द.ख. 29 ले. 270 पा. 274
31. पे. द. खं.29 ले. 270 पा. 274
32. पारसनिस द.बा. ' ऐतिहासिक चरीत्रे ' भा.2 पा. 116
33. ऐ.प.वा. पा. 463
    खोबरेकर वि. गो. पा. 373

' राजश्री विसाजी पंतानी राजश्री रामचंद्रपंताची रवानगी देशास केली आहे. ' 34 उत्तरेकडील घोरणासंबंधी थोरल्या माधवराव पेशव्यांचे एक अत्यंत महत्वाचे पत्र उपलब्ध आहे. त्यात ते लिहितात. 'आज्ञे हि पेक्षा सेवक लोकास धनी संतोषी विशेषात्कारे होय ऐसे सुचेल ते करावे ' 35 माधवरावांच्या मृत्युमुळे उत्तरेतील उद्योग अर्धवट सोडून मराठयांना दक्षिणेत परतावे लागले आणि तुकोजी-महादजी मधील मतभेदही संपले.

## 8) तुकोजी-महादजींचा बारभाईस पाठिंबा -

पेशवे थोरल्या माधवरावांच्या मृत्युने मराठा राज्यात अंतस्थ यादविचा भडका उडाला. त्या वणव्यात ता. 30 ऑगस्ट 1773 रोजी नारायणराव पेशव्यांची आहुती पडली.[36] रघुनाथराव पेशव्यांच्या गादीवर बसतात न बसतात तोच मराठे शाहीतील सोडतीन शहाण्योपैकी दीड शाहण्यांनी म्हणजे सखाराम बापू बोकील व नाना फडणीसांनी बारभाई कारस्थान उभे करुन बारभाई मंडळाची निर्मिती केली.[37] ह्या बारभाईत सखारामबापू बोकील, नाना फडणीस, हरिपंत फडके, त्रिंबकराव पेठे, मालोजी घोरपडे, मोरोबा फडणीस, पटवर्धन इ. होते.[38]

पुढे ह्यात तुकोजी-महादजी सहभागी झाले. सवाई माधवरावांचा जन्म 18 एप्रिल 1774 रोजी होऊन[39] चाळीसाव्या दिवशी पुरंदरावर ता. 28 मे 1774 रोजी त्यांना पेशवाईची वस्त्रे दिली.[40] रघुनाथरावामध्ये पेशव्यांच्या सैन्याचा सामना करण्याची हिंमत

---

34. रा.ख. 14 ले.3
35. ऐतिहासिक संकीर्ण साहित्य खं.7 पा.45 भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे.
36. पे.द. खं.39 ले. 156 पा. 158
    म.इ.सा. भा-4 पा. 45
    ऐ.ले.सं. भा-4 ले. 1232 पा. 1946 ते 1243 पा. 1966
    ले. 1257 पा. 1991
37. फारेस्ट ' मराठा सिरीज ' भा.1 पा. 253
    ऐ.ले.सं. भा.5 ले. 1299 पा. 2090
38. पे.द. खं.5 ले. 24 पा. 21-22
    ऐ.ले.सं. भा-4 पा. 2008
39. पे.द.खं.5 ले. 45 पा.42
    इलियट अँड डाक्सन 'द हिस्ट्री ऑफ इंडीया' भा.8 पा. 295
    अँडवेल ' केंब्रीज हिस्ट्री ऑफ इंडीया' भा.5 पा. 255
    खोब्रेकर वि.गो. पा. 415
40. पे.द.खं.5 ले. 49 पा.44
    खोब्रेकर वि.गो. पा. 415

नसल्याने ब-हाणपूरला आला.[41] हयावेळपर्यंत तरी महादजी तुकोजीचा निर्णय कोणत्या पक्षात सामील व्हावा हा झाला नव्हता.[42] तुकोजी महादजीनी रघुनाथरावांना चार समजुतीच्या गोष्टी सांगुन हया आत्मघाती मार्गापासून परावृत्त करण्याचा बराच प्रयत्न केला.[43] हयानंतर बारभाईत वैयक्तिक वर्चस्वासाठी चढाओढ सुरु होऊन परस्परास शह प्रतिशह देणे सुरु झाले. हयाच वेळी मोरोबांनी कारस्थान रचले.[44] तुकोजी-महादजींच्या मदतीने नानांनी ते मोडून मोरोबास किल्लेनशीब केले. तुकोजी सुरुवातीला मोरोबाकडे होता. महादजींनीतुकोजींची भेट घेऊन म्हटले. ' मोरोबा द्वारा इंग्रज पुण्यात दाखल होऊन सर्व सत्ता बळकावातील. होळकर-शिंदेच्या निष्ठेवरच मराठयांच्या राज्याची सुरक्षीतता अवलंबून असल्याचे पटवून आपल्याकडे वळविले.[45]

तुकोजी नानास लिहीतात ' राजश्री महादजी शिंदे यांचे व आमचे चित्ताची सफाई नव्हती त्याची दुरुस्ताई अलिकडे होऊन स्वामीसेवा एकरुपाने करावी या अर्थी निखालसता जाली.'[46] हयानंतर तुकोजी नानांचा कायमचा समर्थक बनला. सन 1778 च्या एप्रिलमधे पुणेदरबारात नानांचे वर्चस्व तुकोजी होळकर, महादजी शिंदेच्या साहाय्याने कायम झाले.

---

41. सी.पी.सी. भा-4 नं. 1026 फॉरेस्ट ' मराठा सिरीज ' भा-1 पा. 233
42. पे.द.खं. 36 ले. 58 पा. 46
43. एन.एच.एम. भा-3 पा. 47
44. ठाकुर वा. वा. हो.इ. भा-2 पा. 308
45. ऐ.ले.सं. भा-7 ले. 2399 पा. 3325
    सेन एस. एन. पा. 102
46. पे. द. खं. 5 ले. 46 पा. 45

### ९) तुकोजी होळकर व महादजी यांचे प्रथम आंग्ल-मराठा युध्दात एकदिलाने कार्य -

रघुनाथरावांच्या पेशवा बनण्याच्या राक्षसी महत्वाकांक्षेपायी पाहिले इंग्रज मराठा युध्द उद्भवले. इंग्रजाविरुध्द सर्व लष्करी कारवाईची जबाबदारी प्रामुख्याने हरिपंत फडके, तुकोजी होळकर, महादजी शिंदे, भीमराव पाणसे ह्यांच्यावरच होती. तळेगांव येथे मराठयांनी इंग्रजांना जबरदस्त मार दिला. वडगांवला त्यांची कोंडीकरुन त्यांना तह करण्यास भाग पाडले. दि.17.1.1979 रोजी वडगांवचा तह होऊन ह्याची अंमलबजावणी होण्यास फार्मर व स्टेवर्ट हे दोन ब्रिटिश अधिकारी मराठयांकडे ओलीस राहिलेत.[47] रघुनाथराव मराठयांच्या स्वाधीन झाला. पेशवेपदावरील हक्क सोडावा. 12 लक्षाची जहागिर घेवून झाँशी येथे राहावे असा करार झाला.[48] ह्या कराराची हमी तुकोजी व महादजींनी दिली. ह्याचा सुड म्हणून रघुनाथरावांनी सखाराम बापूंनी लिहिलेले पत्र महादजींना दिले.[49] महादजीने सखाराम बापूंना सिंहगडावर कैदेत डांबले.[50] ता.27.2.1779 रोजी.

अपमानास्पद वाटणारा वडगांवचा तह झुगारुन देवून इंग्रजांनी लढण्याचे ठरविले. ह्याचवेळी नर्मदा पार करतांना हरि बालाजीला जखमी करुन रघुनाथराव गुजराथेत पळाले.[51] गोडाईने त्यांचे स्वागत केले. तुकोजी होळकरांना बरोबर घेवून महादजी शिंदे गोडाईचा सामना करण्यास बडोदयाच्या दिशेने निघाले.[52] चतु:संघाच्या कराराप्रमाणे तुकोजी महादजींनी गुजराथमध्ये एकत्र राहून इंग्रजांचा मुकाबला सुरु केला. शत्रुत्व बोचट करण्याच्या उद्देशाने

---

47) ऐ.ले.सं. भा.7 पा.3392-3393.
कानेटकर य.गो. ' सखाराम बापूंचे चरित्र ' पा.207,208.

48) पे.द.खं.5 ले.97 पा.97.
मॅक डौनाल्ड ' नाना फडणीसांची बखर ' पा.54.

49) ऐ.ले.सं. भा.7 ले.2486 पा.3440 ले.2489 पा.3442.

50) ऐ.ले.सं.भा.7 ले.2486 पा.3439-47.
म.इ.सा.भा.10 पा.136.
कानेटकर य.गो. सं.बा.च.पा.210

51) पे.द.खं.34 ले.108 पा.95
ऐ.ले.सं.भा.7 ले.2503 पा.3480

52) म.शि.का.ले.90 पा.82.
बर्वे एम.व्ही. पा.70.

फार्मर व स्टेवर्ट हयांची सुटका केली.[153] जनरल गोडाई बोरघाट चढून येताच तुकोजी होळकरांनी परशुरामभाऊ/व हरिपंतानी निकराचा प्रतिकार करुन त्याचा पराभव केला. उत्तरेला इंग्रज लष्करी कारवाई करणार अशी कुणकुण लागताच तुकोजीसह महादजी माळव्यात दाखल झाले. 1 जुलै 1781 रोजी महादजींनी कर्नल म्युरचा पराभव केला..[54] तर तिकडे कोकणात तुकोजी, हरिपंत परशुरामभाऊ वगैरेनी गोडाईचा जबरदस्त पराभव केला.[55] हयामुळे इंग्रजांनी तहाचीं निकड लावली. 17 मे 1782 रोजी सालबाईचा तह होऊन युध्दाचा शेवट झाला.[56] होळकर-शिंदेनी बारभाईना मदत केली म्हणूनच पेशव्यांच्या औरस वारसाचा टिकाव लागला. या युध्दाच्या वेळी होळकर-शिंदे एकनिष्ठ राहिल्यानेच मराठेशाही जीवघेण्या संकटातून सुरक्षित राहिली.

10) तुकोजींचे महादजींच्या मदतीस उत्तरेत प्रयाण -

जयपूरचा प्रतापसिंह व जोधपूरचा विजयसिंह यांना महंमद बेग हमदानी येवून मिळाला. लालसोटच्या युध्दात महंमद बेग हमदानी ठार झाला.[57] महादजींच्या सैन्यात फितुरी झाल्याने दुसरे पानिपत होण्याची वेळ आली.[58] पानिपतचा अनुभव पाठीशी असल्यामुळे महादजींनी **' बचेंगे तो और भी लढेंगे '** या तत्वाप्रमाणे माघार घेतली.[59] पेशवा **सवाई माधवरावांना महादजींनी** 10 ऑगस्ट 1787 रोजी पत्र पाठवून मदतीची **विनंती केली.**[60] अशाच आशयाचे पत्र त्यांनी तुकोजींनाही पाठविले. या पत्राप्रमाणे तुकोजींनी पुणे दरबारास विनंती केली. ' सोबती संकटात आम्हास बिदा करावे '[61] नाना फडणीसांनी 5 लक्ष रुपये

---

53) म.शि.का.ले.90 पा.90
कळकर न.चि.पा.81.
54) ऐ.ले.सं.भा.7 ले.2636 पा.3632
55) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.2 पा.313
56) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.313
57) दि.म.रा.भा.1 ले.224 पा.191, पु.रे.कॉ.भा.1 ले.135 पा.210.
अप्रकाशित गुलगुले दातर, ले.77 पा.87 (सितामऊ)
58) म.शि.का ले.503 पा.692.
पु.रे.कॉ.भा.1 ले.135 पा.210
59) **म.शि.का.** ले.503 पा.692
' सात संम्मेलन वृंत ' पा.7 भा.इ.सं.मं.पुणे 1841
60) म.शि.का.ल.501 पा.689
61) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.2 पा.324

आणि तुकोजी होळकर आणि अलीबहादरांना सैन्यासह त्वरीत पाठविण्याचे आश्वासन दिले.[62] महादजींच्या पत्राप्रमाणे नानांनी अलीबहादरांची महादजीच्या मदतीकरिता ता.8.9.1787 रोजी रवानगी केली.[63] पण अलीबहादर बुंदी, कोटा, जयनगर, कुंभेरी, भरतपूर हयामार्गे ता.8.11.1788 रोजी मथुरेला पोहचून त्यांनी महादजी शिंद्याची भेट घेतली.[64] तुकोजी होळकर ता. 30 जुलै 1789 रोजी मथुरेला पोहचले. ता.31 जुलै 1789 रोजी तुकोजी महादजींची भेट घेतली.[65] त्या रात्री दोघांनी जन्माष्टमीची रासक्रिडा सोबतच पाहिली. मेजवाण्या झडल्या. तोफखाने सुरु झाले. महादजींनी मातोश्री अहिल्याबाईना पत्र लिहिले. ' ' ज्याप्रमाणे सुभेदार आपणास त्याप्रमाणे मजला जाणावे. मागे जी गोष्ट झाली ती पुढे उभयपक्षी एक विचारे चालावे '[66]

11) गोसावी प्रकरणावरुन मतभेद आणि तुकोजींची शिष्टाई -

तुकोजी होळकर अलीबहादर व महादजीत परस्पर मदतीची शपथ घेतली होती.[67] तुकोजी आणि अलीबहादर जरी महादजींच्या मदतीकरीता उत्तरेत आले होते तरी त्यांनी महादजींच्या मार्गदर्शनाखाली कामनकरावे अशी नाना फडणीसांची आतुन फुस होती. कारण महादजी उत्तरेत डोईजड होवून स्वतंत्र राज्य निर्माण करेल ही भिती नानांना एकसारखी भेडसावीत होती. तुकोजी अलीबहाद आले. महादजींच्या मदतीकरिता आणि वागणार मात्र नानांच्या आदेशानुसार त्यामुळे ह्यांच्यातील संबंध बिघडले. ह्यातच गोसावी प्रकरण उद्‌भवल्यामुळे त्यांना हस्तक्षेपाची संधी मिळाली.

---

62) शि.रु.भा.1 लें.125 पा.55

63) अप्रकाशित मे.स.डे.कॉ.क्र.82 का.3 पत्र क्र.93 (पूणे)

64) दि.म.रा.भा.1 ले.347 पा. 283ले.543 पा.759
म.शि.का.ले.539 पा.751 लें.543 पा.759

65) ठाकूर वा.वा. हो.इ. भा.2 पा.332
' मराठी दप्तर कमाल ' भा.3 ले.84 पा.94
ठाकूर वा.वा.हो.इ.सा.भा.2 ले.238
म.शि.का.ले.558 पा.784 लं.560 पा.769

66) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.333.

67) शि.रा. भा.1 ले.143 पा.68 ले.215 पा.102

तुकोजी, महादजी व अलीबहादर हयांच्यात तणाव निर्माण झाला असतांनाच जुलै 1789 मध्ये महादजी आजारी पडले.[68] चौकशीत नागरीण बायको (तुकाबाई) वृंदावनामध्ये महादजींच्या नाशाकरिता प्रयोग करीत असल्याने आढळले. हया प्रकारात गोसावी बंधूचा हात असल्याचे तीने कबूल केले.[69] अलीबहादराने महादजीना हया प्रकरणी निरोप पाठविला की ' अन्याय लागू झाल्यास पारपत्य लौकर करावे, दोष नसल्यास उगेच वैर पाडू नये '.[70] हिम्मतबहादर गोसाव्याला पकडून महादजीकडे नेत असतांना त्याने पळून अलीबहादराच्या डे-यातील जरीपटक्याखाली आश्रय घेतला.[71] आता अलीबहादराने हिंमतबहादर गोसाव्यास देण्यास नकार दिला.[72] कारभारी भिकाजीपंत पाळंदे बोलले. ' हिंमतबहादरास द्यावयाचा नाही. अलीबहादर यांचेपायी जे होणे असेल ते होवो '.[73] हे प्रकरण तुकोजी होळकरांकडे गेले त्यांनी उत्तर दिले ' मुल खरे धन्याचे, यद्यपी अमार्ग ही असल्यास त्याची अमर्यादा करणे. आपल्यास ही गोष्ट तर मार्गाची दिसते तेंव्हा याचा विचार होऊन व्हावे हे उचित '.[74] तुकोजी होळकरांनी पेशव्यांच्या प्रतिष्ठेकरिता अलीबहादरांना मदत करुन त्यांच्या ताबेदारीत राहण्याची आज्ञा नाना फडणीसांनी तुकोजींना केली.[75] हयामुळे अलीबहादराच्या आज्ञेनुसार तुकाजींचे सैन्य हिंमतबहादराच्या रक्षणास सज्ज होते.[76] हया सर्वास नाना फडणीसांचा पाठिंबा होता.[77] अलीबहादराचा पक्ष घेवून नाना कळवितात ' गोसावी दिल्याने ठिक नव्हे सरकार फौज गेल्यांचा नक्ष राहिला पाहिजे '.[78] अशाप्रकारे हया प्रकरणात नाना फडणीस सतत प्रोत्साहन देत राहिल्यामुळेच हे प्रकरण एवढे विकोपास गेले की हयांच्यात यादवी होते की काय अशी संभावना निर्माण झाली.

---

68) म.शि.का. ले.56। पा.793.
69) म.रि.उ वि.भा.2 पा.188.
70) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.। ले.23 पा.36-37.
    ठाकूर वा.वा.हो.इ.भा.। पा.333.
71) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.। पा.333.
72) अप्रकाशित गोरे दप्तर लं.590 फ.72 (सितामऊ)
73) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.। पा.333.
74)
75) शि.रा.भा.। लं.215 पा.106-107
    पु.रे.कॉ.भा.। ले.252 पा.347 लं.253 पा.342
76) जोशी/सरकार भा.2 पा.23
77) भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.। ले.25 पा.40
78) ' मराठी दप्तर कमाल ' भा.3 लं.87 पा.97.

तुकोजी होळकरांनी महादजी अलीबहादर हयांच्यात समेट घडवून आणण्याचे पुन्हा प्रयत्न केले. गोसावी प्रकरण संपविण्याचा तुकोजी होळकरांचा प्रयत्न सतत सुरु होता.[79] शेवटी तुकोजींच्याच मध्यस्थीने ता.6.2.1790 रोजी ब-याच दिवसापासून चिघळणा-या गोसावी प्रकरणाचा शेवट झाला. त्याच दिवशी महादजी अलीबहादराच्या छावणीत जाऊन त्यांनी गोसाव्यास वस्त्रे देवून सर्व गुन्हे माफ केले, आणि त्यांच्या वरचा पहारा उठविण्याची आज्ञा दिली.[80] अशाप्रकारे तुकोजीच्या सततच्या प्रयत्नाने गोसावी प्रकरणाचा एकदाचा शेवट लागला पण नाना फडणीसांनी मात्र हयाबाबत नाराजी व्यक्त केल्याचे दिसून येते.[81] तुकोजींनी महादजींना कोणत्याही प्रकारचे सहकार्य करु नये, म्हणून अलीबहादर तुकाजींचे कान भरतात. हयासर्व कटकटीचे मुळ नाना असण्याची खात्री महादजीना झाली. कारण नानांच्या पाठिंब्याशिवाय तुकोजी आणि अलीबहादर इतका उघड विरोध करण्याची हिंमत करणार नाही असे त्यांना वाटते.[82] मराठा सरदारांच्या हया अंतस्थ कलहाचा उत्तरेतील राजकारणावर विपरीत परिणाम झाला. नाना फडणीसांनी सुरुवातीलाच हिंमत बहादराला पुण्यात कैदेत ठेवले असते तर महादजी अलीबहादर तुकोजी मध्ये वितुष्ट आले नसते. उत्तरेतील शत्रुवर दाब धरुन बुंदेलखंडातील मराठयांची सत्ताही इ.स.1803 मध्ये नष्ट झाली नसती.[83]

12) राजपुताण्याच्या मसलतीवरुन मतभेद -

तुकोजी होळकर आणि अलीबहादर महादजींच्या मदतीला आले होते. पण पुण्यावरुन आदेश येईपर्यंत काहीच करायला तयार नव्हते.[84] परिणामी राजपुतांनी महादजींना

---

79) अप्रकाशित पारसनिस ट्रान्सक्रीष्ट खं.8 पा.221 (पुणे)
80) अप्रकाशित पारसनिस ट्रान्सक्रीष्ट खं.8 पा.2658 (पुणे)
81) ' मराठी दप्तर कमाल ' भा.3 ले.132 पा.138 ले.138 पा.143 ले.139 पा.143
82) म.शि.का. ले.543 पा.759
83) डॉं अंधारे, भा.रा.पा.97
84) शि.रा.भा.1 ले.159 पा.75

महादजींना महत्व देणे कमी केले. पुण्यावरुन अलीबहादराचा पाठपुरावा सुरु झाल्याने उत्तरेतील लोकांना अलीबहादर करील ती पूर्व असे वाटू लागले. पुण्याशी संधान बांधुन तुकोजी आणि अलीबहादराला हाताशी धरुन महादजींना शह देण्याचा प्रयत्न सुरु केला. कृष्णाजी जगन्नाथ लिहितो ' जैपुरवाल्याशी व राजे बिजेसिंगाशी आतुन स्नेह झाला आहे '[85] तसेच खंडणीबाबत राजपुतांचे म्हणणे की, ' होळकरही खंडणी मागतात व तुम्हीही मागता तेंव्हा आधी खंडणी कोणास दयावी त्याचा आपसात निर्णय ठरवा म्हणजे ऐवज पावता करु '[86] होळकरांचा मासा गळाला लावून राजपूतांनी त्यांना मदतीचे आश्वासन दिले. ' मारवाडी व जयपूरवाल्यांशी त्यांचे वचन पक्के झाले की, आम्ही सारे एकत्र होवून होळकरास हिंदूस्थानचे मालक बनविले. तुम्ही आणि आम्ही मिळून शिंद्यास काढून देवू '[87] कृष्णाजी जगन्नाथ परत लिहितात ' अलिबहादूरास मुख्तीयार करुन सुभेदारास आपल्या संमतात घेवून राजश्री पाटीलबावांशी लढवावे. आपण दुरुन तमाशा पाहावा '[88] नानानेही महादजींशी संपर्क न करताच लक्ष्मण संभाजी हयाला परस्पर बिजेसिंगाकडे पाठविले.[89]

उत्तरभारताच्या प्रतिनिधीच्या प्रश्नावरुन तुकोजी महादजी हयांच्यात तेढ निर्माण झाली. हयाचा फायदा घेवून तुकोजींशी संपर्क साधुन विजयसिंगाने त्यांना महादजी विरुध्द भडकाविण्याचा प्रयत्न केला.[90] इतकेच नाही तर महादजींना उत्तर भारतातून घालवून देण्याविषयीही लिहिले.[91] शेवटी तुकोजी, महादजीमध्ये वैयक्तिक कितीही मतभेद असले तरी त्यांच्या समोरही मराठेशाहीचे हितच सर्वतोपरी होते. शिवाय विजयसिंगाने अजमेर मराठयाकडून जिंकून घेतल्यानेही तुकोजी नाराज होते.[92] हयामुळे ही तुकोजींनी विजयसिंगाच्या प्रस्तावाकडे अजिबात लक्ष दिले नाही.[93]

---

85) राजाध्यक्ष न.व्यं.जीवबादादा केरकर यांचे चरित्र पा.191
' इतिहास संग्रह ' जोतपूर पा.41
86) म.रि.उ वि.भा.2 पा.163.
87) म.शि.का. ले.546 पा.765.
88) ' इतिहास संग्रह ' जोतपूर पा.122.
89) ' इतिहास संग्रह ' ऐ.हि.भा.3 ले.25.
90) म.शि.का.ले.545 पा.763 ले.546 पा.765
म.द.बा.भा.2 ले.171 पा.139
' इतिहास संग्रह ' जोधपूर ले.5
91) अप्रकाशित अरजी बही नं.4 पा.6 ता.7 जानेवारी 1788 चे तुकोजी होळकरांना विजयसिंगचे पत्र (जोधपुर रिकॉर्ड बिकानेर)
92) ' इतिहास संग्रह ' जोधपूर ले.7
93) डॉ. शिवदत्त दान बरहट ' जोधपूर राज्य का इतिहास ' पा.106

तुकोजींनी जयपूर राज्यातील रामपुरा येथे आपली छावणी मे 1789 मध्ये केली होती.[94] जयपूरचा राजा सवाई प्रतापसिंगाने मुनशी वासुदेव गोविंदाला सलोख्याची बोलणी करण्यास तुकोजीकडे पाठविले ' तुमच्या वडिलांनी माझया वडिलास जयपूरच्या गादीवर बसविले होते. त्या प्रमाणेच माझी बाजु घेवून आपण पाटीलबावांशी माझा समेट करुन द्यावा अशी विनंती केली.[95] खंडणीचा प्रश्न महादजीसोबत संपर्क साधुनच सोडविला जाईल असे स्पष्ट तुकोजींनी त्याला सुनावले.

### 13) पाटण व मेडत्यांच्या युध्दात होळकरांची कामगिरी -

तुकोजी-महादजीमध्ये वितुष्ट निर्माण झाल्याने या संधीचा फायदा घेवून जयपूर आणि जोधपूर हया दोन्ही संस्थानांनी मराठयांना खंडणी देण्याचे टाळले.[96] ही बिकट परिस्थिती ओळखुन महादजींनी तुकोजी व अलीबहादुरासोबत मिळते घेतले. मराठा सैन्यांची विभागणी दोन दिशास केली. मराठी फौजेचा अधिकारी बापू होळकराने शत्रुची रसद तोडुन दोन लढाया केल्या.[97] एका बाजुस बापू होळकर दुस-या बाजुस अंबुजी इंगळे आणि मागे पेंढारी असा तीनही बाजूंनी हल्ला केला. पाटणच्या लढाईत मराठे विजयी झाले.[98]

हयानंतर मराठा सैन्यांचा मोर्चा जयपूराकडे वळला. हे संस्थान मुख्यत: होळकरांचे पण शिंदेचा प्रभाव जास्त होता.[99] 15 ऑगस्ट 1790 मध्ये शिंदेच्या सैन्याने अजमेरच्या किल्ल्यास वेढा दिल्याने [100] शिंदेनी अजमेरची कामगिरी स्वत: घेवून होळकरास

---

94) दि.म.रा.भा.2 ले.33 पा.29
95) ' इतिहास संग्रह ' जोधपूर ले.12 जोशी/सरकार 'पर्शियन रेकॉर्डस ऑफ हिस्ट्री ' भा.2 पा.25-26.
96) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.1 पा.342
97) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.1 पा.342
98) म.शि.का.ले.574 पा.813 ले.575 पा.816 ले.576 पा.819
पु.रे.कॉ.भा.1 ले.260 पा.366
' हिस्ट्री ऑफ जयपूर ' पा.428-433
99) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.342-343.
100)म.शि.का.ले.579 पा.828
पु.रे.कॉ.भा.1 ले.274 पा.380
वि.म.रा.भा.2 ले.37 पा.33
' मराठी दप्तर रुमाल ' भा.3 ले.165 पा.172

मेडल्यावर पाठविले.[101] मेडल्याच्या निर्णायक युध्दात होळकरांच्या कामगिरीमुळे पराक्रमामुळेच मराठे विजयी झाले हे नाकारता येत नाही. हया विजयाचे श्रेय होळकरांनाच द्यावे लागेल. डी. बॉयननेही महादजींना स्पष्ट कळविले ' तुमचे फौजेकडून काही एक झाले नाही. होळकराकडील सरंजाम नसता तर करोडो रुपयांचा कारखाना बरबाद होवून बदनक्षा मुलुखभर होता.[102] पाटणचे युध्द 20 जुन 1790 व मेडल्याचे युध्द ता.10 सप्टेबर 1790 रोजी होवून रजपूतांचा पूर्ण पराभव झाला. होळकरांच्या हातात पडलेल्या तोफांचीही मागणी गोपाळराव व रघुनाथरावांनी होळकराकडे केली.[103] त्यामुळे त्यांचे नाराज होणे स्वाभाविक होते. या दोन्ही युध्दानंतर शिंद्याप्रमाणे होळकरांचा काहीही लाभ झाला नाही. जोधपूर पूर्वीप्रमाणे शिंद्याच्या ताब्यात आले. जयपूर आणि उदयपूर ही संस्थाने पूर्वापार होळकरांचीच होती. पण युध्दानंतर मात्र ती आता शिंद्याची अंकित झाली होती. त्यामुळे साहजिकच तुकोजी होळकर दुखावल्या गेले. या युध्दात होळकरांनी शिकस्त केली. अलीबहादर खपले तरीपण शिंदे एकमेवाद्वितीय झाले. होळकरांची मेहनत मात्र वाया गेली, आणि हयाच कारणामुळे तुकोजींनी शिंद्याच्या छावणीतून बापूराव होळकर, काशीराव होळकरांसह आपल्या सर्व सैन्याला परत बोलावून शिंद्यांच्या छावणी पासून चार कोसावर आपली छावणी केली. होळकर शिंद्याच्या सबंधातील तणाव वाढतच गेला आणि अखेर लाखेरी येथे त्याचा विस्फोट झाला.

### 14) वाटणी सबंधीचा वाद -

एक वर्ष राजपुताण्यात राहिल्यानंतर ता.31 जुलै 1789 रोजी तुकोजी महादजींची भेट मथुरा येथे झाली.[104] हया भेटीत तुकोजींनी महादजींना जिंकलेल्या केलेल्या प्रदेशाचा आणि लुटीचा

---

101) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.2 पा.343
102) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.2 पा.343.
म.रि.उ वि. पा. 174
103) ' चंद्रचुड दप्तर ' ले.189 ले.172 पा.172
104) ठाकूर वा.वा. हो.इ.भा.2 पा.332

अर्ध्या हिस्सा मागितला.[105] यावर महादजींनी आतापर्यंत झालेल्या खर्चाची वाटणी करण्याची अट घातली.[106] हयावर तुकोजी म्हणालेत ' तुमचा आमचा भाऊपणा, एक भाऊ घरी असतो, एक कमाई करतो, परंतु वाटयास उभयता बरोबर ' 107 तुकोजींवर हा तर्कवाद युक्तिसंगत नसल्याचा आरोप केल्या जातो. पण तुकोजीचा हा तर्क अगदी बरोबर होता. कारण होळकर शिंदेची जोडी अगदी सुरुवातीपासूनच म्हणजे त्याच्या उदयापासूनच एकत्र कार्य करीत होती.[108] शिवाय थोरल्या बाजीराव पेशव्यांनी त्यांना (हो.शि.) माळव्याची सनद मिळूनच दिली होती.[109] ता.22 नोव्हेंबर 1731 रोजी मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंद्यांच्या नांवे संयुक्त सरंजाम दिल्याने ते उत्तरेकडील पेशव्यांच्या राजवटीचे पहिले मोठे सरंजामदार ठरले.[110]

होळकर - शिंदेमधे वाटणीचा प्रकार सुरवातीपासून खालील प्रकारे चालत आला होता. इ.स. 1751-52 मधे चौथाई सरकार व तीन हिस्से उभयता सरदारापैकी दीड हिस्सा होळकर व दीड हिस्सा शिंदे इ.स. 1755-56 मधे एक हिस्सा सरकार, एक हिस्सा होळकर व एक हिस्सा शिंदे इ.स. 1764-65 मधे सरकार सतरा लक्ष, होळकर पाच लक्ष, शिंदे तिन लक्ष तर इ.स. 1769 मधे 25 चौथाई सरकार, 75 तीन हिस्से सरदार, रु. 37.8.0 होळकर व 37.8.0 शिंदे एकूण 35 कुल रुपये 100 चे हिस्से रसीप्रमाणे[111] हयाप्रमाणे वाटणी होत होती.

---

105) सरकार, फॉल, भा-4 फ.9
106) म.न.इ. भा-3 पा. 171
107) म.द.बा. भा-2 ले. 207 पा. 174
म.रि. उ वि. भा-2 पा. 186
108) डॉ. राम इंगळे पा.87
109) पे.द.खं.30 ले. 318
110) डॉ. राम इंगळे पा.4
111) ठाकुर वा.वा. हो. इ. भा-1 पा. 324, 325
पेशवे रेकॉर्ड पैकी.

अहिल्याबाईकडे महादजींनी मदत मागितली त्यावेळी त्यांनी ' भाऊपणापूर्वीपासून कसा चालत आला ? पेंढारी हजार स्वार बोलाविले हे काय ? फौज दहा पाच हजार म्हणाल तर पाठवुन देऊ. पूर्वीप्रमाणे थथाविभाग चालावे.[112] यथाविभाग म्हणजे वर जो वाटणीचा प्रकार सांगितला आहे तसा होता. महादजी शिंदेनी मात्र याचा खुलासा हेतूपुरस्पर टाळला. ' झासी घेतल्यानंतर वाटणीचा प्रकार पाडिला तेव्हा सुभेदारांनी तोफखान्याचा खर्च वजा घालुन बाकी राहिल्याची वाटणी मात्र आम्हास दिली.' [113] असे महादजी शिंदेनी म्हटले. पुण्यावरुन नाना फडणीसही तुकोजींना मदत देत होते.[114]

नवीन सुटलेल्या प्रदेशात उभयता सरदार व पेशवे सरकार अशा तीन वाटण्या होत असत. त्याप्रमाणे इस्माइल बेग, नजबकुलीखान व गुलाम कादर हयांच्या मुलुखाच्या वाटणीत जो मुलुख शिंदेंनी तुकोजींना दिला त्याबाबत तुकोजीनी मातोश्री बाईसाहेबास कळविले की, ' महादजी शिंदेंनी 9 लक्ष 21 हजार रुपये उत्पन्नाचा प्रदेश तुकोजींना देण्याचे मान्य केले. पैकी 2 लक्ष 10 हजाराच्या गढमुक्तेश्वर व हघाड महालांच्या सनदा करुन दिल्या पण हया सनदात सायर व इनामी गाव वजा करुन पाठविले. म्हणुन आम्हीं त्यांना म्हटले की आमच्या महालात दुस-याचा अंमल कसा चालेल ? सायर व इनामी गावासहीत दुस-याचा अंमल कसा चालेले ? सायर व इनामी गावासहीत महाल लावून द्यावेत नाही तर सनदा नकोत. असे सांगुन सनदा परत पाठविल्या. त्या महादजीनी ठेवून घेतल्या.[115] यावर अहिल्याबाईचे उत्तर की, ' आधीच वाटणी वाजवीचे रुईने केली नाही. त्यामध्येही मामलतीत दुसरा अंमल राहुन नित्य उठुन कज्जाच राहिल. त्यास निस्तुक महाल लावून घेणे ' हया उत्तराने महादजी जे रुसलेत ते सनदा त्यांच्याकडेच राहील्या.[116] आणि नऊ लाखाची निघालेली वाणी मात्र हवेतच विरली.

---

112) ठाकुर वा.वा. हो.इ. भा-2 पा. 324
113) म.शि.का. ले. 578 पा. 794
114) भागवत अ.ना. हो. इ. सा. भा-1 ले. 28 पा. 45
ठाकुर वा.वा. हो. इ. सा. भा-1 ले. 298
115) ठाकुर वा.वा. हो.इ. भा-2 पा. 336
116) ठाकुर वा.वा. हो. इ. भा-2 पा. 336 - 337

वरील स्पष्टीकरणावरुन असे दिसून येते की, जिंकलेल्या प्रदेशात होळकरांना वाटा पूर्वापार मिळत आला होता आणि त्यालाच अनुसरुन तुकोजींनी महादजीकडे वाटणीची मागणी केली होती. ती त्यांची मागणी अयोग्य होती असे वरील विवेचनावरुन म्हणता येणार नाही. अहिल्याबाईनी महादजींना ' यथाविभाग चालावे ' हयातील खोच लक्षात आणून देऊनही महादजींनी मात्र हेतूपुरस्पर याचा खुलासा केला नाही. तुकोजी होळकर राजकारणाच्या सारीपाटावर उलटसुलट डाव टाकण्यास कमी पडलेत त्यातच कारभाराची सर्वसुत्रे मातोश्री अहिल्याबाईच्या हातात होती. त्यामुळे तुकोजीराव अहिल्याबाई कडून बांधल्या गेले. आणि दुहेरी व्यवस्थेमुळेही तुकोजीरावचे तेच चमकु शकले नाही.

**15) तुकोजी-महादजीमध्ये मतभेद कां निर्माण झाले -**

तुकोजी आणि महादजी हयांचा कालखंड सरदारी मिळाल्यापासून इ.स. 1766 ते 1794 पर्यंत म्हणजे महादजींच्या मृत्युपर्यंत प्रदीर्घ होता. हया 28 वर्षाच्या प्रदीर्घ काळात प्रथम इ.स. 1769 ते 1772 आणि नंतर इ.स. 1789 ते 1794 पर्यंत म्हणजे केवळ 8 वर्षाच त्यांच्यात मतभेद होते. परंतु हया मतभेदाचा दुहीचा बोलबाला मात्र जास्त झाला. शिंदे होळकरांच्या मतभेदामुळे मराठाशाहीचा फायदा झाला असे म्हणण्याचे धाडस कुणीही करणार नाही पण हया वेळी सर्वत्र दूही नांदत असतांना इतरांना सोडून केवळ एकालाच धारेवर धरणेही योग्य होणार नाही.

इतिहासाचार्य राजवाडे याबाबत लिहितात, ' पेशव्यांची सत्ता वाढून आपली सत्ता संपुष्टात येत आहे व शिंदे हया संपुष्टी करणाला मदत करीत आहे. हया भितीपोटी मल्हाररावच्या मनात व्दैतभाव निर्माण झाला'.[117] सर जदूनाथ सरकार म्हणतात, ' शिंदे

---

117) राजवाडे वि.का. ऐतिहासिक प्रस्तावना पा. 52

होळकरांच्या घरात भूमी व भूमी कराबाबत इर्षापूर्ण विवाद होते.' [118] ग्रँट उफ लिहीतो, ' ' शिंदे होळकरात परस्पर इर्षा व व्देशाची भावना आतापर्यंत लपली होती. तिचा उद्रेक होऊन त्यांनी खुले युध्द सुरुकेले.' [119] तर सरदेसाईचे म्हणणे ' शिंदे-होळकरांच्या वैरामुळे मराठेशाहीचे नुकसान झाले. पानिपतचे संकट त्यामुळे उद्‌भवले आणि याच तेढीने शेवटी मराठेशाहीचा अंत झाला.' [120]

होळकर-शिंदे मतभेदाचा पुकारा इतिहासकार इतका जास्त करतात त्याअर्थी एक गोष्ट नक्कीच खरी की होळकर-शिंद्याच्या तोडीची जबरदस्त पराक्रमी आणि दिर्घकाळ टिकलेली जोडी संपूर्ण पेशवाईत दुसरी कोणतीच झाली नसावी. [121]

तुकोजी आणि महादजींमधे सर्वप्रथम नजीबखान आणि झाबेताखाना वरुन इ.स.1769 ते 1772 हया काळात मतभेद निर्माण झाले. शिंदे व नजीबखानातील तेढ ता. 4 मार्च 1789 रोजी गुलामकादरला ठार मारल्यानंतरच संपली. मराठयांचे राजकीय सुत्र शत्रुवर नियंत्रण ठेवुन चौथाई वसूल करण्याचे होते. शत्रुपेक्षा आपली साधने अपूरी असूनही आपणच त्यांच्यापेक्षा श्रेष्ठ आहोत हे दाखविण्यातच मराठयांनी धन्यता मानली. होळकरांनी थोरल्या बाजीरावाप्रमाणे मवाळ मार्ग स्वीकारल. तर शिंदे चिमाजी आप्पाप्रमाणे जहाल मतांचे खंदे पुरस्कर्ते होते. याबाबतीत सरदेसाई म्हणातात, ' होळकराची भिस्त सलुखाच्या बोलचालींवर व गनीमी काव्यावर होती तर शिंदेचा स्वभाव शत्रुवर समोर घाव घालण्याचा होता. [122] वासुदेव शास्त्री होळकरांच्या धोरणाचे समर्थन करतात. [123] थोरल्या माधवराव पेशव्यांच्या मृत्युसोबतच

---

118) सरकार, फॉल भा.4 पा. 79
119) ग्रँट डक भा-2 पा. 180
120) म.रि.उ वि. भा.1 पा. 94
121) सरदेसाई, नानासाहेब पेशव्यांचे चरित्र पा. 85
122) म.रि. म.वि. भा-3 पा. 127
123) नाना फडणीसांचे चरित्र पा. 140

त्यांच्यातील मतभेद संपले. शिंदे-होळकरातील मतभेद संपले पण माधवरावाच्या मृत्युनंतर मात्र खुद्द पेशव्यांच्या घरातच पेशवे पदाकरिता गृह युध्दाचा भडका उडाला. इ.स. 1788 पर्यंत त्यांच्यात मतभेद नव्हते.

हयानंतर तुकोजी-महादजीमधे इ.स. 1789 मधे मतभेदाला पुन्हा सुरवात झाली. महादजींची स्थिती डी. बायनच्या प्रशिक्षित पाश्चात्य फौजेमूळे आणि आग्राच्या तोफा बंदूका व दारुगोळयाच्या कारखान्यामुळे मजबुत झाली होती. द्रव्यबळ, मनुष्यबळ आणि बुध्दीबळानेही ते प्रबळ होते. महादजींच्या उत्कर्षामूळे नानांच्या मनात इर्षा व होळकरांच्या मनात मत्सर निर्माण झाला.[124] उत्तरेतील राजकारणाच्या वर्चस्वावरुन हयांच्यात परत मतभेद निर्माण झाले. आणि नाना फडणीसांनी स्वतःच्या स्वार्थाकरिता याला खतपाणी घातले. नाना फडणीसांनी महादजींवर नियंत्रण ठेवण्यासाठी तुकोजींना हाताशी धरले. वासुदेवशास्त्री खरे लिहितात. ' दोघांपैकी कोणातरी एकास नेहमी आपले लगामी लावून ठेवावे. याप्रमाणे मसलत योजून तिच्याच अनुरोधाने नाना आमरणात वागत गेले.[125] तुकोजींचा उपयोग स्वतःचे पद सत्ता टिकविण्यासाठी नियंत्रण व संतुलनाकरिता नानांनी केला. शिंदे-हौळकर युतीचे महत्व अहिल्याबाईना कळले ते नानाला कळले नसेल असे म्हणता येणार नाही पण केवळ स्वतःच्या स्वार्थासाठी नानांनी त्यांच्यातील मतभेद कायम ठेवलेत. हया मतभेदाचा परमोच्च बिंदु म्हणजे ता. 1 जुन 1793 रोजी झालेला लाखेरीचा संग्राम होय. हा संग्राम कारस्थानपटू नाना फडणीसांनी आपले पद व सत्ता कायम ठेवण्यासाठी योजलेल्या मसलतीचा दृश्य परिणाम होता. 12 फेब्रुवारी 1794 रोजी महादजींचा मृत्यु होताच मतभेद संपलेत. दौलतरावाच्या वारसदारीला सर्वप्रथम मान्यता देणारे तुकोजीरावच होते.

---

124) सरकार, फॉल भा-4 पा. 76
125) नाना फडणवीसांचे चरित्र पा. 49, 137

शिंदे होळकरात मतभेद असले तरी रघुनाथरावाच्या रागापासून मल्हाररावानेच महादजींचा बचाव केला. महादजींनी अहिल्याबाईचा बचाव केला. तर दौलतरावांच्या वारसदारीला सर्वप्रथम मान्यता तुकोजींनीच दिली. दोन्ही दौलतीचा भाऊपणा ते विसरले नाहीत आणि म्हणुन त्यांची गत दाभाडे, भोसले, आंग्रे, गायकवाडाप्रमाणे झाली नाही. आपसात भांडले तरी परक्याचा प्रवेश मात्र त्यांनी होऊ दिला नाही एवढा विवेक त्यांना शेवटपर्यंत नक्कीच होता.

शिंदे होळकरात काही काळ मतभेद असले तरी लाखेरीचा प्रसंग सोडून त्यांनी खुला संघर्ष केला नाही. राष्ट्रव्यापी संकटाच्या वेळी मतभेद विसरुन ते मराठे शाहीसाठी झटले. शेवटचा संघर्ष इंग्रजासोबतच करावा लागणार हे ओळखून महादजींनी सर्वप्रथम पाश्चात्य लष्करी पध्दतीचा अंगीकार केला. तुकोजींनी त्यांचे अनुकरण केले पुढे त्यांनी परस्परांचे खुन पाडले नाहीत. शत्रुची मदत घेतली नाही. शत्रुला मिळुन मराठे शाहीवर आघात केला नाही. सरदारात गट पाडून मराठा संघ फोडला नाही आणि मराठेशाही गहाणही टाकली नाही. एकनिष्ठतेच्या बाबतीत ते संताजी घोरपडेंचे वारसदार होते. मराठेशाहीच्या रक्षणासाठी अश्नरशः त्यांनी जीवाचे रान केले. उत्तरेच्या राजकारणाची धुरा शेवटपर्यंत त्यांनी समर्थपणे आपल्या खांद्यावर पेलली. कठोर टिकाकारालाही त्यांचे हे गुणवैशिष्टय नाकारता येणार नाही.

*****

# प्रकरण - 6 वे

## तुकोजी होळकर आणि राजस्थान

1) लालसोटच्या युध्दात माघार
2) तुकोजी होळकरांचे उत्तरेकडे महादजी शिंदिच्या मदतीस प्रयाण
3) तुकोजी होळकर राजस्थानात
4) राजपुताण्यातील राजकारण
5) तुकोजी - महादजी भेट - दि. 31 जुलै 1789
6) नारो गणेश रांझेकर प्रकरण
7) पाटणच्या युध्दाकडे वाटचाल
8) पाटणचे युध्द - दि 20 जुन 1790 बापु होळकरांचा पराक्रम
9) काशीराव होळकर कामगिरी
10) मेडल्याचे युध्द व तुकोजी होळकर - दि. 10 सप्टेंबर 1790
11) सैन्यरचना
12) रोडुखवासाचे प्रकरण - तुकोजी होळकर
13) तुकोजीचे राजपुतान्यातील अन्य विजय
14) गोपाळरावांची आगळीक
15) बनासाचा छापा - 8 ऑक्टोबर 1792
16) लाखेरीच्या युध्दाकडे वाटचाल
17) अहिल्याबाईकडून तुकोजी होळकरास सैनिक मदत
18) संतप्त होळकर
19) मल्हारराव होळकरांचा अभिमान
20) लाखेरीचे युध्द - दि. 1 जुन 1793
21) होळकरांच्या चुका
22) युध्दाचे परिणाम

23) लाखेरीच्या युध्दाची कारणे - वैमनस्याची सुरवात
24) महादजी उत्तरेत
25) अहिल्याबाईकडे महादजींची मदतीची याचना
26) तुकोजीचे उत्तरेत आगमन
27) तुकोजी-महादजी मधे तेद
28) तुकोजी राजपुतान्यात
29) तुकोजी आणि राजपुतांची नीती
30) तुकोजींची वाटणीची मागणी
31) तुकोजींचे सहकार्य
32) महादजी शिंदेच्या चुका
33) महादजी दक्षिणेत परत
34) पेशव्यांचे धोरण
35) अहिल्याबाईना संघर्ष पाहिजे होता काय ?
36) संघर्ष तुकोजींना पाहिजे होता ?
37) संघर्षाचे मुळ कोणते ?
38) तुकोजीराव नाना फडणीसांच्या कलाने कां वागले ?
39) तुकोजीराव उत्तरेतुन परत -
40) नवीन मोहिमेवर होळकरांची नियुक्ती
41) तुकोजींची शेवटची कामगिरी - खडर्याचे युध्द
42) सवाई माधवरावांचा मृत्यु
43) तुकोजींचा मृत्यु - ता. 15/8/1797

*****

## प्रकरण - 6 वे

## तुकोजी होळकर आणि राजस्थान

### 1) लालसोटच्या युध्दात माघार -

दि. 28 जुलै 1787 रोजी लालसोट या ठिकाणी महादजी शिंदेंना माघार घ्यावी लागली. हया माघारीमूळे लालसोटवरील दुसरे पानिपत होण्याची वेळ आली होती. महादजी शिंदेच्या लालसोटवरील हया माघारीमुळे मराठयांच्या शत्रुंना फावले आणि मराठयांची सत्ता दिल्लीतून समुळ नष्ट करण्याचे प्रयत्न गुलाम कादर याने सुरु केले. गुलाम कादरने गवसगडापासून गढमुक्तेश्वर पर्यतच्या प्रदेशावर आपली सत्ता स्थापुन दिल्लीकडे मोर्चा वळविला.[1] लाडोजी देशमुख आणि शहानिजामुद्दीन हयांनी त्याच्या प्रतिकाराचा प्रयत्न केला पण त्यांचा टिकाव न लागल्याने दि. 24 ऑगस्ट 1787 रोजी त्यांनी दिल्लीतून पळ काढला. गुलामकादरने असहाय्य बादशहा कडून दि. 5 सप्टेंबर 1787 रोजी मिरबक्षी हे पद प्राप्त केले.[2] हयानंतर इस्माइल बेगने आग्र-यावर 16 सप्टेंबर 1787 मधे अधिकार मिळवुन किल्ल्याला वेढ दिला. परंतु महादजी शिंद्यांचे सरदार लखबादा बक्षी आणि रायजी पाटलांनी इस्माइल बेगचा प्रतिकार मोठया धैर्याने केला पण त्यांचा पराभव झाला.[3] उत्तरेच्या राजकारणात मराठयांच्या झालेल्या पिछेहाटीमूळे महादजी शिंदेनी पुण्यास नाना फडणीसांना पत्र पाठवुन त्वरीत सैन्याची व रकमेची मागणी केली.[4]

---

1) अप्रकाशित फॉरीन सिक्रेट डिपार्टमेंट दि. 17 सप्टेंबर 1787 नं. 32 (दिल्ली)

2) दि.म.रा. ले. 228 फ. 195-96 ले. 230 पा. 198-200
पु.रे. फॉ. भा-1 ले. 166 पा. 243. ले. 174 पा. 256

3) अप्रकाशित फॉरीन सिक्रेट डिपार्टमेंट दि. 20 ऑक्टोबर 1787 नं.33 (दिल्ली)

4) म.शि.का. ले. 505 पा. 699 ले. 507 पा. 701 ले. 508 पा. 701
ले. 509 पा. 702
पु.रे. फॉ. भा-1 ले. 303 पा. 284 ल. 204 पा. 287
शि. रा. भा-1 ले. 126 पा. 56

2) तुकोजी होळकरांचे उत्तरेकडे महादजी शिंदिच्या मदतीस प्रयाण -

महादजी शिंदेची ही पत्रे पुण्यात नाना फडणीसांना ऑगष्ट 1787 मधे मिळाली.[5] नाना फडणीसांनी महादजी शिंदेच्या मदतीकरीता सुभेदार तुकोजी होळकर आणि अलीबहादर यांना पाच लक्ष रुपये आणि सैन्यासह उत्तरेकडे पाठविले.[6] प्रथम अली बहादराला दि. 8 सप्टेंबर 1788 रोजी नाना फडणीसांनी महादजी शिंदेच्या मदतीस उत्तरेकडे रवाना केले.[7] तुकोजी होळकर वाफगावावरुन फेब्रुवारी 1788 ला निघुन दि. 20 एप्रिल 1788 रोजी महेश्वरास येऊन दाखल झाले.[8] येथेच तुकोजीरावांची आणि अलीबहादरांची एकमेकासोबत भेट झाली.[9] मातोश्री अहिल्याबाईंनी त्या उभयतांना मेजवानी देऊन मान वस्त्रे दिली.[10]

---

5) सरदेसाई गो.स. एन.एच.एम. भा-3 पा. 158

6) सा.ऐ.ले. भा-1 ले. 166 पा. 156
म.शि.का. ले. 514 पा. 710-11 ले. 515 पा. 711

7) अप्रकाशित मे.स.डे.कॉ. क्रं.82 फा-2 पत्र क्रं. 93 पूणे
म.शि.का. ले. 509 पा. 702
शि. रा. भा-1 ले. 125 पा. 55-56
अप्रकाशित - ' पाटीलबाबांचा आग्रह यामुळे मसलतीस अनुमोदन दिले. कारण त्या सरकारात सावकारांचे देण्याचे पेच असता पाच लाख रुपये सावकाराची कलेल तसे बालुन तरतुद करु. फौजखाना करावयाची त्यास ओढीमुळे फौज लवकर जमा होणार नाही. यास्तव अलीबहादर यास श्रावण मासी बाहेर काढीले.' (मे.सं.डे.कॉ.क्रं.82 फा.3 पत्र क्रं.93 पुणे)

8) भागवत अ.ना. हो. इ. सा. भा-1 ले. 7 पा. 23

9) भागवत अ.ना. हो.इ. सा. भा.1 ले. 7 पा. 23

10) ठाकुर बा. वा. हो. इ. भा-1 पा. 326
भावे क्रं. ३. ले. 35 पा. 53
भागवत अ.ना. हो. इ. सा. भा-1 ले. 11 पा. 21
डॉ. अंधारे सं. शि. पा. 30

लालसोट इथे महादजी शिंदेचा पराभव झाल्यामुळे राजपुताण्यातील सर्व राजपुत राजे एकत्र होऊन त्यांनी मराठयांचा राजस्थानातील अंमल नाहिसा करण्याची प्रतिज्ञा केली. हया प्रतिज्ञेप्रमाणे रामपूर, सावेर, बुंदी, कोटा, निंबाहेडा, जावद इत्यादि ठिकाणचा मराठयांचा अधिकार राजपूतांनी संपुष्टात आणला.[11] तेव्हा मातोश्री अहिल्याबाईनी अंबाजीपंत आणि राघो रणछोड हयांना सैन्यासह प्रतिकारास पाठविले या लढाईत अंबाजीपंत मारल्या गेले.[12]

यावेळी तुकोजी होळकर लगेच राजस्थानात न जाता इंदोर आणि महेश्वर याठिकाणीच व्यर्थ वेळ घालविला. उत्तरेतून महादजी शिंदेची लवकर पोहचण्याविषयीची पत्रे वारंवार येत होती. तुकोजी होळकर आणि अलीबहादर सरळ महादजीच्या मदतीस न जाता तुकोजी व अलीबहादर मेवाडात गेले. परिणामी इस्माइल बेग व गुलाम कादर यांनी येथे 18 जुलै 1788 रोजी दिल्ली जिंकली.[13] बादशहा शहाआलम आणि राजस्त्रियांवर खूप अत्याचार केले.[14] बादशहा शहाआलम हयाला तख्तावरुन खाली खेचून त्याचे डोळे फोडले.[15]

---

11) ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 327
म.रि. उ वि. भा-3 पा. 141
12) ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 327
13) म.शि.का. ले. 533 पा. 742
साने का. ना. पेशव्यांची बखर पा. 132, 133
14) म.शि.का. ले. 530 पा. 738
पु.रे.कॉ. भा-1 ले. 227 ते. 235 पा. 310 ते. 324
15) म.शि.का. ले. 533 पा.742 ले. 537 पा. 746
म.द.बा. भा-2 ले. 181 पा. 149

3) तुकोजी होळकर राजस्थानात -

तुकाजी होळकर महेश्वराहुन निघुन जुलै 1788 मध्ये चितोडजवळ आकोल या ठिकाणी येऊन पोहचले. तेथेच तुकोजी आणि अलीबहादरांची भेट झाली. तुकोजी सोबत त्यांचे दिवाण नारो गणेश, वकील पाराजीपंत, शिंद्यांचे सरदार अंबुजी इंगळे आणि काशीराव होळकर ही मंडळी होती. पुण्याहुन आदेश येईपर्यंत तुकोजी आणि अलीबहादर काहीच करायला तयार नव्हते. त्यामुळे राजपुतांनी महादजी शिंदेंना महत्व देणे कमी केले. राजपुतांनी पुणे दरबाराशी पत्र व्यवहार करुन तुकोजी होळकर आणि अलीबहादरांना हाताशी धरण्याचा प्रयत्न केला.[16] हया विषयी कृष्णाजी जगन्नाथ लिहितात. ' जैपूरवाल्याशी व राजे बिजेसिंगाशी आतुन स्नेह झाला आहे.[17] जोधपूर व जयपुरच्या वकिलांनी तुकोजींची भेट घेतली. सुभेदार तुकोजीराव उदयपुराजवळ आल्याचे कळताच राणा भिमसिंगाने आपला वकील पाठविला.[18] त्याचप्रमाणे कृष्णगडकर, कोटेकर, जोधुपूरकर, जयपुरकर वगैरे राजेरजवाडयांचे वकील तुकोजी आणि अलीबहादरांना भेटले. मारवाडी आणि जयपुरवाले हयांच्याशी त्यांचे वचन कथन पक्के झाले की, आम्ही सारे एकत्र होऊन तुम्हास (होळकरास) हिंदुस्थानचे मालक करितो. तुम्ही आम्ही मिळोन शिंद्यांस काढुन देऊ.' [18-1] अलीबहादरास मुखत्यार करुन सुभेदारास आपल्याकडे वळवुन घेऊन पाटीलबावांशी लढवावे. आपण दुरुन तमाशा पाहावा. असा विचार राजपुतांनी केला होता.[19]

---

16) अप्रकाशित मे.सं.डे.कॉं. क्रं. 82 फा.3 पत्र क्रं.1 पुणे

17) 'इतिहास संग्रह जोधपुर ' ले. 41
म.रि. उ वि. भा-3 पा. 246
म.द.बा. भा-1 व 2 एकत्र ले. 171 पा. 139

18) म.शि.का. ले. 546 पा. 765 ले. 545 पा. 763
म.रि.उ वि. भा-3 पा. 246, 247
म.द.बा. भा-1 व 2 एकत्र

18-1) म.द.बा. भा-1 व 2 एकत्र ले. 174 पा. 141 ले. 171 पा. 139

19) म.शि.का. ले. 555 पा. 780-81
' इतिहास संग्रह ' जोधपुर पा. 122

4) राजपुताण्यातील राजकारण -

विजयसिंगाने महादजी विरुध्द संघ स्थापण्याचा अतोनात प्रयत्न केला. त्याने पंजाबातील शिखांशी संपर्क साधुन महादजी शिंदे विरुध्द त्यांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला.[20] परंतु त्यात त्याला यश आले नाही.

तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे मधे उत्तर भारताच्या प्रतिनिधीच्या प्रश्नावरुन तेढ निर्माण झाली होती. हयाचा फायदा घेऊन तुकोजी होळकराना महादजी शिंदे विरुध्द भडकविण्याचा प्रयत्न विजयसिंगाने केला.[21] इतकेच नव्हे तर महादजी शिंदेंना उत्तर भारतातुन घालवुन देण्याविषयीही लिहिले.[22] तुकोजी होळकर आणि महादजी शिंदेंचे व्यक्तिगत कितीही मतभेद असले तरी शेवटी ज्यांच्याही समोर मराठे शाहीचे हितच सर्वतोपरी महत्वाचे होते. शिवाय मराठयांकडून अजमेर विजयसिंगाने जिंकुन घेतल्यामुळे तुकोजीराव नाराज होते.[23] हयामुळे तुकोजींनी विजयसिंगाच्या हया प्रस्तावाकडे लक्षच दिले नाही.[24]

राजपुताण्यात तुकोजी आणि अलीबहादर या दोघांनाही वाटत होते की आधी राजपुताण्यातील राजकारण पूर्ण करुन मगच महादजी शिंदेंच्या मदतीला जावे. परंतु ही त्यांची फार मोठी चुक ठरली. तुकोजींचे सल्लागार व दिवाण नारो गणेश म्हणाले की, कोणतीही गोष्ट करावयाची असल्यास अहिल्याबाईना विचारुन करावी जेणे करुन सरकारचा शब्द खाली पडणार नाही. आणि तुमचेही कल्याण होईल.[25]

---

20) इतिहास संग्रह जोधपूर

21) म.शि.का. ले. 545 पा. 763 ले. 546 पा. 765
म.द.बा. भा-2 ले. 171 पा. 139
' इतिहास संग्रह ' जोधपुर ले. 5

22) अप्रकाशित अरजी वही नं. 4 पा. 6 दि. 7 जानेवारी 1788 चे विजयसिंगाचे तुकोजी होळकरांना पत्र (जोधपुर रेकॉर्ड बिकानेर)

23) ' इतिहास संग्रह ' जोधपुर ले. 7

24) डॉ. शिवदत्त दान बारहट ' जोधपुर राज्य का इतिहास ' पा. 106

25) ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 331
म.द.बा. भा 1 व 2 एकत्र ले. 171 पा. 139

सन 1788 च्या नोव्हेंबर महिन्यात भिमसिंगाचे कारभारी त्यांचे कबीले होळकरांच्या जहागिरीत (महालात) होते. परंतू 2000 सैन्य पाठवुन निंबाहेडावरुन भिमसिंगाचे कबीले महादजी शिंदे घेऊन गेले.[26] यामुळे तुकोजी होळकर, महादजी शिंदे आणि अहिल्याबाईत वितुष्ट निर्माण झाले तुकोजीराव परत अस्थिर झाले.[27]

तुकोजी होळकरांनी जयपुर राज्यातील रामपुरा येथे आपली छावणी इ.स. 1789 च्या मे महिन्यात केली.[28] तुकोजीकडील पेंढा-यांनी जयपुर राज्यात नासधुस केली. जयपुरचा राजा सवाई प्रतापसिंगाने तुकोजी होळकरांकडे मुन्शी वासुदेव गोविंदाला पाठवुन सलोख्याचे बोलणे केले. ' तुमचे वडील (मल्हारराव होळकर) यांनी माझे वडील (माधोसिंग) यांची बाजु घेऊन जयपुरच्या गादीवर माझ्या वडिलांना बसविले होते. त्याप्रमाणे आपण माझी बाजू घेऊन पाटीलबावांशी माझा समेट करुन घावा ' अशी विनंती तुकोजींनी केली.[29] याचवेळी प्रतापसिंगाने आपल्या मुन्शीमार्फत स्पष्ट केले की, ' तुम्ही जर जयपूर व जोधपूर कडे दूर्लक्ष करुन दिल्लीवर राज्य करणार असाल तर ते शक्य होणार नाही. '[30] तुकोजी होळकरांनी त्यांना सांगितले की, ' होळकरांची खंडणी आधी द्या. शिवाय तोंग तोडा परत द्या. नजफखानाच्या मदतीने जयपुरच्या राजाने तोंगतोडयाचा प्रदेश इ.स.1780 मधे मराठयांकडून रामपुरासहीत काबीज केला होता. खंडणीचा प्रश्न महादजी शिंदे सोबत संपर्क साधल्यावरच सोडविता येईल असे तुकोजींनी त्याला बजावले.

-----------------------------------------------

26) ठाकुर वा.वा. हो.इ.भा-1 पा. 251, 331

27) ठाकुर वा.वा. हो.इ.भा-1 पा.251, 331

28) दि. म. रा. भा-2 ले. 33 पा. 29

29) ' इतिहास संग्रह ' जोधपूर ले. 12
जोशी/सरकार ' पर्शीयन रेकॉर्डस् ऑफ मराठा हिस्ट्री ' भा.2 पा. 25,26
म.द.बा. भा-1 व 2 एकत्र ले. 179 पा. 146-47

30) म.द.बा. भा. 1 व 2 एकत्र ले. 179 पा. 146-47

सुभेदार तुकोजीराव मेवाडाकडे असता त्यास त्वरित निघुन येण्यासाठी निकडीची पत्रे महादजी शिंदिनी त्यांना पाठविली.[31] याचवेळी गुलाम कादर व इस्माइल बेग यामधे फुट पडून इस्माइल बेग महादजी शिंदे यांना येऊन मिळाला.[32] तुकोजी होळकर निर्णय घेण्यास असमर्थ असल्याने उगीच दिवस मात्र घालवित होते. एखाद्या मोठया मोहिमेत सामील होऊन एखादी मोठी कामगिरी करुन दाखविण्याची संधी फुकटच वाया घालवीत होते. लहान लहान लढाया जिंकण्यातच त्यांचे दिवस जात होते.[33] तुकोजींनी यावेळी अहिल्याबाईकडे रकमेची मागणी केली. त्यांनी तुकोजींना हिशोब पाहुनच रकमेची सरबराई करुन पाठविण्याचे स्पष्ट कळविले.[34]

### 5) तुकोजी-महादजी भेट - दि. 31 जुलै 1789

यावेळी महादजी शिंदेची छावणी मथुरेला होती. तुकोजी होळकर दि. 31 जुलै 1789 रोजी मथुरेला पोहचले.[35] महादजी शिंदिनी निंबाहेडाच्या बाबतीत गोष्ट नमते घेतले. तिघांनी एकविचारे करुन कार्य करण्याचे ठरले.[36] त्यांची आणि महादजी शिंदेची अत्यंत प्रेमाने भेट झाली. जयपुरचा वकील मथुरेला महादजी शिंदेना भेटून ठरले की, पूर्वी ठरल्याप्रमाणे 65 लक्षापैकी 18 लक्ष रुपये जयपुरकरांनी महादजी शिंदेंना द्यावे. 5 लक्ष जास्त देवून एकूण 23 लक्ष रुपये द्यावे. पण जोधपुर करांशी तह होईपर्यंत हा तह ही होणार नाही.

---

31) ठाकुर वा. वा. हो.इ. भा.1 पा. 331
    म.द.बा. भा.1+2 ले. 174 पा. 141
32) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 331
33) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 332
34) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 332
    म.द.बा. भाग 1 व 2 एकत्र ले. 178 पा. 145, 146 ले. 179 पा.146-47
35) म.शि.का. ले. 560 पा. 789
    सरकार फॉल भा.4 पा. 2
36) डॉ. रघुवीरसिंह 'हिस्ट्री ऑफ जयपुर' पा. 424
    ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 332, 333

तुकोजी होळकरांचे पूर्ण समर्थन हयावेळी महादजी शिंदेंना मिळाले होते. इ.स.1788-89 मधे परिस्थिती बदलुन महादजी शिंदेंची स्थिती मजबुत होऊ लागली होती. लालसोटच्या रणांगणातुन माघार घेतांना जिवंत राहिल्यास जयपुर आणि जोधपूरच्या राज्यकर्त्यांना धूळीस मिळविण्याची शपथ महादजींनी घेतली होती.[37] हयामुळे जोधपूर व जयपुरच्या वकिलांनी तुकोजीराव व अलीबहादरांच्या छावणीत जाऊन अक्षरशः विनवण्या केल्या की, ' कसेही करुन महादजी शिंदेंनी आमचा समझोता करुन द्यावा.' [38] परंतू हया विनवण्यांचा काहीही परिणाम झाला नाही.

6) नारो गणेश रांझेकर प्रकरण -

तुकोजीवर यावेळी महादजी शिंदेंचा प्रभाव होता. इ.स.1790 मधे नारो गणेश रांझेकराचे प्रकरण उद्‌भवले. गंगाधर चंद्रचुडाच्या पश्चात मातोश्री अहिल्याबाईच्या शिफारसीने नारो गणेश रांझेकर कारकुनाचे कारभारी झाले.[39] लवकरच त्यांनी तुकोजीरावांवर आपली छाप पाडली. तुकोजीरावांना नाना फडणीसांच्या विरुध्द मोरोबा दादा कडे याच नारो गणेशांनी वळविले होते.[40] उत्तर हिंदुस्थानात तुकोजीरावांसोबत नारो गणेश ही होते. अलीबहादरांनी म्हटल्याप्रमाणे नारो गणेशांचा व महादजी शिंदेच्या रंगात रंग मिळुन गेला. नारो गणेश सेवक होळकरांचे आणि मुखत्यार शिंद्यांचे असा प्रकार होऊ लागला. कळ लावण्यात कधी कसुर होत नसे.[41] मुलखाच्या वाटणीत हा प्रकार प्रकर्षाने जाणवला. शेवटी त्यांच्यावर चौक्या बसवुन राखेचे तोबरे तोंडास लावून हत्तीच्या शृंखला मानेवर पडल्या

---

37) अप्रकाशित अखबारात पा.43 (सीतामऊ)
दि.म.रा.भा.1 ले. 235 पा. 204

38) आचार्य के.ए. ' मराठा राजपूत रिलेशन्स ' पा. 341

39) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.2 पा.340

40) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.2 मराठी दप्तर क्रं.3 ले. 156 पा. 160

41) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.2 मराठी दप्तर क्रं.3 पा.340 म.रि.3 वि.भा.2 पा.21

नारो गणेशांनी तीस लाख रुपये भरले पण सुभेदार एक कोटी वरुन हलेनात.[42] शेवटी नारो गणेशांनी आत्महत्या केली. हया प्रकरणाचा गवगवा फार होऊन ते संबंध वर्षभर चालले. हया प्रकरणामुळे मात्र होळकरांच्या इभ्रतीला धक्का तर बसलाच शिवाय पदरात काही कायमचा लाभही पडला नाही.[43]

**7) पाटणच्या युध्दाकडे वाटचाल -**

सैन्याची तयारी पूर्ण झाल्यानंतर मार्च 1790 मधे मराठयांची एक मोठी फौज रजपूतांविरुध्द रवाना झाली. दुसरी सेना अलवरच्या दिशेने गेली. तर तुकोजी होळकरांची फौज काशीराव होळकरांच्या नेतृत्वाखाली शिखांविरुध्द रवाना झाली.

शिखांनी राणेखान भाईना सतलज येथे रजपुतांच्या योजनेप्रमाणे अडकवून ठेवले होते.[44] तुकोजी होळकरांवर शिख, पानिपत आणि मेवाडची जबाबदारी होती. काशीराव होळकर 10 ते 12 हजार घोडदळ आणि पायदळासह मेवाडच्या प्रदेशातून जात असतांना मेवाडयांनी काशीराव होळकरांच्या काही माणसांना लुटून घोडे आणि उंट पळविले. काशीराव होळकरांनी नेवाचा परगणा जिंकुन तेथे आपला अंमल बसविला. हयानंतर काशीराव होळकरांनी शिख आणि रोहिल्यांशी सामना देण्याकरीता बाळाजी इंगळे हयांच्या बरोबर पुढे चाल केली.[45] शिख आणि रोहिले त्यांच्या भीतीने पळून गेले. इस्माइल बेगाने सैन्य पाठवुन मेवाडमधील होळकरांचे ठाणे उध्वस्त करण्याचा हुकुम दिला. होळकरांकडून

---

42) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.। मराठी दप्तर क्रं.3 पा. 34। म.शी.का. ले. 586 पा.812 म.रि.3 वि. पा.22 म.द.बा.भा.। व 2 एकत्र ले. 208 पा.175

43) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.2 पा. 34।
म.द.बा. भा. । व 2 एकत्र ले. 208 पा. 175
म.रि.3 वि. भा.2 पा. 22

44) ठाकुर वा.वा. हो.इ.सा.भा.। ले. 263
दि.म.रा.भा.। ले. 190 पा. 170 ले. 38। पा. 31।
जोशी/सरकार भा.2 पा. 29, 33
म.शि.का. ले. 570 पा. 805 ले. 57। प. 806

45) शि.रा.भा.। ले. 226 पा. 113, दि.म.रा.भा.। ले. 388 पा. 315
दि.म.रा.भर.2 ले. 30 पा. 34
ठाकुर वा.वा. हो. इ. सा. भा.। ले. 223
जोशी/सरकार भा.2 पा.30

गोपाळराव हरी नमकसार परगणा लढवित होते. गोपाळराव हरी परगणा हस्तगत करणार एवढयात मोगल सैन्यांनी त्यांना जिवे मारले. इस्माईल बेग तुकोजी होळकरात ही मतभेद निर्माण झाले. रजपुतांविरुध्द बळवंत सदाशिव अस्वलकर हयांना रेवाडीच्या दिशेने अलीबहादरांना पाठविले.[46] भरतपूरचा जाट राजा रणजितसिंग मराठयांना येऊन मिळाला म्हणून जयपूरकरांनी रणजितसिंगाच्या भुसावर ठाण्यावर कब्जा केला.[47] हयावेळी बापू होळकरांचा मुक्काम जाटवाडयात गोवर्धन येथे होता. त्यांना इस्माइल बेगाकडे जाण्याची आज्ञा झाल्यामुळे अलवर कडे प्रस्थान करुन शिंद्यांच्या फौजेत सामील झाला.[48] मराठयांचे सैन्य पाटणजवळ पोहचून त्यांनी पाटणच्या पूर्वेस आठ मैलावर आपली छावणी केली.[49] विरुध्द बाजूला राठोड कछवा आणि मिर्झा इस्माइलच्या सैन्याने पाटणगावच्या पूर्वेला दोन मैलावर आपले मोर्चे लावले. हया सैन्यात नेतृत्वाचा आणि उद्देशाचा पुर्ण अभाव होता.[50] तुकोजी होळकर, शिवाजी विट्ठल, अंबुजी इंगळे आणि राणेखान भाईंनी युध्द टाळण्याकरीता शेवटचा प्रयत्न केला. पण अजमेरच्या प्रश्नावरुन मराठे आणि रजपुत हयांच्यातील बोलणी फिस्कटली.[51] खंडणी देण्याबाबतही दोन्ही संस्थाने टाळाटाळ करु लागली. महादजी शिंदेंनी काळवेळ ओळखून तुकोजीराव आणि अलीबहादुरासोबत मिळते घेतले होते.[52]

---

46) दि.म.रा. भा.2 ले. 22 पा. 20
शि.रा.मा. भा.1 ले 202 पा. 99

47) दि.म.रा. भा.2 ले. 22 पा. 20

48) ठाकुर वा.वा. हो.इ.सा. भा.1 ले. 223

49) म.शि.वा. ले. 573 पा. 813, पु रे.कॉ. भा.1 ले. 260 पा. 366 - 367
' चंद्रचुड दप्तर ' ले. 76 पा. 80

50) दि.म.रा. भा.2 ले. 11 पा. 80
' हिस्ट्री ऑफ जयपुर ' पा. 319

51) आचार्य के.ए.पा. 350

52) फिला

8) पाटणचे युध्द दि.20 जुन 1790, बापू होळकरांचा पराक्रम -

राजपुत आणि इस्माईल बेगाने ही मराठयांचे आव्हान स्वीकारुन मोर्चेबंदी केली. मराठा सैन्य पुढे येताच अलियारखानाने तोफखाना सुरु केल्याने डी बायनच्या सैन्याची फार हानी झाली. गोपाळराव मात्र पुढे जाण्यास सरसावताच इस्माईल बेगाने तोफखाना सुरु केला. हा संघर्ष संध्याकाळपर्यंत सुरु होता. हया संघर्षात रजपुंताकडिल हेमराज बक्षी घायाळ झाला तर डी.बायनचे 200 सैनिक मारल्या गेले.[53] हया 22 मे 1790 च्या एका दिवसाच्या युध्दात कोणताही निर्णय होऊ शकला नाही. मात्र मराठयांनी रजपुतांची रसद तोडली.

महादजी शिंदेचे पत्र गिळताच /मराठयांनी पुन्हा युध्दाची तयारी केली. डी.बायनच्या तोफखाना मुख्य सैन्याच्या पुढच्या बाजूला ठेवला. काशिराम होळकर आणि अंबुजी इंगळेचे सैन्य उजव्या बाजूला तर काही पलटणी डाव्या बाजूला उभ्या केल्या. गोपाळराव भाऊ आणि जिवाबादादा बक्षी मुख्य सैन्याच्या मध्यभागी तोफखान्याच्या मागे उभे होते.

इस्माईल बेग रजपूत सैन्याच्या उजव्या बाजुला, अब्दुल मुतलब आणि कछवा घोडदळ डाव्या बाजुला तर उत्तरेकडे शेवटच्या रांगेत जयपूरचे नागा साधु होते. हयांच्या खंदकाच्या पुढे तोफांच्या तीन रांगा तयार केल्या होत्या.[54] दोन्ही बाजूंचे सैन्य युध्दाकरिता सज्ज असून आक्रमणाच्या प्रतिक्षेत होते. शत्रुस जेरीस आणण्यासाठी मराठा खारांनी आसपासचा मुलुख उध्वस्त केला. शत्रुस मैदानात ओढून लढाई करण्याचे मराठयांचे प्रयत्न होते.[55]

या फौजेचे अधिकारी बापू होळकर हयांनी मातोश्री अहिल्याबाईंना पाठविलेल्या पत्रात हया लढाईचे वर्णन केले. ' शत्रुची रसद बंद पाडण्यास जयपुरकरांच्या मुलखात उतरुन

---

53) ' हिस्ट्री ऑफ जयपुर ' पा. 429
54) हिस्ट्री ऑफ जयपुर पा. 429 - 430
55) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.2 पा. 342

शेखावटीत आले. बागसिंग शेखावत भेटले. मुलुख चाळीस पन्नास कोस भारुन ताराज करुन दिला. शत्रु मोर्चेबंदीकरुन मजबुतीने आहे. जेष्ठ शुध्द 10, 11 ला दोन लढाया झाल्या. मराठयांची फौज तोफांच्या लढाईत थिजली. तेव्हा घोडे घातले. एका बाजुस बापूजी होळकर, एका बाजुस इंगळे व पाठीमागे पेंढारी असा तिन्ही बाजूने हल्ला केला. इस्माइल बेगाचा पूर्ण पराभव झाला. त्यांची संपुर्ण सेना नष्ट झाली.[56] या युध्दात मराठे पूर्ण विजयी झाले. आणि डी बायनच्या गळयात विजयश्रीने माळ घातली.[57]

युध्दाच्या दुस-या दिवशी पाटण गावात 12,000 रजपूत सैनिकांना युध्द कैदी म्हणुन मराठयांनी पकडले. रसद, दारुगोळा, मोठया प्रमाणात मिळाला. शिवाय 125 तोफा, 21 हत्ती, 8000 बंदूका 13000 उंट, 573 घोडे आणि 3000 बैल मराठयांना मिळाले.[58]

हया युध्दात रजपुतांचे 3000 घोडेस्वार मारल्या जावून इस्माइल बेगची पूर्ण सेना नष्ट झाली. तर मराठयांकडील केवळ 52 सैनिक आणि 70 घोडे मारल्या गेले. 309 सैनिक जखमी झाले.[59]

125 तोफापैकी 105 तोफा महादजी शिंदिच्या सरदाराच्या हाती लागल्या. तर 20 तोफा काशीराव होळकरांच्या हाती लागल्या. त्या गोपाळराव रघुनाथरावांनी काशीरावाकडे मागितल्या.[60] हयामुळे काशीराव होळकर रुष्ट होऊन त्यांनी महादजींच्या सैन्याच्या छावणीपासुन चार कोस अंतरावर आपली छावणी केली.

---

56) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 342
म.द.बा. भा 1 + 2 ले.

57) अप्रकाशित जोधपूर रव्यास भा.3 पा. 152-155 (सीतामऊ)
अप्रकाशित राठोड रीख्यात पत्र क्रं. 166 क 166 ख (सीतामऊ)
म.शि.का. ले. 574 पा. 813 ले. 575 पा. 816 ले. 576 पा. 819
पु.रे.कॉ.भा.1 ले. 260 पा. 366
'हिस्ट्री ऑफ जयपुर ' पा. 428 433

58) म.शि.का. ले. 575 पा. 816
सरदेसाई गो.स. ' मराठे का नवीन इतिहास ' भा.3 पा. 223

59) म.शि.का. ले. 575 पा. 816
सरदेसाई गो. स. ' मराठे का नवीन इतिहास ' भा. 3 पा. 223

60) चंद्रचुड दप्तर ले. 189 पा. 188 लेश 172 पा. 172

9) काशीराव होळकरची कामगिरी -

दि. 20 जुन 1790 रोजी झालेल्या पाटणच्या युध्दात रजपुतांचा दणदणीत पराभव होऊनही रजपुतांचा प्रश्न निकालात निघाला असे मात्र घडले नाही. आणि म्हणुन रजपुतांचा प्रदेश उध्वस्त करण्याचा महादजींचा आदेश मराठा सैन्याला मिळाला.[61] काशीराव होळकर आणि लखबादादा शेखावटी प्रान्ती जाणार होते.[62] त्यांनी मारवाडचा प्रदेश जाळपोळ करुन फस्त केला.[63] जयपूर प्रांतात शिंदे-होळकरांच्या फौजांनी वसुली चालविली. जयपुरच्या सवाई प्रतापसिंगाची मराठयांविरुध्द कछवा जमीन-दारांची मदत मागितली. पण ती प्रतापसिंगानी नाकारल्यामुळे जमीनदारांनी रावराजाचा दिवाण राम सेवकामार्फत होळकर-शिंदेच्या संयुक्त फौजेशी बोलणी केली.[64] काशीराव होळकर, जिवाबादादा बक्षी, डी-बायन आणि गोपाळराव भाऊच्या संयुक्त फौजेने कछवांची आणि शेखावटांची तीन लक्षावर मामलत ठरविली.[65] काशीराव होळकर कृष्णगडाकडे जाणार होते. त्यांनी रेवाडीचा शहराचा ताबा घेऊन गोकुळगडास योर्चे लावले. मराठी फौजेने जोधपूर प्रांतात धूमाकूळ घालुन रुपनगरचा किल्ला व शहर हस्तगत केले. सांबरची ठाणी कायम केली. मराठी फौजेची बातमी ऐकून गंगाराम भंडारी जोधपूरला पळून गेला.[66]

यानंतर मराठी फौजेने जयपुराकडे मोर्चा वळविला. जयपुर हे संस्थान मुख्यतः होळकरांचे पण यावेळी लौकिकदृष्टया पुढारीपण महादजी शिंद्याकडे. पाटणच्या युध्दाने जयपूरकरांचे डोळे उघडल्याने ते तहाची भाषा बोलु लागले. पण जोधपुरकरांना हे न पटल्याने त्यांनी मराठयांशी लढण्याचा बेत रुपनगर, बिकानेर, किशनगड वगैरे संस्थानीकांसोबत संगनमत करुन केला.[67]

---

61) अप्रकाशित जोधपूर ख्यात भा.3 पा. 160 (सीतामऊ)
    म.शि.का. भा-2 ले. 579 पा. 828
62) दि.म.रा.भा.2 ले. 41 पा. 37
63) म.शि.का. ले. 575 पा. 816
64) दि.म.रा. भा.2 ले. 33 पा. 29
65) दि.म.रा. भा.2 ले. 20 पा. 18 ले. 23 पा. 21
66) शि.रा. भा.2 ले. 253 पा. 182
    दि.म.रा. भा.2 ले. 33 पा. 29
67) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 342-343

### 10) मेडल्याचे युध्द व तुकोजी होळकर - दि. 10 सप्टेंबर 1790

जयपुरहून दौलतराम हळदिया आणि इस्माइल बेग जोधपुरकडे जाणार असल्याची बातमी समजताच तुकोजी होळकर आणि महादजी शिंदेनी त्यांना अडवायचे ठरविले. त्यावेळी मोठी अडचण अजमेरची होती ती फत्ते झाली.[68]

मराठयांच्या बाजुने तुकोजी होळकरांकडून काशीराव व बापू होळकर तर महादजी शिंदेकडून गोपाळराव रघुनाथ, डी बायन आणि अलीबहादराकडील बळवंत सदाशिव हे फौजेसह जयपुरापासुन पंधरा कोसांवर गोळा झाले.[69] शिंद्यांच्या फौजेने अजमेरच्या किल्ल्यास दि. 15 ऑगष्ट 1790 मधे वेढा दिला. 30,000 राठोड सैन्य मेडते या गावी जमा झाले तेंव्हा महादजी शिंदेंनी अजमेरची कामगिरी स्वतः घेऊन तुकोजी होळकरास मेडल्यावर पाठविले.[70]

### 11) सैन्यरचना -

विजयसिंगाचे सैन्य भीमराज सिंघवीच्या नेतृत्वाखाली मेडल्याच्या पूर्वेला एक मैलावर डांगावास गावाबाहेर तलावाजवळ उत्तर दक्षिण अर्धवर्तुळात छावणी करुन होते. हया सैन्याच्या डाव्या बाजुला नागा साधुंचा पाडाव होता. राठोड सैन्याच्या मध्यभागी भीमराज सिंघवीचे रजपुत घोडदळ आणि पायदळाचा पाडाव होता. 80 तोफा त्याने समोर ठेवल्या होत्या. शिवाय सैन्याच्या उजव्या बाजुला महेशदास राठोड आणि शिवसिंग राठोड हयांच्या नेतृत्वाखाली मारवाडच्या जमीनदारांच्या 10,000 घोडदळाचा पाडाव होता.[71]

---

68) ऐ.प. या ले. 445 पा. 392
शि.रा. भा. 1 ले 252 पा. 181

69) ठाकुर वा.वा. हो.इ. भा-1 पा. 343 म.शि.का.ले.580 पा.830-31 175

70) ठाकुर वा.वा. हो.इ. भा. 1 पा. 343

71) डॉ. शिवदतदान बारहट पा. 115

दुस-या बाजुला मेडल्यापासून तीन मैल पूर्वेला नेडतिया गावाबाहेर मराठयांनी आपली छावणी केली होती. डी-बायनने तोफखाना दोन रांगेत उभा केला होता. तोफखान्याच्या संरक्षणास दोन पलटणी उभ्या केल्या होत्या. मुख्य सेना गोपाळराव भाऊ, जिवाबादादा बक्षी, लखबादादा बक्षीच्या नेतृत्वात उभी होती. हया सैन्याच्या एक मैल मागे काशीराव होळकर आणि बापुराव होळकरांच्या नेतृत्वात 4000 घोडदळ आणि अलीबहादुरांचे 1000 घोडदळ राखीव म्हणुन मागे उभे केले होते.[72]

मराठे आणि रजपुतांचे सैन्य एकमेकांसमोर दोन मैलावर छावणी करुन होते. डी-बायनने वेळ न घालविता 10 सप्टेंबरला आपल्या तोफखान्याच्या मारा सुरु केला होता.[73] डी-बायनने रजपुतांना सावध होण्याचीही संधी न दिल्याने हया अनपेक्षीत हल्ल्याने रजपूत सैन्य विस्कळीत झाले. हया संधीचा फायदा घेऊन डी-बायनने रजपुतांच्या तोफखान्यावर ताबा मिळविला. भीमराज सिंधवीने आपल्या सैन्याला एकत्र करुन सामना देण्याचा अयशस्वी प्रयत्न केला. डी-बायनच्या पलटणीचा कप्तान रोहनला राजपुतांच्या घोडदळाने चारही बांजुनी घेरले. कसेबसे आपले प्राण वाचवुन राहेन मराठयांच्या मुख्य सैन्यात येऊन पोहोचला.[74]

रजपुत सैन्य धीर न सोडता डी-बायनच्या तोफखान्याची पर्वा न करता शौर्याने लढत होते. थोडयाच वेळात डी-बयानच्या तोफखान्यावर रजपुत सैन्याने ताबा मिळविला.[75]

---

72) म.शि.का. ले. 579 पा. 828
म.द.बा. भा-2 ले. 209 पा. 178
सी.पी.सी. भा-9 नं. 610, 737
सरकार कॉल भा-4 पा. 31, 34

73) अप्रकाशित जोधपूर ख्यात भा.3 पा. 168
म.शि.का.ले. 579 पा. 828
दि.म. रा. भा.2 ले. 37 पा. 33
'चंद्रचुड दप्तर' ले. 79 पा. 84 ले 81 पा. 86
शि.रा. भा-2 ले. 251 पा. 180
जोशी/सरकार भा 2 पा. 38 - 40

74) हरबर्ट क्रॉम्प्टन पा. 7-71
डॉ. परिहार पा. 125

75) अप्रकाशित जोधपुर ख्यात भा-3 पा. 168-172 (सीतामऊ)
हरबर्ट क्रॉम्पटन पा. 61

रजपुतांनी डी-बायनच्या सैन्याला उधळुन लावुन मराठयांच्या मुख्य सैन्यावर हल्ला केला. नेमके हयाच वेळी काशीराव होळकर, बापूजी होळकर आणि अलीबहादराच्या राखीव घोडदळाने युध्दात प्रवेश केल्याने परिस्थिती पालटली आणि युध्दाचा रंग बदलला. होळकरांच्या जोरदार प्रतिहल्ल्याने रजपुतांचे पायदळ रणांगणातून पळुन गेले. डी-बायनने परत आपले विस्कळीत झालेले सैन्य एकत्र करुन पुन्हा तोफखान्यावर ताबा मिळविला. आणि तोफांची तोंडे रजपुतांकडे वळविल्यामुळे मराठा सेना व डी-बायनच्या तोफखान्याच्या मधात रजपुत सैन्य सापडले. होळकराच्या ताज्या दमाच्या सैन्यापुढे रजपुत सैन्य अगदीच दुबळे ठरले. तरीही पण त्यांनी माघार न घेता रणांगणावर मृत्यु पत्करला. सर्व रजपुत सैन्य मारल्या गेले. हे भयानक युध्द सायंकाळी चार वाजता संपले.

2 नोव्हेंबरच्या पत्रात जोधपूरचा वकील लिहितो, ' डिबाईनचा तोफखाना पिऊन रवातेवर न आणिता हजार स्वारांनी तलवार अशी चालविली. जे दोन कोस माधारे फिरविले. काशीराव होळकर, बापूजी होळकर व अलीबहादराचे दिवाण मागाहुन येऊन तलवार चालविली तेव्हा लढाई फत्ते झाली.[77] रजपुत लोक गोळा छरा संगीन यात निम्मे खवलेच होते. निम्मे राहिले त्यांनी बापु होळकरांचा गोल उठला हे पाहुण पलटणच्या मुकाबला सोडुन याजवर आले. भाला बंदुकीचे काम पडलेच नाही. एकमेकांचे गळा हात घालुन घोडयाखाली येऊन तलवार, कटयार, दात अशानिशी रजपुत जाऊ न दिला. लढाई होळकरांनी मारली.[78]

मेडल्याच्या युध्दातील होळकरांच्या कामगिरीची स्तुती करुन डी-बायनने महादजी शिंदेंना लिहिले. ' तुमचे फौजेकडून काही एक झाले नाही. होळकराकडील सरंजाम नसता तर करोडो रुपयांचा कारखाना बरबाद होऊन बदनक्षा मुलुख भर होता.' [79]

---

77) ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 343
78) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 343
79) ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 343
म. रि. 3. वि. भा. 3

होळकर व शिंदेनी मालकोटच्या किल्ल्याला वेढा दिला. आणि भेडता शहरावर ताबा मिळविला. गंगाराम भंडारीनी प्रतिकाराचा प्रयत्न केला परंतु त्यांचा मराठयांपुढे टिकाव न लागल्याने ते मालकोटच्या किल्ला सोडुन देवून जोधपूरकडे निघुन गेल्याने मालकोटचा किल्ला मराठयांना मिळाला.[80]

मेडल्याच्या रणांगणात प्रेतांचा खच पडला होता. महेशदास राठोडासह तीन चार हजार रजपुत कापल्या गेले. तीन हजारापेक्षा जासत जखमी झाले. रजपुतांचा तोफखाना मराठयांच्या ताब्यात आला. मराठयांचे नऊशे सैनिक व पाचशे घोडेस्वार मारल्या गेले तर 2500 सैनिक जखमी झाले मात्र या युध्दात मराठयांना निर्णायक विजय मिळाला.[81]

जोधपुरच्या वकिलांनी मराठयांच्या छावणीत येऊन बोलणी करुन 50 लक्ष रु. खंडणी देण्याची तयारी दाखविली पण नेमके हयाच वेळी काशीराव होळकर आणि बळवंत सदाशिव हे सैन्यासह छावणी सोडुन गेल्याचे कळताच जोधपुरच्या वकिलांनी भाषा बदलली तुकोजी होळकर आणि अलीबहादरांच्या मदतीशिवाय आपल्याला गोपाळराव भाऊंशी करार करता येणार नसल्याचे त्यांनी सांगितले.[82]

अशाप्रकारे पाटण आणि मेडल्याच्या दोन्ही युध्दामधे रजपुतांचा पूर्ण पराभव झाला. या दोन्ही युध्दातील विजयाचे श्रेय आपल्याला तुकोजी होळकरांना द्यावेच लागेल.

---

80) अप्रकाशित जोधपूर ख्यात भा.3 181-183 (सीतामऊ)
म.शि.का. ले. 586 पा. 849
दि.म.रा. भा-2 ले. 37 पा. 33
'चंद्रचुड दप्तर ' ले. 81 पा. 86

81) अप्रकाशित जोधपूर ख्यात भा.3 पा. 170 - 171 (सीतामऊ)
अप्रकाशित राठोडांरी ख्यात पत्र क्रं. 166 ख (सीतामऊ)
दि. म.रा. भा.2 ले. 37 पा. 33
' चंद्रचुड दप्तर ' ले. 81 पा. 86

82) दि. म. रा. भा.2 ले. 19 पा. 18

ह्यानंतर महादजी शिंदिनी अजमेर प्रांतासोबतच मागची तीन वर्षाची खंडणी 35 लक्ष रु. विजयसिंगाकडे मागितली.[83] परंतु विजयसिंगाने अजमेर प्रांत आणि 15,60,000 रुपये देण्याचे मान्य केले.[84] अजमेर प्रांत मराठयांना मिळेताच सोबतच्या पुष्कर तिर्थावरही त्यांचा अधिकार स्थापन झाला. पुष्करला तुकोजी होळकरांनी अन्नछत्र सुरु केले तर महादजी शिंदेनी मंदिरे बांधली.[85]

ह्या एकंदर घालमेलीत जयपुर व उदयपूर ही संस्थाने तेथे पूर्वापार शिंद्यांची नसतांनाही ही संस्थाने आता शिंद्यांना अंकीत झाली होती. होळकरांच्या अधिकारावर हे शिंद्याचे अतिक्रमण होते.[86] मेडल्याचे महत्वपूर्ण युध्द तुकोजी होळकरांच्या सैन्यामुळेच मराठयांना जिंकता आले ही गोष्ट नाकारता येत नाही. या युध्दात तुकोजी होळकरांच्या सैन्याने पराक्रम गाजविला नसता तर मराठयांची पत व दारुगोळा पूर्ण नष्ट झाला असता. तुकोजीराव होळकरांनी शिकस्त केली. अलीबहादर खपले तरी पण शिंदि एकमेवाद्वितीय झाले.[87]

### 12) रोहुखवासाचे प्रकरण - तुकोजी होळकर

जोतपुरचे प्रकरण संपवुन उत्तरेतील कारभाराची व्यवस्था लावुन महादजी शिंदि दक्षिणेत गेल्यामुळ उत्तर हिंदुस्थानात तुकोजी होळकर हेच एकमेव मातब्बर सरदार राहिले. जोतपुरकर नमलेले पाहुन जयपुरकरही तुकोजी होळकरांसमोर नमले. आणि त्यांनी रामपुरा खाली करुन दिला.[88]

---

83) ' इतिहास संग्रह ' जोधपूर ले. 16
डॉ. परिहार पा. 128

84) ' इतिहास संग्रह ' जोधपूर ले. 16-17
85) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 344
86) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 344
87) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 344
88) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 344

तुकोजीराव होळकरांनी रोडुखवासाचे पारिपत्य करावे म्हणुन बोलणी करण्यास जयपूरचा राजा तुकोजीकडे आला. मागील राहिलेले सतरा लक्ष रुश देण्याचे जयपुरकरांनी मान्य केले.[89] परंतु जयपुरच्या राजानेच रोडुखवासास कैद केले. त्यांच्या जागी दौलतरामास नेमले. 6 ऑक्टोबर रोजी जयपुरच्या राजाने तुकोजी होळकरांना खंडणी देण्याचे मोघम वचन दिल्याने तुकोजींची मोठी कुचंबणा झाली. ह्यामुळे तुकोजींना इ.स. 1791 च्या डिसेंबरात जयपुर प्रांतातच रहावे लागले.[90] त्यामुळे जमेल त्या रीतीने खंडणी वसुल करण्याचे तुकोजींनी ठरविले.[91]

**13) तुकोजींचे राजपुतान्यातील अन्य विजय -**

तुकोजी होळकरांना जयपुरच्या राजाने खंडणी देण्याचे मोघम वचन दिले. त्यामुळे तुकोजींना जयपुर प्रांतातच राहावे लागले.[92] त्यामुळे जयपुर प्रांतात फिरुन महालांची जप्ती करुन जमेल त्यारितीने खंडणी वसुल करण्याचे तुकोजींनी ठरविले.[93] त्यानुसार ते टोककडे गेले. त्यांनी दोन गढया जिंकल्या आणि दोन मजबूत महत्वाच्या गढयांना वेढा घातला. त्या जिंकल्यानंतर ते कोटयावरुन परत आले.[94] तुकोजी होळकरांनी आपले पुतणे बापूजी होळकर व जामनगरकर खुशालीरामास माचेवाडीकडे जप्तीस पाठविले. माचेवाडी मार्च 1792 मधे जिंकली. बापू होळकरांनी माचेवाडीतील तीन महाल जिंकून गढीस मोर्चे लावले.[95]

---

89) म.शि.का. ले. 591 पा. 863
म.द.बा. भा.2 ले. 219 पा. 187

90) ठाकुर वा.वा. हो. इ. भा. 1 पा. 345
म.द.बा. भा.2 ले. 218 पा. 187

91) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 345

92) म.द.बा. भा.2 ले. 219 पा. 187

93) ठाकुर वा.वा. हो.इ. भा. 1 पा. 345
म.द.बा. भा.2 ले. 223 पा. 190

94) ठाकुर वा.वा. हो. इ. भा. 1 पा. 345
म.द.बा. भा.2 ले. 215 पा. 203

95) ठाकुर वा.वा. हो.इ. भा. 1 पा. 345
म.द.बा. भा.2 ले. 235 पा. 203 ले 232 पा. 199

महादजी शिंदेंनी दक्षिणेत जातांना सर्व अधिकार गोपाळराव रघुनाथ चिटणीस यास सोपविले. जयपुरच्या राजाने गोपाळराव भाऊंशी बोलणे केले. आणि शिंदे - होळकरात माचेवाडीच्या प्रकरणावरुन वितुष्ट निर्माण केले.[96]

यावेळी तुकोजींच्या सैन्यातील 12,000 स्वारांचा अधिकारी खुशाल कुंवर होता. त्याला गोपाळरावाने उठुन जाण्यास सांगताच खुशाल कुवरने जाण्यास नकार दिला. हयावेळी शिंद्याकडील माणसांनी मोर्चे लावुन लढाई केली ती सत्तावीस दिवस चालली. खुशाल कुंवराने शिंद्यांचे मोर्चे कापुन काढले पण शेवटी त्याचा यात प्राण गेला. तुकोजी या ठिकाणी नसल्यामुळे कुंवराची माणसे जयपुरच्या मुलुखात आली.[96अ] हया कुरापतीत गोपाळराव भाऊ विजयी झाल्याने आता त्याची नजर खुद्द सुभेदारांकडे (तुकोजी होळकरांकडे) वळली.

### 14) गोपाळरावांची आगळीक -

महादजी शिंदे दक्षिणेत गेल्यामुळे उत्तरेत तुकोजी होळकर हेच एकमेव मातब्बर सरदार राहिले होते. तुकोजी होळकर उत्तरेत आपला दरारा निर्माण करण्याच्या प्रयत्नात होते. सप्टेंबर 1792 मधे दोआब आणि मथुरेच्या जिल्हयात होळकरांच्या प्रदेशावर ताबा मिळविण्याचे धोरण शिंदेच्या सरदारांनी अवलंबिले होते.[97] त्यामुळे होळकर शिंदेच्या फौजेत संघर्षाचे वातावरण निर्माण झाले हाते. गोपाळराव भाऊने तुकोजींना विरोध करण्यास सुरवात केली. इकडे बापू होळकर माचेवाडी वरील रावराजाकडून तीन लक्ष रुपयाची हुंडी घेऊन सैन्यानिशी वसुली करिता माचेवाडीस गेले.[98] त्यावेळी बापू होळकरांना गोपाळराव भाऊने निरोप पाठविला की, ' माचेवाडीच्या राजाकडून आम्हाला दहा लक्ष रुपये घ्यावयाचे आहेत. जोपर्यंत आमची रक्कम वसुल होत नाही तोपर्यंत आम्ही तुम्हाला कर वसुल करु देणार नाही.'[99] असे सांगुन स्वतः गोपाळराव चिटणीस घटनास्थळी आल्याने बापू होळकरांना परत फिरावे लागले.[100]

---

96) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 345
96अ) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 346
97) सरकार फॉल भा.4 पा. 67
98) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 346
99) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 346
100) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 346
सरकार फॉल भा.4 पा.6

15) बनासाचा छापा - 8 ऑक्टोबर 1792.

हयावेळी तुकोजी होळकरांनी जयपूरचा दिवाण दौलतरामास स्पष्ट म्हटले की, ' तुम्ही जाणुन बुजून रक्मेचे आमिष दाखवुन आमच्या दोघात (होळकर-शिंदि हयांच्यामध्ये) कलह उत्पन्न झाला.' हयावर कारभा-यांचे उत्तर हे की ' तुमचे हातीची लढाई तुमचे तुम्ही बघा. आम्ही कबुल केलेला पैसा देवू आम्ही त्यांचेही देवाळ आपलेही देवाळ, जबरदस्त असेल तो अगोदर होईल.'[101]

तुकोजी होळकरांनी महादजीच्या सरदारांना प्रत्युत्तर देण्याची तयारी केली. जयपूरच्या राजाशी गुप्त करार केला.[102] जयपूरच्या मदतीने शिंदिच्या सैन्यावर आक्रमण करावयाचे ठरविले. तुकोजींचा मुक्काम जयपूर प्रांतात बनास नदीकाठी होती. परंतु तुकोजींची योजना कार्यान्वित होण्यापूर्वीच शिंद्याच्या सैन्याने त्यांच्यावर आक्रमण करण्याचा निश्चय केला आणि नेमके हयाच वेळी त्यांना कारणही मिळाले. होळकरांच्या पेंढा-यानी शिंद्याकडील फौजेची लुट आणली हेच कारण पुढे करुन गोपाळराव भाऊ , जिवबादादा बक्षी, डी.आयन हयासर्व शिंदिच्या सरदारांनी बनाम नदी काठावरील तुकोजींच्या शिबिरावर अकस्मात 8 ऑक्टोंबर 1792 रोजी आक्रमण केले.[103] तुकोजी होळकरांना पाराशर दादाजीने घोडयावर बसवून दोन हजार स्वारांसह पुढे पाठविले, आणि आपण जातीने मुकाबल्यास राहिले. दोन घटका फार मोठी चकमक झाली. या चकमकीत माणिकचंद्र भंडारी व हिरोजी वाघमारेसह पन्नास माणसे मारल्या गेली.[104] एवढयात बापू होळकर सैन्यासह येवून पोहचल्याने शिंदिच्या सैन्याने माघार घेतली. तुकोजी होळकर स्वत: ब्राम्हणगांव तालुक्यातील बाबी याठिकाणी आले. आपली जहागीर व गढी मजबूत पाहून तेथेच मुक्काम केला.[105]

---

101) केळकर य.न. ' होळकरांची कैफियत ' पा.113.
102) म.न.ई. भा.3 पा.254.
103) ' चंद्रचुड दप्तर ' ले.121 पा.131.
सरकार कॉल भा.4 पा.68.
ठाकूर वा.वा. हो.इ.भा.1 पा.347.
104) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.346
भागवत अ.ना.हो.इ.सा.भा.6, पा.71.
105) ठाकूर वा.वा.हो.इ.भा.1 पा.347
भागवत अ.ना.हो.कै.भा.6 पा.71.

### 16) लाखेरीच्या युध्दाकडे वाटचाल -

महादजी शिंदे इ.स. 1792 मध्ये पुण्याला गेले. जातांना आपले बहुतेक सैन्य उत्तरेतच ठेवले होते. हयावेळ पर्यंत होळकर-शिंदेचे मतभेद विकोपाला गेले होते. तुकोजी होळकरांनी शिंद्यांच्या कवायती सैन्याला शह देण्यास दुद्रनेक नावाच्या फ्रेंच सरदाराकडुन कवायती फौज तयार करुन घेतली.[106] तुकोजीरावांनी आपला वकील बाबुराव हयाला कलकत्याला पाठवुन महादजीच्या सैन्याविरुध्द इंग्रजांची मदत मिळविण्याचा प्रयत्न केला.[107]

### 17) अहिल्याबाईकडून तुकोजी होळकरास सैनिक मदत -

हयावेळी तुकोजी होळकरांचा मुक्काम हडोती प्रांतात बावी या ठिकाणी होता. बनासाच्या चकमकीची माहिती त्यांनी मातोश्री बाईंना कळविली. तेव्हा मातोश्री म्हणाल्यात 'तुकोजीराव मारला गेला असता तरी चिंता नव्हती. परंतु म्हातारपणी चाकराचे हातुन बेइज्जती झाली.'[108] (बदनक्षाची गोष्ट) मातोश्रींनी पाच लक्ष रुपये हुंडया पाठवुन तुकोजींना पत्र लिहिले की, ' हिंमतीने शत्रुचे पारिपत्य करावे. खर्च व सैन्य पाठविते. म्हातारपणामुळे कामगिरी योग्यपणे पार पडत नसल्यास कळवावे मी स्वतः डेरे दाखल होते.'[109] एक महिन्याच्या आत दहा हजार सैन्य दुस-या महिन्यात आठ हजार सैन्य मातोश्री अहिल्याबाईंनी तुकोजी होळकरांच्या मदतीस पाठविले. स्वतः तुकोजीरावांनीही गोसावी बैरागी यांची 40,000 फौज तयार केली. शिंद्यांच्या कवायती कंपू प्रमाणे कंपू डयुडरनेका कडून तयार करविले.[110]

---

106) खरे वा.वा. ऐ.ले.सं. भा.9 पा. 4604, 4605
कीन एच.जी. ' एस्केच ऑफ द हिस्ट्री ऑफ हिंदुस्थान ' पा. 422

107) सी.पी.सी भा.10 नं. 1067, 1084

108) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 347
भागवत हो.कै. भा.6 पा. 71

109) ठाकुर वा.वा. हो.इ भा-1 पा. 347
भागवत अ.ना. हो. कै. भा.6 पा. 71

110) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 347
भागवत अ.ना. हो.कै. भा-6 पा. 71

उभयपक्षांच्या लोकांची रोज काहीना काही कारणावरुन कटकट पुन्हा सुरु झाली. शेवटी बापु होळकर, पाराशर दादाजी, गोपाळराव भाऊ आणि जिवबादादा बक्षी मधे तह होऊन यांचा बेलभंडार व त्यांची उदी होऊन परस्परे सफाई झाली. समझोता झाला पण कलह मात्र कायमच राहिला.[111]

## 18) संतप्त होळकर -

तुकोजी होळकर कुटुंबीयांना एका सरदाराच्या नोकराने आपला पाणउतारा करावा ही गोष्ट सहन होणारी नव्हतीच यामुळे होळकर घराण्याच्या लौकिकाला तडा गेला होता. आणि म्हणूनच मातोश्री अहिल्याबाईना होळकर शिंदे मधे झालेल्या तडजोडीने समाधान वाटले नाही. ' समेट झाला हा सर्वतोपरी चांगला परंतु झाल्या गोष्टीची उजळणी कां झाली नाही हे मनात सतत खटकते.'[112] हया अपमानाचा सुड घेण्याकरिता अहिल्याबाईंनी नवीन सैन्य भरती सुरु केली.[113] दि. 15/12/1792 रोजी तुकोजींनी अहिल्याबाईंना लिहिलेल्या पत्रात तुकोजींच्या भावना स्पष्ट होतात. ' सोबत्याच्या फौजेने दया करुन लौकिकाची हानी केली. त्याचा सुड घेतल्याशिवाय लौकिकात चांगले दिसणार नाही. आणि उभे राहण्यास जागाही होईल. नाहीतर खावंद ही मानणार नाही एक वेळ सुड घ्यावा तरी निर्वाह '[114] अशाप्रकारे होळकर शिंद्याच्या सरदारांचा वचपा काढल्यास उत्सुक होते.

---

111) राजवाडे वि.का. भ.इ.सा. भा 7 ले. 15
' चंद्रचुड दप्तर ' ले. 122 पा. 13
भागवत अ.ना. हो. कै. खं.6 पा. 72

112) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.इ. भा.1 पा. 348

113) भागवत अ.ना. हो. कै. भा.6 पा. 73
ठाकुर वा. वा. हो. इ. भा-1 पा. 374

114) ठाकुर वा. वा. हो. इ. सा. भा.1 ले. 3105
राजवाडे वि.का. भ.इ. सा. भा.7 पा. 15

### 19) मल्हारराव होळकरांचा अभिमान -

होळकरांची अशी भावना झाली असतांनाच मल्हारराव होळकर घटना स्थळी आले. केव्हा तरी प्रसंग साधुन शिंद्यांच्या फौजेचा खरपुस समाचार घ्यावा अशी खुमखुमी तुकोजी होळकर आणि त्यांची मुले मल्हारराव व यशंवतरावास कधी पासून होती.[115] त्यांना या बाबतीत मातोश्री अहिल्याबाईची फुस होती. म्हणुनच मल्हारराव होळकर घटना स्थळी आल्याबरोबर कलहास पुन्हा प्रारंभ झाला.[116] मल्हाररावाचे अहिल्याबाईंना राजपुताण्यात जाण्याचे आणि होळकरांच्या सैन्याचे सर्वाधिकार मागितले. मल्हारराव म्हणाले, ' शिंद्याच्या कंपूस एक दिवसात मारुन बरबाद करीन '[117] आमच्या मनात कोणत्याही प्रकारचे सख्य करायचे नाही त्यांना जमीनदोस्त करु [118] मल्हाररावावर अहिल्याबाईचा विश्वास बसून त्यांनी मल्हाररावास परवानगी दिली. बापू होळकर आणि पाराशर दादाजीने मल्हाररावाच्या आक्रमक धोरणास पायबंद घालण्याचा प्रयत्न केला. पण मल्हाररावाने त्यांचे काही एक ऐकले नाही.[119] तुकोजीरावांनी मल्हाररावाच्या धोरणास मान्यता दिली. कारण त्याला रोखण्याचे सामर्थ्य तुकोजी होळकरात नव्हते.

### 20) लाखेरीचे युध्द - दि. 1 जुन 1793

होळकरांच्या सर्व हालचालीवर गोपाळराव भाऊ नजर ठेवुन होता. होळकर केव्हातरी अचानक आपल्या कंपुसह येऊन आपणास सडकणार अशी बातमी त्याला लागली

---

115) म.रि. उ वि. भा.3 पा. 388
116) राजवाडे वि.का. भ.3 सा. भा.7 पा. 15
117) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 348
सरकार फॉल भा.4 पा. 70
118) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 348
119) ठाकुर वा.वा. हो. इ. सा. भा.1 पा. 348
सरकार फॉल भा.4 पा. 70

होती.[120] म्हणुन त्याने डी-बायन व लखबादादास ताबडतोब साहाय्यास बोलाविले.[121] राजपुताण्यातील संघर्षाची माहिती महादजी शिंदेंना कळताच त्यांनी नाना फडणीसांना हा गृहकलह थांबविण्याचा आग्रह केला. पण नानांनी दुर्लक्ष केले.[122] उलट इंग्रज आणि निजामाला उत्तेजन देवून महादजी शिंदेंचा पाडाव करण्याची योजना नाना फडणीसांनी आखली होती.[123]

दोन्ही पक्षात समेट होण्याची शक्यता नष्ट झाली. दोन्ही पक्ष आपआपल्या परीने युध्दास सज्ज असून एकमेकांवर नजर ठेवून शेवटी उत्तर भारतातील लाखेरी येथे दि. 1 जुन 1793 रोजी शिंदे होळकर वैमनस्याची परिणती. सशस्त्र संघर्षात झाली.[123अ] दि. 1 जुन 1793 रोजी लाखेरीच्या मैदानात शिंदे होळकरात युध्द सुरु झाले. डी-बायनने होळकरांची तीस हजार फौज लाखेरीच्या खिंडीत असता सकाळीस त्यांच्यावर हल्ला केला.[124] डी-बायन आणि डयुडूनेक हे दोघेही समसमान कुशल सेनापती आपल्या धन्याची सेवा इमाने इतबारे करित होते. पायदळ व तोफखान्याची कामगिरी पार पडताच शत्रुवर अकस्मात तुटुन पडण्याकरिता होळकरांचे कसलेले घोडेस्वार मागे राखून ठेवलेले आहेत हे डी-बायनला कळताच त्याने खिंड ताब्यात घेण्यास मोठया कल्पकतेने चाल केली.[125] त्याला अडविणची डयूडूनेकने पराकाष्ठा केली. त्या प्रयत्नात त्याचे पंधराशे लोक क्षणात जायबंदी झाले.[126] शिंदेच्या मानाने होळकरांचे सैन्य व तोफा कमी होत्या. शिंदेच्या 60 तोफा तर

---

120) म.रि. उ वि. भा.3 पा. 388

121) सरकार फॉल भा.4 पा. 72
म.रि. उ वि. भा.3 पा. 388

122) खरे, ऐ.ले.सं. भा.9 ले. 3516 पा. 4651

123) म.रि.उ वि. भा.2 पा. 404

123अ) खरे वा. वा. ऐ.ले.सं.भा.9 ले. 3514 पा. 4650
ले. 3516 पा. 4651 ले. 3520 पा. 4655

124) खरे, ऐ.ले. सं. भा.9 ले. 3516 पा. 4651 ले. 3520 पा. 4655
म.रि.उ वि. भा.3 पा. 388

125) म.रि. उ वि. भा.3 पा. 389

126) म.रि.उ वि. भा.3 पा. 389

होळकरांच्या केवळ 5 तोफा होत्या. तरीही त्यांनी कामगिरी चांगली पार पाडली.[127] डयूडूनेक या युध्दात प्राणपणाने लढला. त्याचे सर्व युरोपीयन अधिकारी मारल्या गेले. होळकरांचा हया युध्दात पूर्ण पराभव झाला.[128] होळकरांच्या सैन्यात पाण्याचे दुर्भिक्ष पडून पाण्यावाचून एक हजार सैनिक तडफडून मृत्यु पावले.[129]

या युध्दात तुकोजीराव हजर नव्हते. पराभवाच्या बातमीने त्यांना परकाष्ठेचे दु:ख झाले.[130] या युध्दातुन परत येत असतांना संतापाच्या भरात तुकोजी होळकरांनी उज्जैन ही शिंद्यांची राजधानी लुटली.[131] आणि त्यानंतर ते इंदुरला पोहचले. युध्दात होळकरांचे 1500 सैनिक ठार वा जखमी झाले. कवायती फौजेचा सेनापती डेडयूनेक जखमी झाला. मल्हारराव दारु पिऊन रस्त्याच्या कडेला बेशुध्दावस्थेत पडला होता. पाण्याच्या दुर्भिक्षतेमुळे हजार-बाराशे माणसे ठार झाली.[132]

21) होळकरांच्या चुका -

मनुष्य बळ, द्रव्यबळ आणि बुध्दीबळही तुकोजीपेक्षा महादजीजवळ अधिक होते. परंतु नाना फडणीसांना मात्र तो अजुनही महादजींच्या समकक्षच वाटत होता. ' तुमचे विषयी तिळप्राय दुसरा विचार नाही. पुढेही कोणेप्रकारे व्यंग पडु न देता होइल तितका उपराळाच करु. तुम्ही व शिंदि बरोबरीचे सरदार ' [133] अशी पुण्याची पत्रे पाहुन तुकोजींनाही भ्रम

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

127) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 348
म.रि.3 वि. भा.3 पा. 389
128) दि.म.रा.भा.2 ले. 99 पा. 86
129) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 349
130) म.रि. 3 वि. भा. 3 पा. 189
131) कीबी एच.जी. ' एक्सचेंज ऑफ द हिस्ट्री ऑफ हिंदुस्थान ' पा. 423
132) दि.म.रा. भा.2 ले. 99 पा. 86
133) हो. इ. सा. भा.1 ले. 388

झाला होता. पुरंदरे स्पष्ट आरोप करतात की, ' महादजीचे वाढते बळ आणि चढती महत्वाकांक्षा पाहुन नानांनी त्याविरुध्द तुकोजी होळकरास उठविले.' 134

हया युध्दात होळकरांच्या प्रमुख दोन चुका झाल्यात. डी-बायन येण्यापूर्वीच होळकरांनी गोपाळराव भाऊस एकटा गाठून त्यांचा फन्ना उडवायला पाहिजे होता. ते त्यांनी केले नाही ही होळकरांची सर्वात मोठी चुक ठरली. अन्यथा या युध्दाचा निकाल उलटा लागला ही महत्वाची संधी घालविल्यानंतर होळकरांनी दुसरीकडे निघुन जायला पाहिजे होते पण ते आपल्या गुर्मीत शिंद्यांशी टक्कर देत बसले. वास्तविक होळकर शिंद्यांच्या तुलनेत मनुष्य बळ, सैन्यबळ आणि द्रव्य बळात फारच कमी होते चुक लक्षात आल्यावर संघर्ष टाळण्याचा प्रयत्न केला. पण तो डी बायनने हाणुन पाडला. त्याने होळकरांचे आव्हान स्वीकारुन त्यांचा समाचार घेतला. या युध्दात खुद्द डेडयूनेक, डी-बायन आणि मल्हारराव जखमी झाले. 135

डी-बायनने या युध्दाविषयी स्पष्ट लिहुन ठेविले की, ' मी शिंद्याकरिता अनेक संग्राम केले परंतु या लाखेरीच्या प्रसंगासारखा निकराचा व अत्यंत चिंतेचा असा दुसरा कोणताच संग्राम मला करावा लागला नाही. 136 हया उद्गारावरुन रणांगणात होळकर कमी पडले असे नाही तर त्यांना त्यांच्या चुका भोवून अंती पराभव पत्करावा लागला.

## 22) युध्दाचे परिणाम -

मराठेशाहीचे प्रमुख आधारस्तंभ होळकर, शिंदे, भोसले, गायकवाड इ. होते. 1775 नंतर भोसले-गायकवाडाकडून फारसा आधार मिळाला नाही. होळकर-शिंदे मात्र

---

134) पु.द. भा.2 पा. 18
135) म.रि.उ वि. भा.3 पा. 390
136) म.रि. उ वि. भा.2 पा. 209

सुरवातीपासुनच यशापयशाचे वाटेकरी होते. इ.स. 1728 ते 1794 पर्यंतची 66 वर्षे मागे वळून पाहिले तर त्यांच्यात लाखेरीचे युध्द वगळता प्रत्यक्ष संघर्ष कधीही झालेला नाही. या जबरदस्त दोन आधारस्तंभापैकी लाखेरीच्या मैदानावर एक कोसळल्याने मराठेशाहीचे अपरिमित नुकसान झाले. या दोन सरदारांचे भांडण आजपावेतो शाब्दिक होते ते तसे न राहता त्याची परिणती भयानक शस्त्र संघर्षात झाली.

नानाचा टापटिपीचा कारभार, हरिपंताची कर्तव्यनिष्ठा, महादजींचे युध्द नैपुण्य, अलीबहादराची स्वामीनिष्ठा आणि तुकोजीरावाचे धाडस हे त्यावेळच्या मराठा साम्राज्य निर्माण करण्याची ताकद ठेवणा-या मराठेशाहीतील सरदारांचे अलौकीक गुण एकसमयावच्छेदाने उपयोगात येते तर इंग्रजासारख्या परकीय पण बलाढय शत्रुस जरब बसली असती आणि मराठयांची हिंदुहयातशाहीची आकांक्षा परिपूर्ण झाली असती. परंतू मोठमोठया व्यक्तिच्या हातुन अक्षम्य चुका होतात आणि इतिहासाला वेगळेच वळण मिळते हे ही खरेच पण उणिव काय ती सर्वास एकसुत्री कामास लावणा-या धन्याची होती. 136 यावेळी दिल्लीची सत्ता मराठयांच्या हातात असली तरी ती घेण्यासाठी इंग्रज टपुन बसले होते. अशास्थितीत होळकरांचा नाश झाल्याने ' बुडत्याचे पाय खोलात ' अशी अवस्था मराठा साम्राज्याची झाली.'

या युध्दाविषयी ग्रँट उफ लिहितो, ' शिंदे होळकरात परस्पर इर्षा आणि व्देशाची भावना जी आजपर्यंत लपलेली होती तिचा उद्रेक होऊन त्यांनी उघड युध्द सुरु केले.' 137 रियासतकार सरदेसाई म्हणतात, ' शिंदे होळकर वैमनस्य पानिपतापूर्वी सुरु झाले होते. त्याचा लाखेरी येथील पराभवाने निर्णय झाला.' 138 सर जदुनाथ सरकार म्हणतात, ' शिंदे-होळकरात उत्तर भारतावर आधिपत्य स्थापन करण्यासाठी जी स्पर्धा सुरु झाली होती तिचा या युध्दाने निर्णय झाला.' 139 पौर्वात्य व पाश्चात्य इतिहासकार लाखेरीचे युध्द

---

136) म.रि.उ वि. भा.2 पा. 209
137) ग्रँट एफ भा.2 पा. 180
138) एन.एच.एम. भा.3 पा. 249
139) सरकार फॉल भा.4 पा. 95

शिंदे-होळकर दुहीचा परमोच्च बिंदु मानतात हया युध्दाने मात्र उत्तर भारतातील राजकारणावर विपरित परिणाम झाला हे नाकारता येत नाही.

## 23) लाखेरीच्या युध्दाची कारणे - वैमनस्याची सुरवात -

प्रत्यक्षात लाखेरीचे युध्द दि. 1 जुन 1793 रोजी झालेले असले तरी त्यांची पार्श्वभुमी मात्र फार आधीपासून तयार होत गेली. नानासाहेब पेशव्यांच्या काळात शिंदे होळकरांनी जयपुरच्या वारसा हक्काच्या प्रकरणात दोन परस्पर विरोधी उमेदवारांना पाठिंबा दिला होता. तेव्हापासुनच हया दोन घराण्यात वैमनस्याचे बिजारोपण झाले.[140] वास्तविक मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंदे एकाच वेळी पहिल्या बाजीरावांच्या काळात उदयास आले होते परंतु कालांतराने मात्र दोन्ही घराण्यांचा इतिहास वेगळा घडत गेला.

## 24) महादजी उत्तरेत -

इ.स. 1783 ते 1792 हया काळात महादजी शिंदे उत्तरेतच होते. इ.स. 1784 मधे दिल्लीच्या बादशहाने महादजी शिंदेना वकील ए-मुतालकीची वस्त्रे व मीरबक्षी दिली.[141] परंतु 29-30 जूलै 1787 च्या लालसोटच्या युध्दाने त्यांना माघार घ्यावी लागली.[142] हया आपत्तीच्या वेळी महादजीने नाना फडणीसांना वारंवार रकमेची आणि सैन्याची मागणी केली पण नाना फडणीसांनी त्याकडे हेतुपुरस्पर दुर्लक्ष केले. शेवटी स्वतः च्या बळावर महादजी शिंदे हया आपत्तीपासुन सावरला. नानांनी पाठविलेले सेनानायक तब्बल एक वर्षाने महादजींना भेटले. परस्पर मदतीची शपथ तुकोजी आणि अलीबहादराने घेतली. 'राजश्री सुभेदारांनी व बहादरांनी एक विचार असावे, एकमेकाचे उणे पाहु नये म्हणून उभयपक्षी शपथ घेऊन दोन्ही फौजा बरोबर आहेत.[143] दुसरे असे की, राजस्थानात तुकोजी

---

140) जोशी श.पु. ' राजस्थान महाराष्ट्र संघर्ष '
141) म.शि.का. ले. 342
142) म.शि.का. ले. 503
143) शि. रा. भा. 1 ले. 143

स्वतंत्र राजकारण करु लागल्याने तुकोजी महादजी मतभेद वाढतच गेले. गोसावी प्रकरणामुळे ' अलीबहादर सर्वश्रेष्ठ आहे ' असे उत्तरेच्या लोकांना वाटु लागले. राजपूत या संधीचा फायदा घेऊन आपला बचाव करु लागले.

25) **अहिल्याबाईकडे महादजींची मदतीची याचना -**

दिल्लीच्या बादशहाने महादजींना इ.स.1784 मधे वकील-ए मुतालिकीची वस्त्रे दिल्यामुळे तुकोजींना महादजी बद्दल वैषम्य वाटु लागले.[144] हया पदामुळे येऊन पडलेल्या असंख्य जबाबदा-या सोबतच महादजींना अनेक संकटाचा सामना करावा लागला. लालसोटच्या राजपूतांविरुध्दच्या युध्दातुन माघार घ्यावी लागली.[145] उत्तरेतुन मराठयांचे उच्चाटण होण्याची परिस्थिती निर्माण झाली होती. अशा संकटात अहिल्याबाईकडे महादजी शिंदेनी मदत मागितली.[146] परंतु अहिल्याबाईंनी मात्र समाधानाची पत्रे पाठविण्या व्यतिरिक्त कोणतीही मदत केली नाही.[147] अहिल्याबाईच्या मनात महादजींच्या उत्तरेतील बडेजावामुळे हळुहळु व्देश निर्माण झाला होता. आणि उत्तर भारतातील प्रदेशांची वाटणी आपणास मिळावी अशी अपेक्षा होती.[148] कारण शिंदे होळकरात हया चाली पूर्वीपासून होत्या.गेल्या असता शिंदे सोबत नसूनही मल्हाररावांनी शिंदेना त्यांचा वाटा दिला होता.[149]

---

144) अप्रकाशित फॉरीन सिक्रेट डिपाटमेंट, 28 डिसेंबर 1784 नं. 9 (दिल्ली)
145) अप्रकाशित फॉरीन सिक्रेट डिपाटमेंट, 28 ऑगष्ट 1787 नं. 19 (दिल्ली)
अप्रकाशित अखबारात पा. 49-50
पु.रे. कॉ. भा-1 ले. 137 पा. 214
सी.पी.सी. भा.7 नं. 1575
146) म.रि. उ वि. 2 पा. 140
147) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 324
148) ठाकुर वा. वा. हो.इ. भा.1 पा. 325
149) ठाकुर वा. वा. हो.इ. भा. 1 पा. 325

26) तुकोजीचे उत्तरेत आगमन -

तुकोजी होळकर आणि अलीबहादरांना महादजींना लालसोटच्या युध्दात माघार घ्यावी लागली म्हणुन त्यांच्या मदतीस उत्तरेत नाना फडणीसांनी पाठविले होते.[150] तुकोजी होळकर नाना फडणीसांच्या आदेशानुसार वाफगावावरुन निघुन दि. 20 एप्रील 1788 रोजी महेश्वरात येऊन दाखल झाले. तुकोजींना महादजींनी लवकर येण्याची विनंती केली. ' ' माळव्याकडे रांगडयांचा उपद्रव झाला आहे आग्र्याकडे इस्माइल बेग आणि गुलाम कादरांनी दंगा बांधला आहे. त्यास तोंडावर आम्हीच आहोत. दोन्ही तोंडि आम्हास सांभाळणार नाहीत असे लिहिले.[151] तुकोजीही महादजींची अडचण ओळखुन ' सोबती संकटात आहे. आम्हास बिदा करावे ' असे नाना फडणीसास म्हटले.[152] पण पुढे मात्र या दोघात उत्तरेच्या वर्चस्वावरुन तणाव वाढुन मतभेद निर्माण झाले. आणि पुढे हया मतभेदाचे उघड संघर्षात रुपांतर होऊन त्याची परिणती लाखेरीच्या युध्दात झाली. तुकोजींचा मुक्काम जवळपास दोन महिने पर्यत महेश्वरात असुनही [153] त्यांना लवकर जाण्याविषयी एकदाही अहिल्याबाईंनी म्हटल्याचा उल्लेख आढळत नाही.

27) तुकोजी-महादजी मधे तेढ -

तुकोजी महादजींच्या मदतीला वाफगावाहुन निघाले पण ते लगेच उत्तर भारतात गेले नाही. तर अलीबहादरालाही एक महिना ठेवुन घेतल्यावर तुकोजी अलीबहादरास म्हणाले. ' आपण पुढे व्हावे, बापू होळकरास बरोबर देतो इंदुरापर्यत चालावे किंवा उज्जैनी पावेतो जावे. अमावस्या झाल्यावर दो चौ रोजी आम्ही येतो तेथे शिंद्याशी जाबसाल

---

150) अप्रकाशित मे.सं.डे.कॉ. क्रं. 82 पत्र क्रं. 93 (पुणे)
भागवत अ.ना. हो. इ. सा. भा.1 ले. 7 पा. 23
म.शि.का. ले. 509 पा. 702
शि.रा. भा.1 ले. 125 पा. 55 - 56

151) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 329

152) ठाकुर वा. वा. हो.इ. भा. 1. पा. 324

153) सरकार फॉल भा-4 पा. 9

सुरळीतपणे चालावयाचे असल्यास त्याजकडे जावू नाही तर मारवाडचे रोखे जावु ' [154] उशिरा जाण्याचे कारण कदाचित असे असावे. ' महादजींच्या अरेरावीने हे पानिपतासारखे अरिष्ट ओढुन घेतले. महादजींच्या राजपूत विरोधकांशी आपण परभारे कारस्थान रचुन ते अरिष्ट समजावे.' असाही उद्देश तुकोजींचा असावा.[155] म्हणजेच उत्तरेच्या राजकारणात तुकोजी आणि महादजी दोघेही आपापले वर्चस्व ठेवू इच्छित असल्यानेच त्यांच्यातील तेढ वाढत गेली. त्याला नाना फडणीसांसारखे खतपाणी घालणारे मिळाल्याने त्याचा स्पोट लाखेरीवर व्हायला वेळ लागला नाही. महादजीजवळ असतांना अलीबहादराने तुकोजी आणि महादजी बद्दल काढलेले उद्गार मोठे मार्मिक आहेत. ' द्रव्याचे कार्य आहे. कळ सा-यासच आहे. जबरेने विचारावे तर ज्याची जमियत अधिक तो जबरदस्त तुकोजीबावांजवळ होतो तेव्हा ही हीच अवस्था जाली आता ही तीच गत आहे. आतुनच खंडण्याकरीत, सरकारात एक पैसाही घेतला नाही ज्याची फौज फार तो बलवान '[156]

महादजींनी नानांवर स्पष्ट आरोप केला की, ' नानांनी हिंदुस्थानात होळकरास आमचे उरावर पाठवुन तंटे करविले.' [157] तर तुकोजींनीही नानांवर स्पष्ट आरोप केला की, ' मजला देशी ठेवून कारभारी यांनी खराब केले.' [158]

विनायक बाजी लिहितो, ' श्रीमंत पंतप्रधान थोरले बाजीराव साहेब याजपासुन उभयता सरदारांना बरोबरीने राखत आले. त्यात अंतर होणार नाही वडील सरदारी तुमची ' [159] अशा पत्रांमुळे दोघेही बरोबरीचे सरदार आहोत असे स्पष्ट होते. ' नानांनी महादजीस

---

154) म.रि.उ वि. भा. 2 पा. 15
155) म.रि. उ वि. भा.2 पा. 151
दि.म.रा. भा.1 पा. 289
156) म.रि. उ वि. भा.2 पा. 157
157) म.रि. उ. वि. भा.2 पा. 156
कोटा दप्तर
158) प्रा. राम इंगळे पा. 75 (मल्हारराव-महादजी)
159) हो.इ.सा. भा.1 ले. 334

दौलतीचे आज्ञाधारक ही कल्पना मनात वागवून त्यांच्या सर्व पराक्रमाचे यश श्रीमंतास यावे व त्यांच्यावर चष्मा हिंदुस्थानात होऊ नये म्हणुन अलीबहादरास पाठवून जो महादजीस शह दिला तो त्यांच्या वैमनस्यास व पर्याय करुन राज्यनाशास कारण झाला.[160]

28) तुकोजी राजपुतान्यात -

तुकोजी होळकर इ.स. 1788 मधे मथुरेकडे न जाता उदयपुराकडे गेले. हयासंबंधी रियासतकार सरदेसाई लिहितात. ' तुकोजी 1788 मधे उत्तरेत गेला तेव्हा तुम्ही महादजींचा केवळ मदतनीस म्हणुन न वागता काही स्वतंत्र कारभार करावा. राजपुतांशी मिळवुन आपले पूर्वीचे हक्क शाबुत राखावे अशी शिकवण तिने (अहिल्याबाईने) त्यास देवून प्रथम उदेपुराकडे त्यास रवाना केले.[161] हयावरुन स्पष्ट होते की तुकोजीराव स्वतःहुन महादजीकडे न जाता उदेपुराकडे गेले. त्यांना उदेपुराकडे जाण्यास अहिल्याबाईनींच सांगितले. तुकोजी मधे सर्वात मोठा दोष स्वयंनिर्णयाचा होता. ते कधी अहिल्याबाईच्या सांगण्याचे वागले तर कधी नाना फडणीसांच्या. त्याचमुळे योग्यता असुनही तो हया दोषाने झाकाळल्या गेली. तुकोजीराव आणि अलीबहादर उदयपुराजवळ आल्यानंतर उदयपुरकर, कृष्ण गडकर, कोटेकर, जयपुरकर, जोधपुरकर इ. लहान मोठया राजांचे वकील उभयतांना येऊन भेटले. त्यांनी तुकोजी आणि अलीबहादराकडे अनेक तक्रारी केल्या [162] आणि हे महादजींना पटले नाही. शिंदे-होळकरांमधली खाई मिटण्याएवेजी वाढतच गेली आणि शेवटी त्याचा विस्फोट झाला.

---

160) ना.श. (वेळास उत्सववृत) पा. 160
प्रा. डॉ. राम इंगळे पा. 74
161) म.रि.उ वि. भा. 2 पा. 153
162) ठाकुर वा. वा. हो.इ. भा.। पा. 330

## 29) तुकोजी आणि राजपुतांची नीती -

तुकोजी होळकर आणि अलीबहादरांनी परस्पर मदतीची शपथ घेतली होती.[163] गोसावी प्रकरणात तुकोजींनी महादजीविरुध्द अलीबहादरांना उघडउघड पाठिंबा दिला होता.[164] अलीबहादर आणि तुकोजीराव महादजींच्या मदतीला आले होते. पण पुण्याहुन आदेश येईपर्यंत काहीच करायला तयार नव्हते.[165] इ.स. 1790 मधे इस्माइल बेग आणि राजपुतांना वाटाघाटी करण्याच्या निमित्ताने तुकोजीराव छावणीत त्यांचे आगत स्वागत करीत होते.[166] तुकोजीराव आणि अलीबहादराला हाताशी धरुन पुण्याशी संधान साधुन महादजींना शह देण्याचा प्रयत्न सुरु केला होता. हयाविषयी कृष्णाजी जगन्नाथ लिहितात. 'जैपुरवाल्याशी व राजे बिजेसिंगाशी आतुन स्नेह जाहला आहे.' [167] दोघांनी महादजींच्या शत्रुंशी हात मिळविले होते. रजपुत, राजांनी त्यांना मदतीचे आश्वासन दिले की, ' मारवाडी व जयपुरवाले याशी त्यांचे वचन कथन पवचोपणे झाले की आम्हीसारे एकत्र होऊन तुम्हास (होळकरास) हिंदुस्थानचे मालक करितो, तुम्ही आम्ही मिळोन शिंद्यास काढुन देऊ' [168] हया विषयी परत कृष्णाजी जगन्नाथ लिहितात, ' अलीबहादराला मुख्तियार करुन सुभेदारास आपल्या संमतात घेऊन राजश्री पाटील बावाशी लढावे आपण दुरुन तमाशा पाहावा.' [169] हया कारणांनी तुकोजी महादजी मधील कलह वाढतच गेला. हयाचे निराकरण करण्याविषयी नाना फडणीसांना लिहिले.[170] पण उपयोग झाला नाही.

---

163) शि.रा.भा.। ले. 143 पा.65 ले. 215 पा. 106-107

164) शि.रा.भा.। ले. 143 पा. 65 ले. 215 पा. 106-107

165) शि.रा. भा.। ले. 159 पा.75
नवलकर व. ' महादजी शिंदे आणि नाना फडणीस हयांची तुलना ' पा. 25
' पेशव्याकडून महादजीला मदत आली. तुकोजी आणि अलीबहादर हे सरदार, त्यास नाना फडणीसांची आतुन फुस होती. त्यांनी शिंद्यास मदत न करता होईल तितका त्याचा उपमर्द करीत जावा ' सरंजामे क्रं.5 अलीबहादर शिंदे घराण्याचा इतिहास पा. 28

166) मा.शि.का. ले. 526 पा. 732 ले. 555 पा. 770
' इतिहास संग्रह ' जोधपूर ले.3 म.रि.3 वि.2 पा. 163, 67, 68

167) ' इतिहास संग्रह ' जोतपूर पा. 41

168) 'इतिहास संग्रह' जोतपूर पा. 42
म.रि.3 वि. भा.2 पा. 163

169) ' इतिहास संग्रह ' जोतपूर पा.11

170) म.शि.का. ले. 578 पा. 825

30) तुकोजींची वाटणीची मागणी -

वाटणी संबंधीचा होळकर-शिंदे वाद बराच रंगला होता.[171] हयासंबंधी महादजी शिंदे म्हणतात, ' आम्ही इतके श्रम साहस करुन स्वराज्यात उपभोग असे अर्थ घडविले ते व्यर्थ झाले.' [172] महादजींनी सर्व कार्य टाकुन देऊन देशी जाण्याचा निर्णय सुध्दा घेतला.[173] हयावरही 9 लक्ष 21 हजार रुपये उत्पन्नाचा प्रदेश देण्याचे महादजींनी मान्य केले. वरील विधानावरुन तुकोजींची बाजू मात्र अंधारातच राहते. आणि वाटणीच्या संबंधात सर्व दोष तुकोजीच्याच माथी मारण्यात येतो. पण खरी वस्तुस्थिती मात्र अगदी वेगळी आहे.

महादजींनी लालसोटच्या विपत्तीनंतर पुणे दरबार आणि अहिल्याबाईकडे मदतीची विनंती केली.[174] त्यांच्या त्या पत्राला अहिल्याबाईनी उतर दिले की, ' भाऊपणा पूर्वीपासून कसा चालत आला । पेंढारी, हजार स्वार बोलाविले हे काय ? फौज दहा पांच हजार म्हणाल तर पाठवुन देऊ पूर्वीप्रमाणे यथाविभाग चालावे.[175]

हया वाटण्या सन 1751-52, इ.स. 1755-56 सन 1764-65 व सन 1769 याप्रमाणे स्थलकाल व व्यवत्यनुरुप घडत आल्या होत्या. ते विभाग मातोश्री साहेबांच्या लक्षात होते आणि महादजींना त्याची जाणीव त्यांनी करुन दिली होती. सन 1751-52 मधे चौथाई सरकार व तीन हिस्से उभयता सरदारापैकी दीड हिस्सा होळकर व दीड हिस्सा शिंदे, सन 1755-56 त एक हिस्सा सरकार, एक हिस्सा होळकर व एक हिस्सा शिंदे सन 1764-65 त सरकार सतरा लक्ष, होळकर पांच लक्ष व शिंदे तीन लक्ष याप्रमाणे थोडया फार

---

171) म.शि.का. ले. 541 पा. 756 ले. 543 पा. 759
जोशी/सरकार भा.2 पा.24

172) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 ले. 249

173) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 ले. 249

174) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 323

175) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 324

फरकाने वहिवाट चालली होती. इ.स.1769 मधे झालेला वाटणीचा कागद थोडक्यात असा ' राजश्री दादाचे स्वारीत खंडण्या जाहल्या व नजर करार जाहली. रु. 25,40,000 पैकी वजा सखाराम भगवंत यांचे नजरेचे रु. 40,000 बाकी रु. 25,00,000 पैकी उभयता (होळकर-शिंदि) सरदारास देवविले. होळकर 5,00,000 व शिंदि 5,00,000 एकुण 10,00,000 स्वमसितेनात मल्हारजी होळकर यांनी करार केले. रु. 25,00,000 पैकी सरदारास ऐवज देवविला. होळकर पाच लक्ष नेमिले त्यास अदा जाहला तितका वजा करुन घावा. महादजी शिंदि यासी अदा जाहला तितकाच ऐवज नेमिला असे 3,00,000 बाकी सरकारात रुपये 17,00,000 [176]

वाटणीचा हिस्सा शिरस्तेप्रमाणे 25 चौथाई सरकार, 75 तीन हिस्से सरदार रु. 37.8.0 होळकर व 37.8.0 शिंदि एकुण 75 कुल रुपये 100 चे हिस्से हिस्सेरसीप्रमाणे[177]

वरील उता-यावरुन ' यथा विभाग वाटणी ' या शब्दांची खोली स्पष्ट होईल. याचा खुलासा हेतुपुरस्पर महादजी शिंदि कडून टाकण्यात आला.[178]

सुभेदार (तुकोजीराव) पाटील बावांच्या पूर्ण कच्छपी गेल्यावर खरी स्थितीत्यास उमगु लागली. ती अशी ' नवीन सुटलेल्या मुलखात उभयता सरदार आणि पेशवे सरकार अशा तीन वाटण्या होत असत. त्याप्रमाणे इस्माइल बेग, नजबकुली व गुलाम कादर हयांच्या मुलखाची जी वाटणी व्हायची त्यावेळी पाटील बावांनी जो मुलुख सुभेदारास दिला. त्या संबंधात सुभेदार मातोश्रीस लिहितात. ' राजश्री पाटीलबावांनी वतनी व इनामी सुध्दा नऊ लक्ष एकवीस हजार रुपयांचा मुलुख ठरवुन दिला. त्यापैकी तूर्त दोन लक्ष दहा हजारांचे महाल

---

176) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.। पा.324-325
पेशवे रेकॉर्ड पैकी

177) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.। पा. 324-325
पेशवे रेकॉर्ड पैकी

178) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.। पा. 325
पेशवे रेकॉर्ड पैकी

गढमुक्तेश्वर व उपाड दोन्ही महालांच्या सनदा करुन दिल्या. सनदात सायर व इनामी गाव वजा करुन पाठविले. त्यावरुन आम्ही उत्तर दिले की आमचे महालात दुसरा अंमल कसा चालेल त्यात सायर सुध्दा महाल लावून घावेत, नाही तर सनदा नकोत. व सनदा परत पाठवल्या. त्या त्यांनी ठेवून घेतल्या.[179] हयावर मातोश्रींनी उत्तर केले की, ' आधीच वाटणी वाजवीने राइने केली नाही. त्यामध्येही मामलतीत दुसरा अंमलराहुन, नित्य उठून कज्जाच राहील. त्यास निस्तुक महाल लावुन घेणे.[180] मातोश्रीच्या हया उत्तराने महादजी जे रुसले ते दोन लाखांच्या सनदा त्यांच्याकडेच राहिल्या. नऊ लाखांची निघालेली वाणी हवेतच विरुन गेली. हयामुळे वाटणी संबंधीचा दोष तुकोजींना देता येणार नाही. तर हयाबाबत तुकोजींना पाठिंबा देऊन त्यांची मागणी योग्य होती. असेच म्हणावे लागेल. होळकर-शिंदिच्या हया भांडणामुळे उत्तरेतील मराठा साम्राज्य दुर्बल झाले. आणि त्यांच्या हया भांडणाचा फायदा रजपुतांनी पूर्ण घेऊन मराठा सरदारांच्या मार्गात अडचणी निर्माण करण्याचे घोरण अवलंबिले.[181]

### 31) तुकोजीचे सहकार्य -

रजपुता विरुध्दच्या आक्रमणाकरिता तुकोजीरावांची मदत मिळविण्यास महादजी शिंदेंनी तात्पुरते नमते घेतले. जिंकलेल्या प्रदेशात अर्धा-अर्धा वाटा ठरला. तुकोजीरावांनी राजपुताविरुध्द काशीराव होळकरांच्या नेतृत्वाखाली सैन्य पाठविले होते.[182] वास्तविक होळकरांच्या मदतीनेच पाटण व मेडत्याचा विजय मराठयांना मिळाला. या दोन्ही युध्दाचे यश शिंद्याप्रमाणेच होळकरांनाही द्यावे लागेल. डी-बायनने तर मेडत्याच्या युध्दानंतर लगेच महादजींना लिहिले की, ' तुमचे फौजेकडून काही एक झाले नाही. होळकराकडील सरंजाम

---

179) ठाकुर वा.वा.हो.इ.भा.। पा.336
पेशवे रेकॉर्ड पैकी

180) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.। पा. 336, 337

181) सरकार फॉल भा.4 पा.10

182) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.। ले. 267 भा.2 पा. 343
सरकार फॉल भा.4 पा.30

नसता तर करोडो रुपयांचा कारखाना बरबाद होऊन बदनक्षा मुलुखभर होतो.' [183] हा डी-बायनचा अभिप्राय अतिशय बोलका आहे. पण हे सहकार्य दूदैवाने फार काळ टिकले नाही. हयानंतर तुकोजीरावांनी आपले सैन्य भरतपुराकडे परत बोलाविले.[184]

32) महादजी-शिंदेच्या चुका -

राजपुताण्यात मराठयांचा परत अंमल स्थापन झाल्यानंतर जोधपूर पूर्वीप्रमाणे शिंद्यांच्या ताब्यात आले. जयपुर व उदयपुर ही पूर्वापार होळकरांची ती पूर्वापार शिंद्यांची नसतांनाही ती आता त्यास अंकीत झाली होती.[185] हयाचा मनस्वी संताप होळकरांना होणे स्वाभाविक होते. यावेळी असेच म्हणावे लागेल की अलीबहादर खपले. होळकरांनी शिकस्त केली. तरीपण शिंदे एकमेवा द्वितीय झाले. देवदर्शनास जावे म्हणुन शिंदे दक्षिणेत गेले ते उत्तर त्यांनी परत पाहिली नाही.[186]

जानेवारी 1792 मधे महादजी शिंदे उज्जैयनीवरुन पुण्यास जाण्याकरिता निघाले असता जवळ जावुनही शिष्टाचार म्हणुनही अहिल्याबाईंना भेटले नाही. काही दिवसापूर्वीच अहिल्याबाईचा जावई राजश्री नय्याबा फणसे मृत्यु पावले होते.[187] नियमाप्रमाणे संतवास गावावरुन जातांना होळकरांच्या अधिका-यांना महादजींनी जकात कर देण्यास नकार दिला होता. हयामुळे अहिल्याबाईंनी संतापुन ' परत येईपर्यंत जिवित राहणार नाही.[188] असा शाप महादजींना दिला होता हया शापात काही अर्थ नसला तरी त्यांचा राग मात्र स्पष्ट होतो.

---

183) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 343
म.रि. 3 वि. भा.3
184) सरकार फॉल भा.4 पा.4
185) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 344
186) ठाकुर वा. वा. हो. इ. भा.1 पा. 344
187) सरदेसाई गो.स. ' मराठोंका नवीन इतिहास ' भा.3 पा. 218
188) सरदेसाई गो.स. ' मराठोंका नवीन इतिहास ' भा.3 पा. 218

### 33) महादजी दक्षिणेत परत -

आतापर्यंत पुण्यात पेशव्यांची सर्व कामे नानाच मुखत्यारीने करीत होते. नाना फडणीसांसमोर ब्र काढण्याची कुणाची हिंमत नव्हती. महादजीने पुण्यात दाखल होताच पेशव्याला त्याच्या अधिकाराची जाणीव करुन द्यायला सुरवात केली. ह्यामुळे नानांचा कारभार ' पुढे तिखट व मागे पोचट ' असा आहे ह्याची लोकांना जाणीव झाली. या बाबत सरदेसाई लिहितात, ' येथून तेथून शब्दावडंबर मसुदे करता करता कारकुन बेजार त्यागानाने प्रत्यक्ष कृती फार थोडी ' [189] महादजी येणार हे कळताच नाना फडणीसांनी कॉर्नवालीसकडे लिटलची पलटणे मागितली. ती मिळाली नाहीत म्हणुन परशुराम भाऊ व हरिपंताना पुण्यात बोलाविले. प्रसंग पडलाच तर तुकोजी होळकरांनाही बोलाविण्याचे ठरले.[190] महादजीने पुणे दरबारावर 7 कोटीची मागणी करताच [191] नाना फडणीसांनी 6 कोटी देणे काढले. तुकोजींचा ह्या मागणीला पाठिंबा होता.[192]

### 34) पेशव्यांचे धोरण -

नानासाहेब पेशवे रामजी अनंतास लिहितात, ' राजपुतामधे जाटाशी राजकारण राखुन एकासी स्नेह तर एकासी बिघाड एकदाच सर्वाशी कजिया करु नये.[193] थोरले माधवराव पेशवे लिहितात, ' मनसुबे वाजपणाचा प्रकार हरहुन्नरे, एकास बैसवावे, एकास उठा म्हणावे आपले वजन त्यावर पाडावे ऐसा समय आहे.' [194] नाना फडणीस लिहितात, ' परस्परे राजे रजवाडे यात फुट असल्याने यात सरकारचा उपयोग आहे.[195] नाना साहेबांचा विचार असा

---

189) म.रि.3 वि. 2 पा. 214
190) [illegible]
191) खरे वा.वा. ऐ.ले.सं. भा.9 ले. 3492 पा. 4632-33
192) खरे वा.वा.ऐ.ले.सं.भा.9 ले. 3492 पा. 4632-33
म.रि.3 वि. 2 पा. 388
हि.द.भा.2 ले. 93
193) शि.इ.सा.भा.3 ले. 70
194) ऐ.च.भा.2 पा. 115
195) ऐतिहासिक टिपणे भा.1 पा.3

होता, ' थोरले साहेबांचे (बाजीराव साहेब) चित्ती एक सरदार मातब्बर कर्नाटकात ठेवावे आणि आपण पुनियास राहावे ऐसा मान्स आहे.'[196] याच धोरणाला अनुसरुन त्यांनी दत्ताजी व जनकोजी उत्तरेत तर मल्हाररावला दक्षिणेत ठेवले. तुकोजीरावांनी स्पष्ट आरोप केला की, ' ' मजला देशी ठेवून कारभारी यांनी खराब केले.' [197] शत्रुच्या बाबतीत पेशव्यांचे ' फोडा व झोडा ' हे धोरण होते. हेच धोरण त्यांनी सरदाराबाबतही ठेवले. कोणताही सरदार आपल्यापेक्षा प्रबळ होणार नाही हाच पेशवा किंवा त्यांच्या कारभा-याचा उद्‌देश होता. इतिहासाचार्य याला दुजोरा देतांना स्पष्ट लिहीतात, ' सर्व पेशव्यांचा मुख्य हेतु स्वतःचे महत्व सर्वाहुन अधिक वाढविण्याचा होता. ' [198] पुरंदरे स्पष्ट आरोप करतांना म्हणतात. ' शिंदि-होळकर एकीचे परिणाम ओळखुनच त्यांच्यात सदैव बेकी कशी नांदिल याची पेशवे दरबार डोळयात तेल घालुन रात्रंदिवस चिंता करित होता. [199]

35) अहिल्याबाईंना संघर्ष पाहिजे होता काय ?

मातोश्री अहिल्याबाईंनाही शिंदि घराण्याशी वैर संघर्षाप्रत वाढवून युध्द करण्याची इच्छा नव्हती. त्या म्हणतात ' पहिले धनी होते त्यांनीही हया गोष्टी समजुनच जोडफळाचा सांधा सांधुन टाकला आहे...... भोसले राज्याचा दावा सांगतील, गायकवाड गुजराथ सांभाळुन राहतील हे उभयता सरदार ते दौलतीचे बरेच इच्छितील. कित्येकदा पाहिले. पहिले सुभेदार आणि राणोजी शिंदि यांनीच परित्तर केला आणि आताही ममता पुरस्कार हे उभयता सरदारच अर्थ, प्राण वेचतील, तितके दुस-यांकडून होणार नाही. याकरिता उभयता सरदारात श्रीमंतानी फुट पडु देवू नये.'[200]

---

196) पे.द.भा.28 ले. 141

197) हो.द.हि.व.ले.2 म.रि.3 वि. भा.2 पा.29
पारसनिस द.ब. (होळकर दरबारातील हिंगण्याची वकीली)

198) ऐ.प्र.पा.40 (ऐतिहासिक प्रस्तावना) राजवाडे वि.का.

199) पुरंदरे दप्तर भा.2 पा.8

200) म.द.बा. भा.1 ले.33
म.रि.3 वि. भा.2

तुकोजींनी उत्तरेत गेल्या बरोबर महादजींना वाटणी मागितली. मातोश्रींनी वाटणीबाबत लिहिले तेव्हा अहिल्याबाईंनी कळविले. ' आग्रह करावा तर तुम्ही घरी बसुन वाटा मागता पाटीलबावाबरोबर तुमचे कोण होते ? ज्याअर्थी चाकरी घडलीच नाही तेव्हा जे देतील ते घेऊन ओढ न करावी.'[201] पुढे ज्यावेळी 9 लक्ष 21 हजाराचा मुलुख सायर व इनामी गाव वजा करुन दिला तेव्हा त्या म्हणाल्यात, ' आधीच वाटणी वाजवीचे रुईने केली नाही. त्यामध्येही मामलतीत दुसरा अंमल राहुन, नित्य उठुन कज्जाच राहील. त्यास निस्तुक महाल लावून घेणे.[202]

29 डिसेंबर 1792 रोजीच्या पत्रात अहिल्याबाईंनी तुकोजींना लिहीले. ' आपसात फुट दिसोन आल्याने हलके पाहुन पडून कोणतीही गोष्ट सिध्दिस जावया आयास लागेल. त्याअर्थी त्यांनी तुम्ही एक विचारे चालावे हे उभयपक्षी चांगले. दोन्ही दौलतीचे भाऊपण आजकालचे नाहीत. लोभावर दृष्टी ठेवून त्यांनी तुम्हासी वकिली दाखवू नये. तुम्हीही त्यांची थोडक्या गोष्टीसाठी तोडू नये.' [203] अहिल्याबाईंनी युध्दापुर्वी होळकर-शिंदे हयांच्यात समेट होण्याचा कसोशीने प्रयत्न केला. ' सरकारातुन हयांच्यातील वाद मिटविण्यासंबंधी पत्रे लिहिली. पण नाना फडणीसांनी याकडे हेतुपुरस्पर दुर्लक्ष केले. शेवटी अहिल्याबाईंनी स्वत: लिहिले. ' कोणा एकाचा नाश झाल्यावर सरकारचेही नुकसान आणि लौकिकातही वाईट दिसेल म्हणुन सरकारातूनच पूर्ण विचारांती योग्य मार्ग काढणे जास्त उत्तम ' [204] अहिल्याबाईंना लाखेरीच्या संघर्षानंतर मात्र पेशव्यामार्फत समेट व्हावा हे मान्य नव्हते. ' श्रीमंताकडून समझोता करावा. त्यापेक्षा तो आपला भाऊ आहे. त्याचे व आपले एक विचार असावे. परस्पर समेट करुन घ्या हे योग्य ' [205] महादजी शिंदेचा मृत्यु दि. 12 फेब्रुवारी 1794 रोजी झाला असता मातोश्री अहिल्याबाई म्हणाल्यात, ' महादजी असते तर,

---

201) म.द.बा. भा.2 ले. 112
202) ठाकुर वा.वा. हो. इ.भा.1 पा. 336
203) चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले.186, 110, 111
204) म.द.बा. भा.2 ले.239
205) चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले.133

ते विचारी व दुरदृष्टीचे होते. झाल्या गोष्टी दुराग्रहाने आणि अविचाराने झाल्या हे समजुन सरकारात भाऊपणा पूर्वापार चालत आला तसाच राहुन सर्व गोष्टी योग्य पार पडल्या,' 206 आपसातील भाऊपणाचे संबंधच कायम राहावेत अशीच त्यांची भावना असल्यामुळेच दौलतराव शिंदिना वस्त्रे देतांना लिहिले. ' राजश्री दौलतराव शिंदिना सरदारीची वस्त्रे द्यावयाची आहेत ते चिरंजीव झाल्यावर द्यावी. यात भाऊणि यांची वहिवाट राहुन सरकार उपयोगीही आहे.207 वरील विवेचनावरुन स्पष्ट होते की अहिल्याबाईंनाही सशस्त्र संघर्ष अभिप्रेत नव्हता. त्याकरिता त्यांनी प्रोत्साहनही दिले नाही तर उलट परस्पर समेट होऊन पुर्वापार भाऊपणा चालावा अशीच त्यांची इच्छा शेवट पर्यंत होती.

### 36) संघर्ष तुकोजींना पाहिजे होता ?

जर तुकोजींना संघर्ष पाहिजे असता तर त्यांनी बनासच्या छाप्यानंतर शिंदिच्या सरदारांशी समेट केलाच नसता. त्यावेळी शिंदिच्या लष्कराची फार बिकट परिस्थिती झाली होती. ' शिंद्यांचे लष्करात रुपयाचे शेर अन्न व रुपयाच्या पाच पेंडया चा-याच्या झाल्या. शिंद्यांची फौज घायल झाली.' 208 तहाचे बोलणे सुरु झाले असता चिटणीसांचे म्हणणे ' आपण धनी आम्ही सेवक पूर्वीपासून मुलखाच्या वाटणी वाटण्याचे शिरस्ते, त्याप्रमाणे अंतरवेद वगैरे घेऊन आम्ही ताबेदार सुभेदारांनी एखादी मोहीम करावी. आम्ही चाकरीस हजर.209 सुभेदारांनी संमती दिली. बेलभंडार व त्यांची उदी होऊन परस्परे सफाई झाली.210 तुकोजीरावांची अवस्था ही संघर्ष करण्याची नव्हती. प्रकृती साथ देत नव्हती. सरकारने मध्यस्थी करुन भांडण मिटवावे.211 अशी त्यांची इच्छा होती. महादजींच्या मृत्युनंतर दौलतराव शिंदिच्या वारसदारीला सर्वप्रथम मान्यता देणारे तुकोजीरावच होते. 212

---

206) होळकर दप्तरातील हिंगण्यांची वकिली ले.7
207) ' चंद्रचुड दप्तरातील निवडक उतारे ले. 133
208) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा.348
भागवत अ.ना.हो.इ.सं.भा.6 पा.72
209) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा. 348 हो.इ.सं.भा.6 पा.72
210) हो.इ.भा.1 ले. 385
211) ग्रँट उफ व्हॉ.2 पा. 186
212) हो.इ.भा.1 ले. 385

सरदेसाई लिहितात, ' महादजींना आपल्याच मराठा बांधवा विरुध्द सैनिक शक्तीचा उपयोग उचित वाटत नव्हता. इ.स. 1778 मधे एकदाच कोल्हापुरच्या राजाविरुध्द महादजींनी युध्द केले. बाकी सर्व संघर्ष मराठयांच्या शत्रुशीच केले होते.[213] लाखेरीच्या संघर्षाचा शिंदिंनी शोक दिवस मानला.[214] नातू लिहितात. ' चिटणीसांना विजय दर्शक तोफा सोडण्याची परवानगी दिली नाही, उलट हया संघर्षाबद्दल महादजी म्हणालेत, ' आपसात कटकट करुन जन्माचे भाऊपणात पाणी घातले । तोफा सोडाव्या असे वाटत नाही.'[215] हा संघर्ष ओढवून घेणा-या गोपाळराव भाऊला भेलसा येथे कैदेत ठेवले.[216] होळकरांसोबत सशस्त्र संघर्ष महादजी राजकीय चुक समजत होता. कारण ती त्यांच्या महत्वाकांक्षी योजनेला घातक होती.[217]

## 37) संघर्षाचे मूळ कोणते ?

वरवर पाहता लाखेरीच्या युध्दास मल्हारराव होळकर आणि गोपाळराव भाऊच जबाबदार आहेत असे वाटत असले तरी पण त्यात फारसे तथ्य नाही. सर जॉन माल्कम तर हया संघर्षाला ' दोन घराण्यातील संघर्षापेक्षा, दोन मालकांच्या नोकरातील संघर्ष मानतो.'[218] वासुदेव शास्त्री ख-यांच्या मते ' शिंदि हे कर्ते व शुर सरदार खरे पण ते इतके डोईजड होऊन आतापर्यंत राज्यनाशास कारण झाले आहेत. ते होळकरांच्या मदतीमुळेच होत. त्याकरिता ही डोइजड झालेली शिंदि-होळकरांची जोडी फोडून त्या दोन सरदारात किंचित तेढ निर्माण करावी व दोघांपैकी कोणातरी एकास नेहमी आपल्या लगामी लावुन ठेवावे. याप्रमाणे मसलत

---

213) न्यु.ही.व्हॅ.3 (सरदेसाई) पा.250
214) न्यु.ही.व्हॅ.भा.3 फ.250
215) नातु पा. 258-259
ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा. 349
216) नातु पा. 258-259
ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा. 349
217) सरकार फॉल भा.4 पा.80
218) माल्कम भा.1 पा. 173

योजून तिच्याच अनुरोधाने नाना आमरण वागत गेले.[219] ह्या सोबतच वासुदेव शास्त्री खरे यांनी ऐतिहासिक लेख संग्रहात कबुल केले की, ' तुकोजी होळकरास पूर्वीपासून नानाचे पाठबळ होते.' [220] राज्याच्या बचावासाठी त्या दोघा सरदारात दुही उत्पन्न करणे नानास भाग पडले व तोच त्या प्रसंगात उपाय होता.' [221] म्हणजेच नानांनी होळकर शिंद्यांमधे दुही निर्माण केली होती ही गोष्ट खरे कबुलच करीत नाहीत तर त्यांचे समर्थनही करतात. शिंद्यांची जबरदस्ती कमी होवून त्यांना शह बसावा म्हणून तुकोजींशी सख्य जोडून भोसले, गायकवाड, टिपू इंग्रजाकडे आपली स्वतंत्र राजकारणे राखलीत. होळकर व नानाचे सख्य मात्र आमरण टिकले. नाना व होळकरांच्या ह्या सख्यात नाना व शिंदे ह्यांच्यामधील स्पर्धेचे बीज साठविले आहे.[222] शिंदे पुण्यात येतातच ' तसाच निर्वाणीचा प्रसंग पडला तर मात्र होळकरांना दक्षिणेत आणावे असा बेत नानांनी ठरविला.' [223] लाखेरीच्या लढाईचा नानांना मोठा धक्का बसला. तुकोजींची झालेली दुर्दशा पाहुन शिंदे आता आपलीही गठडी वळणार आणि दिल्लीच्या बादशहाप्रमाणे पेशवे ही शिंद्याच्या हातचे मेणाचे बाहुले बनणार असे त्यांना भय पडले.[224]

बारभाई कारस्थानातील प्रमुखा पैकी प्रबळ तुकोजी व महादजीच उरले होते. पैकी नांनानी तुकोजींना आपल्या नाही लावल्यामुळे महादजीच काय तो एकमेव प्रबळ सरदार उरला होता. नानाने आपल्या धोरणाला अनुसरुनच लाखेरीवर डाव टाकला पण तो अंगलट येताच त्वरीत महादजीशी समेट करुन आपला बचाव केला.[225]

- - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - - -

219) खरे वा.वा. वा. फ.च. पा.49
खरे वा.वा. ' अधिकार योग ' पा. 45-46
220) खरे वा.वा. ऐ.ले.सं. भा-9 पा.4605
221) खरे वा.वा. ना.फ.च. पा.50
222) खरे वा. वा. ना. फ. च. पा. 137
223) खरे वा.वा. ना.फ.च. पा. 143
224) खरे वा. वा. ना. फ. च. पा. 152
225) पुणे अखबार भा.3 ले. 220

नानांच सत्तेश्वर जीवापाड प्रेम होते. त्यासाठी त्यांनी आधी महादजीशी ' फडणीसी माझी व सरदारी तुमची ' असा करार केला महादजींच्या मृत्युनंतर याच कराराची पुनरावृत्ती दौलतराव शिंदेशी केली.[226] नानाने दौलतराव शिंदे व बाजीरावाची फडणीसी स्वतः घेतल्याचे पत्र हरिपंतास लिहिले.[227] त्यातही दत्तक घेईल त्यालाच फडणीसी घावी असे कलम लिहिले.[228] हयावरुन नानांचे सत्तेवरील जीवापाड प्रेम स्पष्ट होते. केवळ स्वतःच्या स्वार्थाकरिताच नाना फडणीसांनी शिंदे-होळकरात तेढ निर्माण केल्याची स्पष्ट कबुली नानांचे चरीत्रकार वासुदेवशास्त्री खरे हयांनी दिलेली आहे.

लाखेरीच्या संग्रामासाठी आवश्यक पार्श्वभूमी व मानसिक तयारी नानांनीच केली होती हे स्पष्ट होते. शिंदे-होळकरांना उत्तरेत गुंतवुन दक्षिणेत आपले पद व सत्ता सुरक्षित ठेवण्यासाठी रचलेल्या नानांच्या कारस्थानाचे लाखेरी हे दृश्य स्वरुप होते.

**38) तुकोजीराव नाना फडणीसांच्या कलाने कां वागले ?**

तुकोजींना अहिल्याबाईस बाजुस सारुन दौलत घेण्याची इच्छा होती. अहिल्याबाई म्हणतात. ' केवळ तुकोजीबावाच दौलतीचे धनी आणि मी कशात काही नाही असे समजु नका............ त्यांनी निमक हरामीचे फंद आम्हासी केल्यास पुढे सुखरुप दौलत करु म्हणतील तर त्या गोष्टी दुरापास्त आहेत.[229] तुकोजींना नानांचा पाठिंबा होता. नानांनी महादजीस लिहिले. ' घोडे एका हाती लगाम एकीकडे असे जातीचे सरदारीत खावंदाचे काम व सरदारींचे स्वरुप होते असे नाही.' [230] यावर महादजी म्हणतात, '

---

226) पारसनिस द.ब. जुन्या ऐतिहासिक गोष्टी भा.। पा. 14-15
227) पारसनिस द.ब. ऐतिहासिक टिपणे भा.6 पा.2
पु.रे.कॉ. भा.2 पा. 234
ना.रा. पा. 180
228) पे.द.स. 5 भा. (इ.स.) पा. 172
डॉ. राम इंगळे पा. 80
229) राजवाडे वि.का. म. इ.स. भा.3 ले. 724
म.रि.उ वि.
230) राजवाडे वि.का. म.इ.सा.भा.3 ले. 755
म.शि.का. ले. 274

' होळकरांचे घरची चाल सर्वांनास माहीत आहे. कै. सुभेदार असता गौतमाबाई कारभार करीत होती. ती वारल्यावर अहिल्याबाई वहिवाट करु लागली. ही चाल त्यांचे घरची पहिल्यापासोन आहे नवी नाही.' 231 शिवाय तुकोजींना उत्तरेत वाटा हवा होता. आम्हास हिंदुस्थानचा वारसा यावज्जीव सोडायचा नाही.[232] हया दोन्ही गोष्टी नानांच्या मदतीने मिळविता येतील असे वाटल्यानेच तुकोजी नानांच्या कहयात गेले. खरे लिहितात. ' पेशवे व नाना हयांच्या राजकीय दर्जात महदंतर होते. पेशवे मराठी राज्याचे खावंद होते तर नाना त्यांच्या पदरचे यःकिश्चित कारकुन ' 233 नाना आरोप टाळण्यास युक्तिवाद करतात पण तो खरा नाही. पेशवा अज्ञान असल्यामुळेच त्यांचे अधिकार् मुखत्यारीने नाना वापरत होते ही गोष्ट सुर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे. ' पेशव्यांचा पेशवा ' असे त्याचे स्थान होते.[234] शिंदे-होळकर राज्याचे पूर्वीपासून आधारस्तंभ होते. त्यांना कायम ठेवणेच नव्हे तर मजबुत करणे ही काळाची गरज होती. पण आपल्या पदाच्या लालसेने चतुर अशा ' पेशव्याच्या पेशव्याला ' सारासार विवेक बुध्दीने दगा दिला. ' मराठा तितुका मेळवावा । महाराष्ट्र धर्म वाढवावा ' हया समर्थ रामदास स्वामीच्या ओजस्वी महामंत्राचा विसर पडला.

39) तुकोजीराव उत्तरेतुन परत -

लाखेरीच्या पराभवानंतर तुकोजीराव परतले येतांना रागाने उज्जैनी शहर लुटुन इंदुरास पोहचले. ब-याच दिवसापर्यंत मातोश्रींच्या समक्ष जाण्याची तुकोजीरावांना हिंमतच झाली नाही. पुणे दरबाराकडून या दोन सरदारांच्या समेटाचे प्रयत्न सुरु झालेत.[235] श्रीमंताकडून बळवंत काशीपात्रे, पाटील बुवाकडून नारो कृष्ण, देवराव हिंगणे पुण्याहुन रवाना झाले.[236] तर अहिल्याबाईंना पुण्याहुन त्यांचे वकील दादाजी गंगाधरा मार्फत समेट करविला.

-----------------------------------------------

231) म. इ.सा. भा.3 ले. 753
म.शि.का. ले. 236
232) हिंगणे दप्तर भा.2 ले.93, खरे ग.ह.
233) ना.फ.च. पा. 247 खरे वा.वा.
234) पेशव्यांची बखर पा. 129, साने का.ना.
235) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा.35।
236) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा.35।
म.रि.उ वि. भा.3 पा. 392

' राजश्री दादाजी गंगाधर यांनी पाच लक्ष रु. अंतस्थ व दरबार खर्च दोन लक्ष, एकुण सात लक्ष रुपये करार करुन, सफाई राजश्री पाटील बुवांशी ऑगस्ट 1793 त केली.' 237

**40) नवीन मोहिमेवर होळकरांची नियुक्ती -**

सर्वांना गुंतवुन ठेवण्याच्या हेतुने सप्टेंबर 1793 मधे पुण्यावरुन सांगावा आला की, ' होळकरांनी पतियाळची मोहिम करावी अथवा गुजराथ प्रांती जावे नाहीतर श्रीमंता जवळ असावे.' 238 यावर अहिल्याबाई बोलल्या. ' आम्ही पतियाळची मोहीम करु. परंतु आम्हास मागे मुलुख कोठ आहे ? रसद कशी येईल. पाय ठेवायला जागा नाही.' यावर हिंगण्यांनी कळविले. ' घरचा बंदोबस्त करावा. पागा व सरंजामी इतके ठेवुन खर्च तोडावा. दहा पंधरा हजारानिशी राहुन, कारभारी कोण करणे तो करावा. सोबत्याशी विरुध्द दाखवू नये. सरकार लक्ष असावे.' 239 नानांनी पतियाळा मसलत निर्वेध शेवटाला जाणार नाही आणि याटणी संबंधाने उगाच याद वाढतील असे यादुन गुजराथच्या स्वारीवर जाण्यास सांगितले. 240 त्याप्रमाणे ता. 25 डिसेंबर 1793 मधे तुकोजींनी मोहिमेचा निश्चय करुन काशीराव होळकरांच्या नेतृत्वात आघाडीची फौज गुजराथच्या दिशेने रवाना केली. परंतु या मोहिमेला पाटील बावांच्या मृत्युने मोठे विघ्न येऊन ही मोहीम बारगळली. पाटील बावांचा मृत्यु ता. 12 फेब्रुवारी 1794 रोजी झाला. 241

नाना फडणीसांचे तुकोजींना पत्र आले. ' महादजी शिंदे यास देवाज्ञा झाली. यास्तव गुजराथचा विचार राहिला आता तुकोजींनी देशी पुण्यास यावे. 242 सुभेदार शरीराने व अधिक मनाने खंगले होते. कर्ज चक्रवाढ व्याजाने वाढल्यामुळे त्याच्यांपुढे आर्थिक विवंचना

---

237) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा.351
म.द.बा. भा 1+2, ले. 251, पा. 223-224
238) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 251
म.द.बा. भा. 1+2 ले. 251, पा. 223-224
239) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा.251
म.द.बा.भा. 1+2 ले. 352 पा. 223-224
240) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा. 352
म.री.उ वि. भा.2 पा. 37-38
241) ठाकुर वा.वा.हो.इ.भा.1 पा.353
म.द.बा. भा. 1+2 ले. 260 पा. 238
242) ठाकुर वा.वा. हो.इ.भा.1 पा. 353
म.द.बा. भा.1+2 ले. 260 पा. 238

होती. त्याचमुळे त्यांचा मुक्काम इंदोर महेश्वराला सतत चालु होता. याच सुमारास त्यांची पत्नी रखमाबाईचा मृत्यु झाला.[243] याचाही परिणाम त्यांच्या मनावर आणि शरीरावर झाला.

शेवटी 1794 च्या जुलाईच्या तिस-या आठवडयात शकुनाची वस्त्रे व सैन्य देऊन अहिल्याबाईनी पुण्यास जाण्यास तुकोजीरावांना निरोप दिला.[244] शेगाव, नागलवाडी, सेंधवा, भाळनेर, चंदवासा करीत डिसेंबरात तुकोजीराव पुण्यात येऊन दाखल झाले. पुण्यात आल्यावर ता. 11 डिसेंबर 1794 रोजी त्यांनी श्रीमंताची भेट घेतली.[245]

41) तुकोजींची शेवटची कामगिरी - खर्ड्याचे युध्द -

निजामाकडे मराठयांची चौथाईची रक्कम जवळपास 3 कोटी रुपये इतकी तुंबली होती. शिवाय 35 लक्ष रुपये वार्षिक उत्पन्नाचाही प्रदेशही मराठयांना देण्याचे निजाम टाळत होता. ही रक्कम मराठयांना देण्यापेक्षा सैन्यावर खर्च करुन त्यांच्या विरुध्द युध्द करण्याचा सल्ला निजामाचा दिवाण मुशरुलमुल्क याने निजामाला दिला.[1] त्याप्रमाणे मोठया फौजेसह निजाम सन 1794 च्या नोव्हेंबर मधे हैद्राबाद वरुन निघून बेदरला आला. निजामाच्या मनसुबा स.माधवराव पेशव्यांना कळताच त्यांनी सर्व सरदारासह निजामाला तोंड देण्याचा निश्चय करुन शिंदे, होळकर भोसले, निंबाळकर, परशराम पंत श्रीनीवास, गायकवाड, घोरपडे, दरेकर, फडके, निंबाळकर, दहीगावकर, चव्हाण, ढमढेरे, पवार, मोहिते, रणदिवे, भोइटे, जाधव, सितोले व घाटगे इ. सर्व सरदारांना तातडीने पुण्यास येण्याविषयीची पत्रे पाठविली.[2]

---

243) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 351

244) ठाकुर वा.वा.हो.इ.भा.1 पा. 355
म.द.बा. भा. 1+2 ले. 262 पा. 245

245) ठाकुर वा.वा. हो.इ.भा. 1 पा. 355
म.री. 3 वि. भा.2 पा. 40

246) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 357

247) मराठी दप्तर रुमाल भा.2 ले. 3 पा. 120
ठाकुर वा. वा. हो. इ. भा.2 पा. 357

सुमुहुर्तावर श्रीमंत पेशवे माधवरावाची स्वारी डेरे दाखल झाली. नजराणे झालेत.[3] निजाम मोहरीचा घाट उतरुन खडर्याच्या किल्ल्या नजीक खैरा नदीजवळ मोहरील गावी आला. मसलत लांबणीवर पडु नये म्हणुन शिंदे-भोसले निजामास अडविण्यास पुढे गेले. होळकरही पुढे सरसावले.[4] होळकर, शिंदे, भोसले, परशुराम भाऊ पटवर्धन इत्यादींनी निजामाच्या सैन्यावर जोरदार आक्रमण केले.[5] एकाच दिवसात युध्दाचा निर्णय लागुन मराठयांचा विजय झाला. तर नबाबाला खडर्याच्या किल्ल्यात आश्रय घ्यावा लागला.[6]

दुस-या दिवशी पेशवे सवाई माधवराव नाना फडणीस आणि इतर सर्व सरदार मंडळी तुकोजीरावांकडे मोठया समारंभाने आली. त्यांनी पोशाख, हत्ती, घोडा, तलवार, कट्यार, शिरपेच कंठी दिली. पेशवे तुकोजीरावांच्या आदर सत्काराने भारावुनच आपल्या डे-यात परतले.[7] हयानंतर पेशवे निजामात तह ठरला.

42) सवाई माधवरावांचा मृत्यु -

खडर्याच्या युध्दात विजय संपादुन मोठया डौलाने सवाई माधवराव पुण्यात ता. 1 मे 1795 रोजी दाखल झाले.[8] खडर्याच्या युध्दात मराठयांचा विजय झाल्याने मराठयाच्या आकांक्षा सतेज होऊन तरुण पेशव्यांच्या नेतृत्वाने पुनः सर्व राज्याची घडी नीट बसेल असा सुमार दिसुन सर्व माधवरावांकडे मोठया अपेक्षेने बघु लागले. पण नेमके हयाच वेळी दुर्देवाने मराठयांवर प्रहार केला. मराठयांचा हा योग्य तरुण पेशवा श्रीमंत सवाई माधवराव साहेब

---

3) मराठी दप्तर रुमाल भा.2 ले. 3 पा. 121
ठाकुर वा.वा. हो. इ. भा.1 पा. 357

4) ठाकुर वा.वा. हो. इ. भा. 1 पा. 357
मराठी दप्तर रुमाल भा.2 ले.4 पा. 122

5) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 358
मराठी दप्तर रुमाल भा.2 ले.4 पा. 123
सी.पी.सी. भा.11 नं. 1102

6) म.री.3 वि. भा.3 पा.5
मराठी दप्तर रुमाल भा.2 पा. 125
सी.पी.सी. भा.11 नं. 1105

7) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.1 पा. 358

8) ठाकुर वा. वा. हो. इ. भा. 1 पा. 358

शके 1717 आश्विन शुध्द 14 रोजी म्हणजेच ऑक्टोबर 1795 रोजी अपघाताने अचानक मृत्यु पावले.[9] आणि मराठयांचे आशास्थान तेजाने तळपण्यापूर्वीच अंधारात गडप झाले. मराठा राज्यात एकच बेबंदशाही गाजली.

43) तुकोजींचा मृत्यु - ता. 15/8/1797

पेशवा सवाई माधवरावांच्या मृत्युनंतर पेशवे पदावर कोणाला बसवावे हया बाबत बरीच सुंदोपसुंदर गाजली होती. शेवटी ब-याच घडामोडी नंतर बाजीराव दुसरे पेशवा झालेत.[10]

तुकोजीराव ब-याच दिवसापासुन पुण्यात आजारी होते. त्यांच्या विनंतीवरुन त्यांच्या समोरच त्यांचा मोठा मुलगा काशीराव होळकरांना ता. 29 जुन 1797 रोजी सुभेदारीची वस्त्रे मिळालीत.[11] याच सुमारास दिवसेंदिवस तुकोजीरावांची प्रकृती खालावत गेली. काशीराव होळकरांना महेश्वरास पत्रे गेलीत की, ' जेवीत असला तर पाणी येथे येऊन घ्यावे ' शेवटी श्रावण वघ 8 मंगळवार ता. 15/8/1797 रोजी तुकोजीरावांचा मृत्यु झाला.[12] या संबंधी पुण्यावरुन गेलेले पत्र असे ' श्रावण व 18 मंगळवार दीड प्रहर दिवस प्रातःकालचा विशेष श्रीमंत सुभेदार यांचे शरीर क्षीण होतेच. या पाच सात रोजात शौच्याचा उपद्रव जाला. कफही झाला. उपाय होतच होते गुणास न येता आज येच वेळेस प्राणोत्क्रमण झाले. श्री. काशीराव रान्नीध आहेत. श्री मल्हारराव काल भेटून गेले. ऐसा गरीब नवाज गरीब गुरीबांचे चालवणारा पुरुष थिरळाच. श्रीइच्छेप्रमाणे याउपरी दहनाची तर्तूद होत आहे.[13]

---

9) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.2 ले. 1 पा. 1
म.रि. 3 वि. भा.3 पा. 5

10) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.2 प्र.1 पा. 5
11) ठाकुर वा.वा. हो.इ. भा.2 प्र. 1 पा. 4
12) म.रि.3 वि. भा.3 पा. 54
ठाकुर वा.वा. हो. इ. भा.2 पा. 6
13) म.रि.3 वि. भा.3 पा. 54
ठाकुर वा.वा. हो. इ. भा. 2 पा.6

सुभेदार तुकोजीरावांच्या अशौच्यातच भाऊबंदकी जन्माला आली. त्यांची क्रिया काशीराव रावांनी वेगळी केली व सवाई मल्हाररावांनी एकेच ठिकाणी (पुणे) वेगळी केली. त्याचप्रमाणे सपिंडयाही दोन झाल्या. पुण्यास जेथे सुभेदार तुकोजीरावांचे दहन झाले त्याच स्थळी दोन शिवलिंगे स्थापन झाली. ती हया पिता पुत्राची (तुकोजी आणि मल्हारराव) होत. पुणे येथे होळकर पुलाजवळ जी छत्री आहे तीत ही लिंगे आहेत. हया छत्रीचा बंदोबस्त इंदुर दरबारा कडून होतो.[14]

---

14) ठाकुर वा.वा. हो. इ. भा.2 पा. 11

*****

## प्रकरण - सातवे

## तुकोजी होळकरांच्या कामगिरीचे समालोचन

पेशवाईच्या उत्तर काळात कर्तुत्ववान मराठा सरदारांमध्ये होळकर, शिंदि आणि पवार हया त्रिमुर्तींची गणना होते. हया सरदारांनी अनुक्रमे इंदूर, ग्वाल्हेर आणि धारदेवास या ठिकाणी अनुक्रमे घराण्यांची सत्ता स्थापन केली. या सरदारांना पैलू पाडण्याचे श्रेय थोरले बाजीराव पेशवे यांना आहे. थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या काळात मल्हारराव होळकरांचा प्रवेश मराठा दरबारात होवून त्यांच्या कर्तबगारीने त्यांना मराठा दरबारात महत्व प्राप्त झाले. मल्हारराव होळकरांनी केलेल्या कामगिरीचा आढावा पहिल्या प्रकरणात सविस्तर केला आहे. बुंदेलखंडाच्या मोहिमेत बाजीराव पेशव्यांना मल्हारराव होळकरांकडून बहुमोल मदत मिळाली. माळवा विजयाचे श्रेय वर उल्लेखलेल्या त्रिमुर्तींना आहे. 31 नोव्हेंबर 1731 रोजी थोरल्या बाजीरावाकडून मल्हारराव होळकरांना माळव्याची सनद मिळाली. आणि पेशव्यांच्या उत्तरेकडील राजवटीचे पहिले मोठे सरंजामदार होळकर, शिंदि ठरले? पशव्यांच्या उत्तरेकडील राजवटीचे दोन आधारस्तंभ मल्हारराव होळकर आणि राणोजी शिंदि हाते. मल्हारराव होळकराने थोरल्या बाजीराव पेशव्यांच्या कारकीर्दीत प्रत्येक युध्दात आणि मोहिमेत जातीने भाग घेऊन मदत केली. निजामाचा भोपाळ इथे पराभव करण्यात मल्हारराव होळकरांचा सिंहाचा वाटा होता.[2]

मल्हारराव होळकराने राजपुतान्यात बुंदी येथे बुधासिंगाला परत गादीवर बसविले. आणि होळकर, शिंदेचा राजपुतान्यात प्रवेश झाला. बाजीरावाच्या मृत्यूनंतर दि. 13 जून 1740 रोजी नानासाहेब पेशवा झाले. इ.स. 1754 च्या कुंभेरीच्या युध्दात मल्हाररावाचा एकुलता एक मुलगा खंडेराव होळकराला दि. 17 मार्च 1754 रोजी जंजालेची गोळी लागुन मृत्यू पावला.[3]

---

1. प.द.खं.30, पा. 318,
   पहिले बाजीराव - बहरे, पा. 162
2. य.रि.भा.1, पा. 371,372
3. हो.इ.सा.भा.3 ले.205

14 जानेवारी 1661 रोजी पानिपतच्या तिस-या युध्दात मराठयांचा पराभव होऊन मराठेशाही संपुष्टात आल्याचे परवर वाटत होते. शिवाय पानिपतच्या तिस-या युध्दात कुचराई केल्याचा आरोप सर्वच इतिहासकार करतात. कारण पानिपतचा खलनायक नजीबखानाला मल्हाररावाने मानस पुत्र मानले होते. मल्हाररावाचे धोरण जगा आणि जगु द्या असे दिसते. हेच धोरण मल्हारावांच्या मृत्यूनंतर तुकोजी होळकरांनी सुरू ठेवले. त्याचा मात्र इतिहासावर फार विपरीत परिणाम झाला. नानासाहेब पेशव्यांनी उत्तरेची कामगिरी मल्हाररावावर सोपविली. कारण पानिपतानंतर केवळ, तेच एकमेव जेष्ठ, श्रेष्ठ अनुभवी मुत्सद्दी राहिले होते. मल्हारराव झांशीजवळ आलामजूर येथे कानाच्या दुखटयाने दि. 20 मे 1766 रोजी मृत्यू पावले.[4] त्यांच्या मृत्यूनंतर कारभार त्यांचा नातू (खंडेराव - अहिल्याबाईंचा पुत्र) भालेराव होळकरांकडे आला. पण भालेराव किंचीत वेडसर होता.[5] हयामुळे मालेराव दौतीचा कारभार करू शकतील की नाही याबद्दल स्वतः मल्हारराव साशंक होता. आणि म्हणूनच भालेरावांचा हात आपला नातलग आणि आपल्या कर्तबगारीने मल्हारावाचा विश्वास व प्रेम संपादन करणा-या तुकोडी होळकराच्या हाती दिला. तुकोजींनी मुलखगीरी करावी आणि कारभार अहिल्याबाईंनी करावा असे ठरले. याबाबतचे महादजी शिंदेचे पत्र अतिशय बोलके आहे 'ते लिहितात' होळकरांच्या घराची चाल सर्वत्र माहितीच आहे. कै. सुभेदार असता गौतमाबाई कारभार करित होती. ती वारल्यावर पुढे अहिल्याबाई करू लागली, ही चाल त्यांचे घरची पाहिल्यापासोन आहे नवी नही.[6] म्हणजेच पर्यायाने तुकोजींना होळकरशाहीची वस्त्रे मिळाली तरी सर्व कारभाराचे अधिकार मात्र अहित्याबाईंच्याच हातात होते. केवळ मोहिमेची जबाबदारीच तो काय तुकोजीरावांकडे होती. तुकोजी होळकर आणि अहिल्याबाई समवयस्क होते.

तुकोजीरावांची कारकीर्द इ.स. 1767 ते 1797 पर्यंत 30 वर्षपर्यंत होती. त्यौपैकी शेवटची दोन वर्ष ते पक्षाघाताच्या विकाराने अंथरूणावरच खिळून होते. तुकोजींच्या 28 वर्षाच्या संपूर्ण कारकीर्दीचा आढावा प्रस्तुत प्रबंधात घेऊन त्याचे समालोचन यथाशक्ति करण्याचा प्रयत्न करित आहे.

---

4. रा.ख. 13, ले. 15,22.
5. धर्मभास्कर मे,जून 1975 अंक 1-2 पा. 94.
6. म.शि.का.ले. 236

मल्हाररावाने मृत्यूपूर्वी भालेरावाचा हात तुकोजीरावांच्या हाती दिला.[7] यावरून तुकोजीरावांवर मल्हाररावांची किती अगाध विश्वास होता हे स्पष्ट दिसून येते. मल्हाररावांची उत्तरक्रिया झाली. दहाव्या दिवशी पिंडास कावळा शिवेना, भालेरावाने रघुनाथरावाने पाणी सोडूनही पिंडास कावळा स्पर्श करीना. शेवटी तुकोजीरावाकडून पाणी सोडविले आणि पाणी सोडताच काकस्पर्श झाला.[8] ही सर्व माहिती प्रथमच समोर येत आहे.

मल्हाररावांच्या मृत्यूनंतर त्यांचा दिवाण तात्या उर्फ गंगाधरपंत चंद्रचूडाच्या साह्याने रघुनाथरावाने होळकरांची सरदारी जप्त करण्याचा घाट घातला होता. ती वेळ आणिबाणिची असल्यामुळे बासडा खांदयावर टाकीला असा पाहिजे असल्याने तुकोजी होळकरास गादीवर बसविण्याचे ठरले. त्याप्रमाणे तुकोजीरावास उदेपुरास तातडीची पत्रे गेलीत की, 'फौज जेथील तेथे मुस्तकीम ठवुन तुम्ही जेवीत असल्यास पाणी प्यायला आम्हापासी यावे'[9] यामुळे आपोआप राघुनाथरावाचे कारस्थान अपयशी झाले.

तुकोजीरावांचे खरोखरच दत्तक विधान झाले होते की नाही या प्रश्नाच्या उत्तराचा गाभा दुस-या प्रकरणात दिसून येईल. तुकोजींचे कायदेशीर दत्तकविधान झाले नसले तरी मल्हारराव त्यांना आपला पुत्रच मानित. तत्कालीन प्रत्येक कागदपत्रातही तसाच स्पष्ट उल्लेख आढळतो. पेशव्यांच्या कागदपत्रातही 'तुकोजी बिने मल्हारजी होळकर' असाच होत होता. त्यांचा शिक्काही अहिल्याबाईचया विद्यमानाने 'श्री म्हाळसाकांत वरणी तत्पर मल्हारजी सुत तुकोजी होळकर'[10] असा तयार झाला.' जेजुरीच्या खांबावरही असाच उल्लेख आहे'.

तुकोजीरावाला अहिल्याबाईला बाजूला सारून दौलत करण्याची तीव्र इच्छा होती. परंतु अहिल्याबाईंनी याचा कसून विरोध केला. त्या लिहितात, ' केवळ तुकोजीच दौलतीचे धनी मी कशातच काही नाही असे समजू नका, त्यांनी निमकहरामीचे फंद आम्हासी

---

7. हो.इ.सा.भा.ह. प.28
8. हो.इ.सा.भा.ह. पा.28
9. हो.इ.सा.भा.ह. पा.31
10. म.रि.ऊ.वि.भा.2, पा.6

केल्यास सुखरूप दौलत करू म्हणतील तर त्या गोष्टी दुरापास्त' 'हयात सर्व दुःखाला बाजूला सारून अहिल्याबाईची राजकारणपती जिद्य दिसून येते.[12] हे मला कितपत योग्य आहे याचा उलगडा प्रस्तूत प्रबंधात केला आहे.

मल्हाररावाच्या मृत्यूनंतरही होळकरांचा सुंम जळाला तरी पिळ कायम होता. काम न करता त्यांना वाटा हवा होतो. तेंव्हा तुकोजींना अहिल्याबाईंनी फटकारले.[13] तुकोजीरावांच्या कर्तुत्वाला लगाम घालण्याचे कृत्य अहिल्याबाईंनी केले. नाना फडणीसाचा तुकोजीला पाठिंबा होता. याबाबत नाना फडणीसाचा तुकोजीला पाठिंबा होता. याबाबत नाना फडणीसाने महादजी शिंदेला लिहिलेले पत्र मोठे मार्मीक आहे. त्यावरून होळकरांच्या कारभाराचे स्वरूप कसे होते हे दिसून येते. 'घोडे (तुकोजी) एकाच्या हाती आणि लगाम (अहिल्याबाई) एकीकडे अशाने सरदारी कसी चालेल.[14] पण हे मत महादजींनही मान्य नव्हते. तुकोजीरावाच्या कामगिरीला अहिल्याबाईकडून तितकेसे आर्थिक पाठबळ मिळाले नाही. पैशाबाबतचा सर्व व्यवहार अहिल्याबाईंच्याच हातात होता. 'अहिल्याबाई आम्हास खर्चास देत नाही'[15] असे तुकोजींचे सतत म्हणणे होते. तुकोजींना जमा खर्चाची सांगड कधीच घालता आली नाही आणि म्हणून त्यांना सदैव पैशाची चणचण जाणवत असे.

अहिल्याबाईचे म्हणणे की, 'मी मल्हाररावाची सून आहे दिला तुकडा खावून राहणार नाही. मनात आणील त्याला सवाई तुकोजी करून दाखवीन'[16] यावरून अहिल्याबाईंचा आर्थिक बाबतीत तर तुकोजींचावर अजीबात विश्वास नव्हता असेच स्पष्ट होते. वेळ पडली तर तुकोजीला बाजूला सारून नातू (मुलगी मुक्ताबाई हीचा मुलगा) नथ्याबा फणसेला दत्तक घेण्याचा होता. तसा ठरावही पेशव्यांकडून करून घेतला.[17] हया विधानावरून अहिल्याबाईंच्या मनात तुकोजीरावांबद्यल निर्माण झालेले किल्मीण स्पष्ट जाणवते. अशाही परिस्थितीत तुकोजीरावांनी आपला थोरपणाच दाखविला. तुकोजीराव म्हणाले, 'मातोश्रींच्या मनात विकल्प आल्यास त्यांनी कुणालाही चाकरी सांगावी. मी हात बाधून तीच्या समोर जाईल आणि देईल ती शिक्षा मान्य करिल. पण विश्वास घाताचा विचारही मनात येणार नाही.[18] या

---

12. म.सा.भा.3, ले. 724 आणि वि.ज्ञा.वि. मे 1960
13. म.द.बा.भा.2 ले. 212
14. म.सा.भा.भा.3 ले. 755
15. म.द.बा.भा.1. ले.6, पा.15
16. म.द.बा.भ.1 ले.31, पा.74, आणि म.रि.भा.2. पा.15
17. म.द.बा.भा.1.ले 31 पा.74 आणि. म.रि.भा.2. पा. 12
18. हो.कै.अप्रसिध्द भागापैकी पा.10

या विधाणावरून तुकोजींची अहिल्याबाईंप्रति असणारी अढळ श्रध्दा आणि घराण्याचा स्वाभिमान स्पष्ट दिसून येतो.

पुढे पुढे अहिल्याबाई तुकोजीरावातील वाद वाढत गेला आणि द्विमुखी शाशन व्यवस्था होळकर घराण्यात सुरू झाली. 30 वर्षाच्या काळात अहिल्याबाई आणि तुकोजींचे फारसे कधीच पटले नाही. यांच्या वादात महादजी शिंदे आणि नाना फडणीसाला पडावे लागले. ही सर्व मंडळी तुकोजीरावास अनुकूल असल्याने तुकोजीच होळकरांचा मालक अशीच सर्वांची समजूत होती. लौकीक दृष्टयाही तेच मल्हाररावांचे पुत्र मानल्या गेले. [19].

अहिल्याबाईंच्या स्वभावातील विचलीत पण पुढील गोष्टींवरून दिसून येतो. मल्हाररावांच्या (तुकोजींचा पुत्र) विवाहाच्या वेळी केलेल्या पिढीच्या उच्चारातून अहिल्याबाईंनी तुकोजीरावांचे नांव गाळले.[20] अहिल्याबाईंचे उद्‌गार, 'दौलत तुमचे स्वाधीन केलीच आहे वडीलांचा लौकीक संरक्षण करून यजमान श्रीमंत यांचा लोभचा ओघ शुल्क न पडे यास जपावे आमचा परामर्श कराल न करा याचे चोष्टत दिसतच आहे.' [21] हे एकून कंपीत तुकोजींचनी स्वतःच्या गालात मारून अहिल्याबाईंचे पाय धरले आणि म्हटले ' आपण माझे वडील व मातुश्री आहात आपल्या चरणांशीं प्रतारणेचा विचार साक्षात मार्तंड येऊन बोलला असता पायाशी अंतर होणार नाही प्राण जावां की राहो'[22] असे बाणेदार उत्तर दिले. तेव्हा अहिल्याबाईंनी म्हटले बोलण्यात अर्थ नाही दिसण्यात येईल ते खरे. बोलण्याप्रमाणे चालावे म्हणजे जाहले असता इश्वर त्याचे उपेक्षा करित नाही' [23]

तुकोजी होळकर आणि महादजी शिंदे यांच्यात काही प्रमाणात विकल्प निर्माण करण्याचे श्रेय नाना फडणीसांनाच आहे. होळकर शिंदेची जोडी फोडून दोघा सरदारात किंचीत तेढ निर्माण करून दोघापैकी एकास आपले लगामी ठेवण्याचे धोरण नाना फडणीसांनी शेवटपर्यंत स्विकारले. [24] नाना फडणीसांचा महादजी शिंदेच्या विरोधात तुकोजीरावाला कूस

---

19. स.मा.रो.भा.1, ले. 432.
20. म.द.बा.भा.2. पा.175
21. हो.इ.सा.भा.6, पा.40 आणि हो.कै.भा.2. पा.40
22. हो.इ.सा.भा.6 पा.40
23. हो.इ.सा.भा.6 पा.40
24. ना.फ.च. - खरे, पा.49

होती. [25] वासुदेव शास्त्री खरे लिहितात, राज्यांच्य बचावासाठी (नमाच्या महत्वाकांक्षच्या बचावासाठी) त्या दोघा सरदारात दुही उत्पन्न करणे नानास भाग पडले.[256] तुकोजीरावानेही नानास शेवटपर्यंत मदत केली.[26]

इ.स. 1768 ते 1772 तुकोजीराव उत्तरेतच होते. तुकोजी होळकर, विसाजीकृष्न बिनीवाले, रामचंद्र गणेश कानडे, व महादजी शिंदे यांनी बादशहा शहा आलमला 6 जानेवारी 1772 रोजी दिल्लीच्या तख्तावर बसविले.[28] आणि मराठयांची गेलेली प्रतिष्ठा पुन्हः मिळविलीच नाही तर ते जास्त तेजाने तळपू लागले.

यानंतर होळकर, शिंदे, बिनीवाले झबेताखानावर चालून गेले. त्यांनी राहिल खंडावर ताबा मिळवीला. अंधाराचा फायदा घेऊन झबेताखान मात्र पळून गेला. पथरागडापर्यंत मराठयांनी त्याचा पाठलाग केला. तुकोजीरावांनी गंगापार करून बक्षीचे ओक कापून फौज नेस्तनाभूत केली. [29] यावेळी तुकोजींना महादजी शिंदे व कानडेंनी मदत केली नाही. परंतु बक्षी मारल्याचे कळताच सबेताखान 60,000 फौज व 300 लोकांसह तुकोजींचा सामाना करण्यास आला. त्याचा तुकोजींनी पराभव केला. झबेताखाना जंगलात पळून गेला. यानंतर त्यांनी पथरागडावर हल्ला केला. इ.स. 1772 मध्ये हे ठाणे मिळविले. भरतपूर डीगच्या परिसरात नवलसिंगाचा पराभव केला. आणि रोहिल्यांनी पानिपतावयन मराठयांची नेलेली प्रचंड लूट हत्ती, घोडे, तापा, व मौल्यवान वस्तू इ. परत मिळविल्या. [30] ही सर्व लूट एकत्र करून तुकोजींनी सर्वांना सारखी वाटून दिली. वरिल घटनेवरून तुकोजींचे औदार्यच दिसून येते. रोहिल्यांचा पूर्णपणे बंदोबस्त करण्यात तुकोजी यशस्वि ठरला. इतकेच नव्हे तर त्याने जाटाचाही पराभव केला. तुकोजींची पथरागडाची मोहिम इतेहासात मौल्यवान ठरते.

यानंतर तुकोजी इंदूरास परत आला आणि दक्षिणेतच इ.स. 1773 ते 1788 पर्यंत पेशव्यांच्या कामगिरीतच गुंतुन पडल्याने त्याला उत्तरेच्या राजकारणात लक्ष देता आले नाही.

---

25. ए.ले.सं.पा.460
26. ना.फ.च. खरे पा.246
27. हो.इ.भा.1. पा.300
28. पे.द.खं.29, ले.89 पा.84, दत्ता के.पा.29
29. केळकर न.चि. 'मराठे आणि इंग्रज' पा. 117 आणि हो.कै.सं.6 पा.41
30. हो.कै.भा.6,पा.40, हो.शा.शा.भा.1. पा. 304, पे.द.ख.29,ले.270, पा.274

पेशवा माधवरावांच्या मृत्यूनंतर मराठा साम्राज्य अंतस्थ यादवीमूळे उध्वस्त होवू पाहात होते. पेशवेपद मिळविण्याच्या आसुरी महत्वाकांक्षेमुळे खुद्द नारायणराव पेशव्यांची त्यांच्याच वाडयात हत्या झाली. [32] यानंतर गंगाबाईंना (नारायणरावाची पत्नी) मुलगा झाल्यावर त्याच्या नावे कारभार करण्याची योजना सखाराम बापूंच्या पुढाकाराने ठरली. आणि बारभाई मंत्रीमंडळाची निर्मिती झाली. [33] यात तुकोजीराव आणि महादजी शिंदेचा सहभाग होता. आणि यांच्यावर रघुनाथराव दादाला पकडण्याची कामगिरी सोपविली. [34] रघुनाथराव इंग्रजांच्या आश्रयाला गेल्यानेच पुढे यातून इंग्रज-मराठा पहिले युध्द उदभवले.

पहिल्या आंग्ल - मराठा युध्दात तुकोजीरावांनी बोरघाटच्या युध्दात थोर पराक्रम गाजविला. इंग्रज घाट चढून आल्यावर तुकोजीराव 1800 लोकांसह इंग्रजावर चालून गेला आणि पराक्रमाची शर्थ करून संपूर्ण इंग्रजांची पलटन बुडवून इंग्रजांच्या तोफा हस्तगत केल्या. हे युध्द इतिहासात बोरघाटचे युध्द म्हणून प्रसिध्द आहे. या युध्दात तुकोजीराव सर्व मुलांसह आणि पुतने बापू होळकरांसह हजर होते. इंग्रजांनी तुकोजींकडे मैत्रीचा हात पुढे केला. ही गोष्ट तुकोजीरावांनी नाना फडणीसांस कळविली. नानांनी सर्व जबाबदारी तुकोजीरावावरच सोपविली. त्याप्रमाणे त्यांनी रघुनाथरावांना स्वाधीन करून त्यांचे सहा लक्षाचे जवाहिर परत करावे असा निरोप इंग्रजांना देऊन तुकोजीराव पुण्यात आले.[36] यावरून तुकोजींवर नानांचा किती विश्वास होता हे स्पष्ट होते. खुद्द श्रीमंत पेशवा तुकोजीरावांच्या स्वागतास तीनकोस सामोरे जावून त्यांनी त्यांची स्तूती केली. तुकोजीरावांनी एकच उत्तर केले. 'चाकरी चाकरांनी केली त्याचा इतका बडिवार कशास पाहिजे.' [37] त्यांच्या या बोलण्यावरून त्यांची विनय शिलता दिसून येते.

बोरघाटचे युध्द, वडगावचा तह व या युध्दातील यश आणि या सर्वात तुकोजींचा मोठा वाटा होता. असा निष्कर्ष काढता येतो. श्रीमंत पेशव्यांनी त्यांना देणगी देवून त्यांचा

---

32. पे.द.ख.29, लें.156, पा.158, म.र.शा.भा.4, पा.45, ऐ.ले.सं.भा.4,ले.1232, पा.1946,लें.1246,पा.1966.
33. ऐ.ले.सं.मा.प.ले.1299 - पा.2090, फॉरेस्ट मराठा सिरीज भा.1. पा.253
34. एन.एच.एम.भाग 3, पा.46
35. हो.इ.भा.1. पा.308
36. भागवत अ.ना. हो.कै.खं.6, अप्रकाशित भागापैकी पा.12,13.
37. भागवत अ.ना. हो.कै.ख.6, अप्रकाशित भागापैकी पा.13, हो.इ.भा.1, पा.310

आदर सत्कार केला. तुकोजीरावांना या पराक्रमामुळेच खानदेश प्रांतातील रावेर परगणा व उत्तरेकडील परगणा कोचची सनद प्राप्त झाली. नानाच्या मनातील होळकरांविषयीचा संशय दूर होऊन त्यांचात मिलाफ झाला. [38] सालबाईच्या तहाने हे प्रथम आंग्ल-मराठा युध्द इ. 1774 ते 1782 पर्यंत चाललेले एकदाचे संपले.

इ.स. 1781 मधे हैदरअलीचा मृत्यू होऊन टिपू सुलतान झाला. टिपूविरूध्दच्या मोहिमेवर तुकोजीरावांची रवानगी झाली. तुकोजी, भोसले, गायकवाड, फडके इ. फौजेसह निघाले. तुकोजींची फौज 12,000 होती. सय्यद बुराण टिपूचा सरदार होता. तुकोजीराव 40 कोसांची दौड एका रात्रीत करून सावनूर जवळ पोहचले. हे वर्तमान कळताच टिपूचा वकील तुगभद्रेवार गेला. बेहरे यास सावनूर जवळ ठेवून टिपू कित्तुराकडे गेला. या स्वारीत गणेशपंत बेहरे आजारी पडून मृत्यू पावला.

जून 1786 च्या गजेंद्र गड आणि अंडवाणीच्या युध्दात तुकोजीरावांनी अत्यंत मोलाची कामगिरी केली. बादामीच्या नैऋत्येस गजेंद्रगड असून तिथला किल्लेदार रज्जबखानाने तुकोजीरावांपुढे शरणागती पत्करून किल्ला खाली करून दिला. तुकोजीरावांनी 8 जून रोजी मराठयांचा जरीपटका किल्यावर फडकाविला. पूर्वी हा किल्ला दौलतराव हिंदूराव घोरपडेंकडे होता. इ.स. 1776 मधे तो हैदरने जिंकल्यावर पुन्हा तो तुकोजीरावांनी आपल्या पराक्रमाने परत मिळविला. इ.स. 1787 च्या जानेवारीत टिपूने बहादूर कोंडयाचा किल्ला तोफा लावून घेतल्याने मराठे-टिपू तह फिसकटत होता. म्हणून लगेच टिपूने तुकोजीरावांकडे वकील पाठवून युध्द बंद केले. हरिपंतांनी युध्द सुरुच ठेवल्याने टिपूचे वकील त्यांना गजेंद्र गडाजवळ भेटले. गजेंद्रगडाचा तह होवून 32 लक्षाचा भरणा हरिपंतांकडे आला. तहाच्या बाबतीत तुकोजीरावांचे हात टिपू कडून ओले झाले. अशी दाट बातमी होती. हरिपंतांनी स्वतः तपास केला पण पुरावा मिळाला नाही'.

---

38. हो.इ.भा.1. पा.309, 118
    हो.कै.ख.6 अप्रकाशित भागापैकी पा.13, 14
    अप्रकाशित होळकरांच्या हिशोबाचे परिशिष्ठ

जनवार्ता आहे जे टिपू कडून होळकराने सुवर्णदर्शन घेतल' पण हा आरोप निराधार आहे. कारण हरिपंताशीवाय इतर नामांकित सरदारांनीही चौकशी करूनही पुरावा उपलब्ध झला नाही त्यामुळे या आरोपात अजीबात तथ्य नाही.[39] तुकोजीराव 4 मार्चला पंढरपूरला येवून विठोबाजचे दर्शन घेतले. या ठिकाणी तुकोजींनी घराण्याचाच कित्ता गिरविल्याचे दिसते. शत्रुंचा समूळ नाश करणे होळकरांच्या धोरणात कधीच नव्हते. (उदा. मल्हारराव नजीबखान).

28 जुलै 1787 च्या लालसोटच्या युध्दात राजपूतांविरूध्द महादजी शिंदेंना माघार घ्यावी लागल्याने पानिपताचीच पुनरावृत्ती होते काय अशी शंका आली. तेंव्हा महादजी शिंदेच्या विनंतीवरून नाना फडणीसांनी तुकोजी होळकर आणि अलीबहादराला सैन्य घेऊन उत्तरेस पाठविले. दोघांच्याही भेटी महेश्वरास झाल्या. 20 एप्रिल 1788 रोजी अहिल्याबाईंनी त्यांना मेजवाणी दिली. तुकोजी होळकर व अली बहादर महेश्वरात असताना गुलाम कादरचे पत्र तुकोजींना आले. 'तुमचा आमचा भाऊपणा पूर्वीपासून आहे. आमचे भांडण शिंदयांशी आहे. आपण मदतिस येवू नये' यामुळे तुकोजी होळकर जाण्यास दिरंगाई करू लागले आणि अलीबहादरालाही थाबवू लागले.[40] पण ही तुकोजीरावांची फार मोठी चूक ठरली.

तुकोजींना स्वतंत्र निर्णय घेण्याची बुध्दी नव्हती. महादजी शिंदेंना वकील-ए-मुतालीकचे पद व सन्मान मिळाल्यापासून तुकोजींचा महादजी बध्दल असूया वाटू लागली. महेश्वरत व्यर्थ वेळ घालविण्यात तुकोजींमध्ये दूरदृष्टीचा अभाव व राजकीय मुत्सद्देगीरीचा अभावच दिसून येतो.

महादजी शिंदेंची इच्छा तुकोजी उत्तरेत आल्यावर सर्व कारभार त्यांना सोपवून उज्जैनीस जाण्याची होती. पण नानाच्या पाठिंब्यामुळे तुकोजीने उत्तरेस जाण्यास दिरंगाई

---

39. म.रि.उ.वि.भा.2 पा.289 तं 290.

40. भागवत हो.इ.सा.भा.1 ले.7 - पा.23,31,32
हो.इ.भा.1. पा.326
भावे मराठी दप्तर रूमाल भा.3, ले.35, पा.53
डॉ. अंधारे पा.30
म.द.बा.भा.2, ले.184, पा.152-53.

केली. शिवाय तुकोजी सरळ न जाता राजपुतान्यातून गेले आणि 31 जूलै 1788 रोजी महादजी शिंदेना मथुरेला भेटले.[41] मल्हारराव होळकरांचीच मतलबी स्वभाव तुकोजीत काही अंशी दिसून येतो. त्यांनी केवळ गोड गोड बोलून शाब्दीक मदतिचे आश्वासन दिले.[42] अलीबहादराने गुलाम कादरचे परिपत्य केल्याने त्याचे नाव सवेंतामुखी झाली. यावळी तुकोजीची भरघोष कामगिरी दिसत नाही. मात्र अलीबहादर आणि महादजी मधे अनुपगीर व उमरावगीर गोसावी बंधूच्या प्रकरणावरून तेढ निर्माण झाल्यावर यांच्यातील वाद तुकोजींच्याच प्रयत्नाने आणि मध्यस्थिने संपला.[43] आणि त्यांच्यात सामंजस्य निर्माण करण्यात तुकोजीला यश मिळाले.

तुकोजीरावांना महादजी शिंदेविरूध्द भडकविण्याचा प्रयत्न विजयसिंगाने केला. पण त्याच्या जाळयात तुकोजी अडकले नाही.[44] राजस्थानच्या राजकारणावरून तुकोजी महादजी वाद निर्माण झाला. उत्तर भारताच्या प्रतिनिधीच्या प्रश्नावरून तेढ वाढत गेली. यात वाटणीच्या प्रश्नावरुन भरच पडली. तुकोजीला उत्तरेत वाटा हवा होता. तो लिहितो, 'आम्हास हिंदूस्थानचा वारसा यवद् जीव सोडायचा नाही.[45] स्वसामर्थ्या वाटा मिळत नाही म्हणून नाना फडणीसाच्या मदतिने मिळवू पाहात होता. पेशवा अज्ञान असल्याने पेशव्यांचे अधिकार नानाच वापरित होते. म्हणजे पेशव्यांचे पेशवा होते'. त्यांचीच महादजींच्या विरोधात तुकोजी आणि अलीबहादराला फूस होती.

दि. 20 जून 1790 चे पाटण व दि. 10 सप्टेंबर 1790 चे मडत्याचे राजपुतांविरूध्द युध्दात तुकोजींची कामगिरी फार महत्वाची ठरलेली. मेडत्याच्या विजयानंतर डी बॉयनने महादजींना पत्र पाठवून होळकरांच्या पराक्रमाची कबूली दिली. शिंदयांच्या फौजेनं काही एक झाली नाही. होळकरांकडील सरजाम नसता तर करोडो रूपयाचा कारखाना बरबार होवून बदनक्षा मुलखभर होता.[46] हा तुकोजींबद्यलचा अभिप्राय अतिशय बोलका आहे. पण दुर्दैवाने हे सहकार्य फार काळ टिकले नाही. महादजी 1792 मधे दक्षिणेस गेले तर अलीबहादर बुंदेलखंडात. उत्तरेत तुकोजीरावच काय ते एकमेव मातब्बर सरदार उरले होते.

---

41. म.शि.का.ले.558 पा.784, ले.560 पा.769, मराठी दत्पर रूमाल भा.3. ले.84 पा.94, हो.इ.सा.भा.1 ले.238
42. भागवत हो.इ.सा.भा.1 पा.15
43. मराठी दप्तर रूमाल भा.3 ले.132 पा. 138, ले.138, पा.143, ले.139 पा.143 फोर्ट विल्यम भा. 16, पा.275, 327.
44. हो.इ.भा.1 पा. म.रि.उ.वि. पा.
45.
46. खरे ए.ले.स.मा.9, ले.3514 पा.4650, ले.3516 पा.4651, ले.3520, पा.4655

तुकोजींनी जोधपूर जयपूरच्या सैन्याला नमवून रामपुरा जिंकले. रोडे खवासाचे परिपत्य करून 17 लक्ष खंडणी वसून केली.[45] कोटा व टोककडे जावून गढया जिंकल्या. मार्च 1792 मधे माचेवाडी जिंकली. इ.स. 1792 मधे दुआब व मथुरेच्या जिल्यात होळकराच्या प्रदेशावर ताबा मिळविण्याच्या शिंदेच्या सरदारांच्या गोपाळराव भाऊ, बक्षीच्या धोरणाने संघर्षाचे वातावरण निर्माण होऊन महादजींच्या अनुपस्थितीत तुकोजी होळकर व शिंदे सरदारात 1 जून 1793 रोजी लाखेरी येथे संग्राम झाला.[46] हयात तुकोजींचो दूर्दशा झालो. याचा धक्का नाना फडणीसाला बसून होळकराप्रमाणे आपली गत होऊन दिल्लीच्या बादशहाप्रमाणे पेशवाही महादजींच्या हातात मेणाचे बाहूले बनणार असे भय वाटू लागले.[47]

तुकोजीने खडयोच्या लढाईत केलेला कामगिरी त्यांच्या जिवनातली शेवटची ठरली. त्यांना पक्षघाताचा आजार झाला. लाखेरीचा संग्राम माल्कमच्या मते दोन घराण्याच्या संघर्षापेक्षा दोन मालकाच्या नोकरातील संघर्ष होता.[48] लाखेरीच्या संग्रामाने तर सनेटास गेलेले हिंगणे लिहीतात, ' सुभेदाराचे शरीर अर्धे वायुने गेलेले, व्यसनासक्ती, शास्वत बुध्दी आजची उद्या नाही, स्वतः बुध्दी नसता मनसष्याचे कल्प बोलतात, द्रव्य मोह, पुत्र मोह अतिशय, राधोरक्षा मुख्य सल्लागार, शरीर केवळ गेलेले दोन मनुष्यास उठवावे, बसवावे लागते.[49]

या आजारामुळेच इ.स. 1795 नंतर तुकोजीराव कोणतीच महत्वपूर्ण कामगिरी करू शकले नाही. शेवटची दोन वर्षे अंधरूणावर गेली.

दि. 15 ऑगसट 1797 रोजी पुणे इथे तुकोजीरावांचे निधन चाले. तुकोजीराव अतिशय धार्मिक होते. होळकरांचे कुल दैवत जेजुरीच्या खंडोबावर त्यांची नितांत श्रध्दा होती. मृत्यूपूर्वि त्यांनी मोणपुत्र काशिरावास गादीवर गांदीवर बसविण्यास पेशव्यांकडून सुभदारीची वस्त्रे दयावों असे कारभारी पळशिकरास कळवीले. काशीराव थाडा वेडसर होता. (वेडसरपणा होळकरात काही अंशी दिसून येतो उदा. मालेराव, काशीराव, यशवंतराव, नथ्याबा)

---

45.

46. खरे ऐ.ले.सं.9,ले.3514 पा.4650, ले.3516 पा.4651 ले.3520 पा.4655

47. ना.फ.च. पा.152

48. माल्कम पा. 173

49. हो.इ.सा.भा.1. ले.240 पा.203

काशिरावास होळकराची गादी मिळाल्यास दौलतराव शिंदे व बाजीराव दुसरा होळकरांची दौलत गिळकृत करतिल याची जाणीव नाना फडणीसास होती. वास्तविक सवाई मल्हारराव (तुकोजींचा लहान पुत्र) अत्यंत शुर, लढाईत वाकबगार त्याला गादीवर बसविले असते तर मराठा साम्राज्याच्या हिताच्या दृष्टीने अधिक औचीत्यपूर्ण ठरते. पण दूरदृष्टीच्या अभावी वस्त्रे काशिरावास मिळाली आणि त्यातूनच होळकरशाहीत 'न भूतो न भवती' अशी भाऊबंदकी सुरू झाली. ही भाऊ बंदकी काही अंशी मराठयांच्या -हासास कारणीभूत ठरली.

तुकोजीरावात गुण ग्राहकता, मुत्सद्दीपणा, चिकाटी, सर्व संग्राहक वृत्ती इ. गुणांचा अभाव प्रकर्षाने जाणवतो. तुकोजी पराक्रमी होते. पण मध्य प्राशनाने काही बाबतीत पराक्रम वाया गेले मोठेपणा सहजी मिळत नाही। त्यासाठी टाकीचे घाव सहन करावे लागतात. तुकोजीराव अतिशय भोळा व दुस-याच्या कहयात जाणारा होता म्हणून त्याचा फायदा नानाने स्वत:च्या स्वार्थासि करून घेतला. इतिहासकारांच्या या म्हणण्यास सत्यता आहे. तरी कबूल करावी लागेल.

गादिकरिता काशिराव मल्हाररावाच्या भांडणात ते आपल्या पुत्रांना आवरू शकले नाही यात तुकोजींची आगतिकता स्पष्ट दिसते.

तरीही त्यांचा सर्वात मोठा गुण त्यांचे शौर्य, पाराक्रम, मोठेपणा, दातृत्व आणि साधेपणा, सरळ साधा स्वभाव हा होता.

अहिल्याबाईंच्या मृत्यूनंतर 1795 नंतर तुकोजींनी संस्थानाची व्यवस्था राखण्याचा यथाशक्ति प्रयत्न केला. त्यात बालाजी लक्ष्मण, खंडोमहादेव, पाराशर दादाजी आणि काशीराव होळकरांनी त्याची मदत आणि प्रामाणीक सेवा केली.

सरते शेवटी होळकर घराण्यात थोरले मल्हाराव, अहिल्याबाई, आणि यशवंतरावांसोबत तुकोजीरावांनाही स्थान दयावेच लागेल. त्यांनी होळकरांचा लौकीक टिकवून 'आपली संपूर्ण जहागीरी सांभाळली. जे होते ते नष्ट होऊ न देता कायम राखले यातच त्यांचे मोठेपण आहे. तत्कालीन पत्रात तुकोजीच्या मृत्यूनंतर पुढील उल्लेख केला आहे'. फार मोठा पुरूष गेला' यातच त्यांची थोरवी सामावली आहे.

पे.द.सरदेसाई
निवडलेले पैकी
द.क्रं. 29
प.क्रं. 49

श्री मोरया

चिरंजीव राजश्री बालाजी पंत व राजश्री
गंगाधर पंत यांसी प्रति गंगाधर यशवंत आशीर्वाद
उपरी येथील क्षेम जाणून स्वकीय कुशल लेखन करीत
जाणे विशेष तुम्ही सर्व सरंजामानसी सुरंज त्या मलात
आला म्हणोन येथिले देशासी जाणार येसिवासी देशी
मोगलाने हतवीर्य होवून नवी जागीर श्रीमंतास देवून
रुला केला तिकडील गुंता उरकला. झाडुन फौजा
रवाना जाल्या दर मजल येतात येथून राजश्री तुकोजी
होलकर फौज सुधा ते प्रांतच्या बंदोबस्तास रवाना केले ते
व राजश्री शिच्यास राव लक्ष्मण मिलोन येतील तुम्ही
त्यासी सामील होवू न ते प्रांतचा बंदबस्त होय ते गोष्ठ
करणे दुरदेशी ध्यानात आणून तूर्त देशी जावयाचे
न करावे संविस्तरे येजमान पत्रावरुन देसी सलुख
जाहाला दरबारी बेगमी केली पाहिजे येथून ही फौज
रवाना केली आणि राजश्री नारोपंत नाना व राजश्री
विठ्ठलराव तात्या मातबर फौजानसी येत आहेत तुम्ही न
चिरंजीव राजश्री निच्यासराव वगैरे दम धरुन पूर्ववत
करार करुन च्यार पैसे खावंदास जागा जाहाली म्हणजे
स्वामी सेवा उत्तम आहे सर्व तुम्हास कलत आहे विस्तारे
काये लिहिणे लोभ असो दीजे हे आशीर्वाद मुखवचने
राजश्री चिमणाजीपंत आपा सांगतील ते धानास धरुन व
राजश्री जनार्दन पंत बाबा सांगतील ते येकून उत्तम
दिसेल ते करावे हे आसीर्वाद .

*****

परिशीष्ट

पे.द.सरदेसाई
यांनी निवडलेले पत्रा पैकी
द.क्रं 29
प.क्रं. 170
(12/1/1767)

पोछ 18 साबान

श्री

पुरवणी श्रीमंत राजश्री दादा
स्वामीचे सेवेसी

विज्ञापना उजनीस आल्यावर राजश्री महादजी शिंदे यांचे पत्र आले ते बजिन्स पाठविले आहे. दुसरे पत्र त्यांचे व होळकरांचे आज सुत 13 त्रयोदशीस आले त्यात मजकूर इतकाच की तुम्ही लौकर आम्हाजवळ येणे सिध्याकडील अर्थ मनोदयानरुप आमचे सिध्दीस पावला यैसा अर्थ तुमचे बोलणियांत कल्ला तर जे होणे ते होईल नाही तर समक्षच अर्थ कलेल त्यास तेथे तूर्त काही बखेडा न करिता उभयता सरदारापावेतो एकदा जावे हा निश्चये करुन येथून कूच केले दर मजल जात असो तेथे गेल्यानंतर जे वर्तमान होईल तो अर्थ सांधत विनंती केली जाईल सारंषमनसबा विलग्र पडल्या सारिखा खावंदानी उपराला चांगला केल्यानेच परिणाम लागेल सरकारचा नक्ष राहील तेच खावंद करतील भरवंशापूर्ण असे श्रुत होय हे विज्ञापना पहिले त्यांचा प्रकार तो होता आता केवल रुक्ष पत्रे लिहितात याचा अकिसान स्वामीस असावा हे विज्ञापना

*****

परिशीष्ट

पे.द.हिदुस्थान
रु.नं. 204
10 जून, 1767

रोजकीद
सुत समान सितैन
मपा व अलक

राजमंडळ

स्वारी राजश्री दादा
छ 12 माहे मोहरम
दफाते पत्रे

तुकोजी होळकर याचे नावे जाब की तुम्हास
मालेराव होळकर मृत्यु पावले त्याचे सरदारीचा
बंदोबस्त सांगोन ऐवज करार रुपये

1530000 नजरे बाबद
1500000 ऐन
30000 पा गाडण्याबाबत
-------
1530000
132000 किता ऐवज खाजगी कडे नजराणा करुन घ्यावा
100000 किल्ल्या बाबत अनपवलीचे इमारतीचे
32000 खरगोषचे मोंकाशा बाबत सन आर्बा तारुन सित - विसाला पौ करार
-------
132000
--------
1662000

येकूण सोला लक्ष बासष्ठ हजार रुपये करार केले
त्या पैकी भरणा रुपये

250000 रोख भरणा गुण विष्णु महादेव ई वैशाख वद्य पंचमी ता जेष्ठ शुध्द पौर्णिमा

200000 जगा पोता

पान नं. 2

50000 जमा पर भारे रद कर्ज
लेखा बाजार

\------

250000

750000 सावकारी निशस आषाढ शुभ
प्रतिपदाचे मुदतीने

300000 गुण विष्णू महादेव
250000 गुण सिदापा सटे चिखर
200000 गुण गोपाल सभाजी

\-------

750000

\------

1000000

येणे प्रमाणे दहा लक्ष रुपये नजरे पैकी सरकारात
जमा जाहाला असेल म्हणोन

जाब

हूजूर

*****

परिशीष्ट

वे.द. सरदेसाई,
यांनी निवडलेल्या पत्रापैकी
द.क्र.29
प.क्र.183
(14.6.1767)

पौछ 19 मोहरम
सन समान जेष्ठमास.

श्री

राजश्रीचा विराजीत राजमान्य राजश्री
बालाजी जनार्दण स्वामी गोसावी
यासी

पोा रघुनाथ बाजीराव नमस्कार विनंती उपरो
येथील कुशल जाणोन स्वकीय लिहीणे विशेष
मालराव होलकर मृत्यु पावले त्यांचे दौलतीचा बंदोबस्त
राजश्री तुकोजी होलकर यांस सोपून त्यासच
सरदारीची वस्त्रे येथे दिल्ही आसेत जो बंदोबस्त
होणे तो येथुन जाला तुम्हाकडून यांचे माहालास
कोठे कोठे जप्त्या गेल्या आहेत म्हणोन विदित
जाले ऐसीयासी याचे महालास तुम्हा कडील
जप्ती गेली असेल ती उठवणे यांचे
महालास व गावाखेडियास देखिल मशार निले कडील
कारकुनाचे गावखेडीयास कोणेविसी उपसणे न
न करणे जप्त्या गेल्या असेल ते उठवणे याचे महालास
व याचे निसबतीचे कारकुनाचे
गावास देखिल उपसर्गन करणे जप्ती केली असेल
ते उठवून नेणे बहूत काय लिहिणे छ। मोहरम
हे विनंती.

XXXXX

(सबंधपत्र राघोबाच्या हातचे आहे)

परिशीष्ट

पे.द.हिंदूस्थान
रु.नं.204
21/8/1767

रोजकीर्द
सुगा समान सितैन
मया व अलफ

राजमंडळ
स्वारी राजश्री पंतप्रधान
छ 25 रविलावल दफाते पत्रे

तुकोजी होळकर यांचे नावे सन की
मल्हारजी होळकर व मालजी होळकर मृत्यू
पावले त्याज कडे फौजेस सरंजाम प्रांत
मालवा पैकी प्रांत हिदूस्थान पैकी व
प्रांत अतरवेद पैकी व स्वदेश पैकी
खुमावज सरंजाम व वतने व इनाम गाव
परगणे व माहाल मक्ते व कुरणे सुदामत
चालत आहे ते व दर मुल की स्वारी मुले
तह पेशजी करार आहे तो व सरदारी च्या
डौलातील कारकून वगैरे निसबतीच्या
लोकांकडे गांव व परगणे चालत आहेत
त्या पैकी सरकारात घेतले.

। ता देपूर पो ईगनेर
। सरकार खरगोण उर्फ बिज्यागड
पैकी शेधर्वे व नागन वाडी
व ता मोहनसिंग खेरीज करुन
बाकी
। मौजे पिपलगाव साखर पो अंबड
नि गंगाधर येशवंत पैकी
\- - -
3

येकूण येकतरा व येक सरकार व येक गांव
सरकारात घेवून बाकी जूनाह नवा सरंजाम
फौजेचे बेगमीस वतने व इनाम गाव व महाल
मक्ते व पूर्ण सुदामत चाल आहे ते व - -

-: 2 :-

व पर मुल की स्वारी मुळे तह पेसजी करार आहे
तो व सरदारीच्या डौलतील कारकून वगैरे
निसबतीच्या लोंकाकडे गांव व परगणे
चालत आहेत त्या प्रत तुम्हाकडे बहाल
केले असे इमाने इतबारे वर्तोन बदोबस्त
करुन फौज बालकुन एक निष्ठेने सेवा चाकरी
करीत जावो म्हणोन सनद

हूजूर

*****

पे.द. क्रं. 5
प.क्रं.46
दि.3/5/1774



पौछ 18 रौवल.

श्री

राजश्री बालाजी पंत नाना
गोसावी यांसी

ई अखंडित लक्ष्मी अलंकृत राजमान्य श्री तुकोजी होळकर दंडवंत विनंती उपरी येथील कुशल जाणून स्वकीय लिहित असावे . विशेष आपण पत्र पण ते पावोन लेखनार्थ आवगत जाला या पूर्वीहि पाच सात पत्रे पत परंतु उत्तर - येकाचेहि न आले म्हणौन लित यैसीयासी येविसीचा प्रकार तरी राजश्री महादजी शिंदि यांचे व आमचे चित्ताची सफाई नव्हती त्याची दुरुस्थाई अलीकडे होवून स्वमी सेवा येक रुप पणे करावी या अर्थे निखालसता जाली त्याच प्रसंगी राजश्री महादजी पंत गुरुजी आले त्यांनी आपल्या कडील मजकूर सर्व सांगितला त्याची उत्तरे उभयता कडून येक वाक्यतेने जाली तो अर्थ त्यांनी आपल्यास साधत लित असेल मधी राजश्री बहेरजी ताकपरि देसी गेले आपल्यापासी येवून भेटावे आसे असता मार्गी श्रीमंताची गाठ अचानक पडली निरोपाय जाणून ते त्यास भेटले तेव्हा त्याजला स्वारीसमागमे राहाणे प्राप्त जाले पुढे श्रीमंताची स्वारी इकडे येणार येविसी आपल्या चिंतात विपर्यास आला असेल त्यास येथील विचार आपल खेरीज नाही प्रस्तूत राजश्री हरिपंत समीप आले आणि श्रीमंतही नेटी येवून

पोहचले तथापी आमचे लक्ष अन्यत्र नाही. जे
कर्तव्य ते आपल्या लक्षानेच होईल रा छ 2। सफर
बहूत काये लिहिणे लोभ असो दीजे हे विनंती

मोर्तब
सुद

यावर तु.हो.
यांचा शिक्का आहे.

*****

पे.द.रु. नं. 5
प.क्रं. 56
30/8/1774





पौछ 20 जावल
आषाढ मास

श्री

राजश्री सखाराम पंत बापू
गोसावी यासी

ॐ सकल गुणालंकरण अखंडित लक्ष्मीआलंकृत राजमान्य
श्रो तुकोजी होळकर दंडवत विनंती उपरी येथील कुशल
जाणून स्वकीय लिहित असावे विशेष तुर्त आपल्याकडून
काही पत्र येत नाही तरी सर्वदा लिहित जावे इकडील
मजकूर तरी श्रीगंत इंगरेजासह मही उतरुन भडोचचे
सुमारे गेले आम्ही त्यांचे मागे रेवातीरास आलो आठ चार मुक्काम
केले त्याचा छावणीचा इरादा दिसोन आला मग आम्ही व
राजश्री हरिपंत बावा पि-याच्या घाटे नर्मदा तोरी भडोच
बारा कोस इतक्या एकावताने आलो पुढे रेवा पार
उतरुन छावणी वगैरे मसलत करावी हे ठरले तेव्हा
सरकारच्या फौजाचा उतारा लाविला बुनगे व फौज फार
करून उतरुन पार जाली दाहा बारा हजार फौज व तोफखाना
सरदार लोक राहिले इतक्यांत नर्मदेस पाणीहि आले आशा
संधीत श्रीमंताची घाटाच्या सुमारे कूच करुन अचानक
घाटावर आले आम्ही प्रहर दीड प्रहर तेथे दम खावून तो तल
सोडोन पलीकडे च्या डोसकर नालीच्या घाटास गेलो तेथेही
पाणी फार इकडे छावणीस रहावे तरी काही फौज पार
काही वर या करीता वर्ते अकबर पूर महेश्वर बढवे या
घाटे उतरुन पार जावून तया फौजेस मिलावे हे मसलत करुन
राजश्री हरिपंत आम्ही दर मजल आलो मोहनचे मार्गे अकबर -
- पूरचे घाटे उतरुन पारच्या फौजेस सामील होतील सविस्तरे

राजश्री हरीपंतानी आपणांस लिहिले असेल

त्यावरुन कसेल आम्ही महेश्वरास राहू तेथे

लोकाचे वगैरे कामकाज आहे याजमुळे

राजश्री नारो गणेश यासी बोलाविले आहे.

तरी आपणहि त्यास निरोप देवून त्याची रवानगी

करावी शा छ 2। साखर बहूत काये लिहिणे लोभ असो

दिजे हे विनंती.

मोर्तब
सुद

श्री
म्हाळसाकांत
चरणी तप्पर
मल्हारजी सुत
तूकोजी होळकर

*****

परिशीष्ट

पे.द.हिदूस्थान रु.नं.204
19/2/1775

रोजकीद
सुमा खमस सबैन मया व अलफ

राजमंडळ
स्वारी राजश्री पंतप्रधान
छ 19 जिल्हेज

तुकोजी होळकर यांस साल मजकूरी सरंजाम दिल्हे येवीसी सनदा

2 प्रांत नेमावर पंचमहाल
। पाा नेमावर
। पाा कावफोड
। पाा सतवस
। पाा राजोर
। पाा हरणगांव
---
5

येकूण पांच महाल येथील कमावीस नारो बलाल भूसकुटे याजकडे होती ते दूर करुन होलकर याज कडे पेशजी प्राो खेरी मौजे खरदा व बाबच्या व कोकरी येकूण तीन गाव मुगाजी सावत याज बाा व मौजे हिजलगांव पोा नेमावर हा गांव पिलाजी जाधव याज बाा येकूण चार गांव करुन सदरहू महालचा निमे असल सरंजाम करुन दिल्हा असे तरी सन पै - वस्तगीर पासून अमल देणे म्हणोन सनद

। नारो बहाल यास की ठाणी सुध्धा अमल मशारनिलेकडे देवून कबज घेणे म्हणोन

। जामिदारास की मशारनिले कडील कमावीस दारासी रुजू होवून अमल सुरलीत देणे म्हणोन
---
2

2 पाा रावेर येथील तिजाई वाटणी चे

वाटणीचे गांव चा दोन हिस्से अमल व दुजाई
वाटणीचे गावंचा दरोबस्त अमल देखील कसबे
मजकूर दोन हिस्से सरकारांत आहे त्याची
कमाविस नारो सिवदेव यांज कडे आहे त्यांस
सदरहू अमला पैकी निमे अमलाची कमाविस
नारो सिवदेव याज कडून दूर करुन होलकर
याज कडे फौजेचे सरंजामास सालमज करी
सदरहू निमे अमलाचे अन्वये तनखा रुपये -
970000 सत्यावन हजार करार करुन दिल्हा
असे तरी सनदे पै वस्तगीरी पासून अमल देणे
म्हणोन ------------- सनदा.

। नारो सिवदेव यांस की पाा मजकूर येथील
पाल तर्फ खेरीज करुन सदरहू प्रमाणे निमे
अमल ठाणे सुध्दा देवून कबज घेणे म्हणोन

। जमिदारास की मशार निले कडील कमाविस
दारासी रुजू होवून पाा मजकूर येथील सदरहू
प्रमाणे निमे अमल सुरलित देणे म्हणोन

---
2

-----
4 सदर

*****

परिशीष्ट

डे.कॉ.इ.सं.
मेणवाली दप्तर
रुमाल नं.20
फाईल 1, पत्र नं.94.

**श्री गणपती**

**पौछ 18 राखरशहिदे**

**चैत्र पूर्वोल सहा घटकारता**

ता.13 एप्रिल 1781.

राजश्री नाना स्वामीचे सेवेसी,

विनंती उपरी आपण छ 15 रबिलाखरचे पत्र पाठविले
ते पावले इंग्रज दगलबाज आहेत हयाविसी चहूकडे बताम्या
सांगुन हुशार आसावे म्हणून बिसार युक्त लिहिले ते
कलारे ऐसीयास आम्ही आपले तर्फेने बहुत सावध आहो
श्रीमंताचे पुण्येकडून कोन्हे गोष्टींची
फिकिर नाही परंतु आपण लिहीलेतेही फार सावध
आहो आजचे वर्तमान तरी प्रांतःकाली इंग्रज कूच
करुन पनवेलीअून निघाला हे वर्तमान आम्हास
कलतांच आम्ही व राजश्री तुकोजी होलकर तयार
होवून पुढे गेलो पिछाडिसा चिरंजीव राजश्री रघुनाथराव
दादा गेले होते त्याणी निकड बसवून इंग्रजाकडिल
दाहाबारा माणूस जाया केलेच्यार गोरे तांडिले दोन
घोडी ठार मारेली बाणांनी दोन छबडे उडाले ते दिडसे
बैल व डेरे राऊत्या वगैरे पाडाव लुटून आणीली कांही
आणता गोरेहो आलो दादा कडील सात आठ घोडी
जखमी व तीन ठार व चारपांच भले माणूस
जखमी झाले तेथेच एक होलकराकडिल मातबर
माणूस ठार जाहाला होलकर बाजुस पिछाडीच्या
अंग होते त्याज कडीलही तीहनव्यार घाडे जखमी
जाया जाले त्यांणीही बाण चांगले टाकीले आम्ही

...2...

तोंडावरी आहो आमच्या लोकांनीहो निकड केली पांच
सात घोडे ठार व जखमी जाले पांचच्यार माणूस जाया
जाले तो बारवाहेच्या तल्यावरी आज दोन प्रहरा येवून
उतरला आमचे बाण चांगले लागू जाले दाहा बारा बैल
पाडाव आले या प्रते जाले आम्ही आज रात्रै याच्या
तोंडावरी उभे आहो चिरंजीव दादा प्रातःकाली पनवेलीस
गेले होते त्याणी गावातील घरे वारीस जाहली इंग्रजाची
वस्ती मोडीलीया प्रमाणे केले आम्हा कडीलही माराने त्याचे
दाहा विस माणूस त्याज कडील जाया जाहले
जाहाले आज बरीच थापली आपण तोफा सरकारच्या
पाठविल्या त्या आज दहिवाडीनजीक सुनग्यात आल्या
आलेवर काही चुकांचं लिहिले नाही पायेचे माणूस
तरी तो हावदोत आहे किंवा नाही काही कलले नाही
(शब्द लागत नाही ) आमची फौजेस ......... लागत नाही श्रीइच्छा
प्रमावर रता गुरुवार असतमान बहूत काये लिहिणे
लोभ किजे ही विनंती.

XXXXX

डे.कॉ.इ.संग्रह.
मेणवली दप्तर
रुमाल नं.20
फाईल नं.3
प.नं.।

श्रीगणेश

सेवेसी शिवाजी गोपाळ साष्टांग नमस्कार
विज्ञापना औसिजे टिपूने प्रस्तुत बहूतच अमर्याद
अन्याय कर्मे अवलंबिलो आहेत ती काठेवर
ल्याहावी सरकारांत रुजु नाही बदमस्त होवून कित्येक
ब्राम्हण भ्रष्ठाविले त्याचे पारवत्य जाहाल्यानेच चक्र
परचक्रावर सरकारचा वक्र राहातो स्वामीच्या
पुण्ये बुडून पारपत्य होणे कठिण नाही, परंतु ये
विषयीचा उद्योग आतापासून जाहाला पाहिजे
त्यास मुख्य खासा स्वारीचा दाब घालुन
कृष्णातीरी पावेतो मिरजेच्या लगते जावे
तेथुन फौजा रवाना व्हाव्या भोसले गायेकवाड
होलकर देखिल समागमे ज्याहाले मोगलाची
फौज आणवून दुतर्फा पायेबंद बसवावा जळ
मार्गे तमाम हराम पांच सात हजार व पांच
हजार गाडद सांवत फिरंगी गोवेकर सामील
करुन घेवून बंदर किनारा सोंधेप्रांत व
बिदनूरच्या मुलकांत उपद्रव व्हावा इंग्रज
महमदअली याणी तिकडून चढाई करावी
असा भिकारो येलगार जाहाली यावर टिपूस
पुंठी दयावयाचे अवघड नाही मोठया मनसब्याने
सहमत काम होईल किरकोळ फौजा पाठवून
शत्रुस सरे कराया ईतके मात्र घडते त्यास
असो मनसबा होवून प्रथम स्वारी श्रीमंताची

...2...

होताच टिपूचे पारपत्यच होईल आणि मोठा
लाभ सरकारात होवून येश येईल देव
ब्राम्हणाचा उपद्रव व परिहार जाहाल्यास
श्रेयस्कर आहे असी कल्याणा चितात आली
ते आमची योग्यता सर्वज्ञास सुचवावयाची
नाही परंतु विनंती लिहिली आहे चितात
आणावी जळमार्गे आरमार पायेदल मागे
येळवेळ गेल तेव्हा कांही जाहालं नाही असे स्वामी
म्हणतील तर तसे ध्यानांत न आणावे आता त्या
प्रमाणे होणार नाही श्रीमंताच्या पुण्य प्रमाणे करुन
सिंध्यांनी हिंदूस्थानचा बंदोबसत केला दक्षणेत
नवाच संकट जवळच राहिला आहे त्यांचे पारपत्यास
मोठे मोठे सरदार देशी आहेत पारपत्य सहजात
करीतील म्हणजे आपला श्रीमताचे राज्य होवून
देवा ब्राम्हणाची संस्थापना होईल सेवेसी
श्रुत होये हे विज्ञापना.

xxxxx

